**ऊर्ण**–पु. लोंकर.
**ऊर्ध्व**–अ. वर.–वि. उंच, उभा.
**ऊर्ध्वगति**–स्त्री. मुक्ति.
**ऊर्ध्वगामी**–वि. वर जाणारा, मुक्त.
**ऊर्ध्व चरण**–पु. खालीं डोकें वर पाय करून तपश्चर्या करणारा तपस्वी.
**ऊर्ध्व पुंड्र**–पु. वैष्णव लोक कपाळावर लावित असलेला तिलक.
**ऊर्ध्व लोक**–पु. आकाश, स्वर्ग.
**ऊल जलूल**–वि. असंबद्ध, अज्ञानी, असभ्य.
**ऊषा**–स्त्री. सकाळ, अरुणोदय, बाणासुराची कन्या.
**ऊसर**–पु. रेताड जमीन.
**ऊह, ऊहन**–पु. अनुमान, विधान, तर्क, सिद्धांत, ज्ञान, अध्याहार, धर्मविधींत फेरफार, गोळा करण्याची क्रिया.
**ऊहापोह**–पु. तर्क वितर्क.

## [ ऋ ]

**ऋग्वेद**–पु. चार वेदांपैकीं एक वेद.
**ऋचा**–स्त्री. वेदमंत्र, स्तोत्र.
**ऋजु**–वि. सरळ, सुगम, सज्जन, प्रसन्न.
**ऋजुता**–स्त्री. सरळपणा, सोपेपणा, सज्जनता.
**ऋण**–पु. कर्ज.
**ऋण उतरना**–कर्ज फिटणें.
**ऋण पटना**–कर्जफेड पुरी होणें.
**ऋद्ध**–वि. संपन्न.
**ऋद्धि**–स्त्री. एक औषधी वनस्पति, समृद्धि, आर्याछंदाचा एक प्रकार.
**ऋन**–पु. कर्ज.
**ऋनिक, ऋनिया**–वि. कर्जदार.
**ऋषि**–पु. मंत्रद्रष्टा, आध्यात्मिक व भौतिक तत्वांचा साक्षात्कार करविणारा.

## [ ए ]

**ऐंचपेंच**–पु. डावपेच, अडचण, भानगड, संकट.
**ऐंडा बेंडा**–वि. वाकडें तिकडें, भलतेंच.
**ऐंडी**–पु. रेशमाचा किडा, त्यापासून निघणारें रेशीम. –स्त्री. टांच.
**ऐंडुआ**–पु. चुंबळ.
**ए**–पु. विष्णु. –अ. एकाद्याला हाक मारतांना या अव्ययाचा उपयोग होतो.
**एकंग**–वि. एकटा.
**एकंगा**–वि. एकांगी.
**एकंगी**–स्त्री. एकांगी.
**एक**–वि. एक (संख्या), अद्वितीय, समान, कोणी एक.
**एक अंक**–ठारीव, पक्कें.
**एक आँख देखना**–सारखेपणानें वागणें.
**एक आँख न भाना**–तिरस्कार वाटणें.
**एक आँखसे देखना**–सगळ्यांशीं सारख्या भावानें वागणें.
**एक आँख न भाना**–जरासुद्धां न आवडणें.
**एक आध**–एखादा, एकटा दुकटा.
**एक एक**–प्रत्येक.
**एक एक करके**–एका मागून एक, हळू हळू.
**एक कलम**–सर्व.
**एककी दस सुनाना**–टाकून बोलणें.
**एकके दो दो करना**–प्राप्ति वाढविणें, काम वाढविणें, उगीच वेळ काढणें.
**एक जान**–एक जीव.
**एक टक**–टक लावून.
**एक टाँग फिरना**–सारखें भटकणें.
**एक तरफ़**–एका बाजूला, एकीकडे.
**एक और एक ग्यारह करना**–संघटन करणें.
**एक ताक–र**–सारख्या रूपारंगाचे, सारखे.
**एक तो**–अगोदर तर.

**एक दिल**—अभिन्न हृदय.
**एक दीवार रुपया**—हजार रुपये.
**एक दूसरा**—एकमेक.
**एक दूसरेका**—परस्पर.
**एक न चलना**—कांहीं एक न चालणें.
**एक पास**—जवळ जवळ.
**एक पेटसे**—सहोदर.
**एक ब एक**—एकाएकी, अचानक.
**एक बात**—दृढ प्रतिज्ञा.
**एक मामला**—एकी.
**एक मूठ या मुश्त**—एका हप्त्यानें, एका मुठीनें.
**एक सा**—सारखा.
**(अपनी) और किसीकी जान एक करना**—मारणें व स्वतः मरणें.
**एकसे एक**—एका पेक्षां एक.
**एक स्वरसे कहना या बोलना**—एका मतानें बोलणें.
**एक होना**—एक होणें, तद्रूप होणें.
**एक गाछी**—पु. एकाच लाकडाची केलेली नाव.
**एक चोबा**—पु. एक खांबी तंबू.
**एकजद्दी**—वि. सगोत्र.
**एक टंगा**—वि. एक टांग्या.
**एकड़**—पु. एकर.
**एक डाल**—वि. एका तऱ्हेचे, अेकसंधी. —पु. मूठ व पात एकाच लोखंडाची असलेला सुरा.
**एकत**—अ. एकत्र, एका जागीं.
**एक तरफा**—वि. एका बाजूचा, पक्षपाती असलेला, एकपक्षी.
**एक तरफ़ा डिगरी**—एका बाजूचा हुकुमनामा.
**एकतरा**—पु. एकांत्र ताप.
**एकता**—स्त्री. ऐक्य, सारखेपणा. —वि. अद्वितीय.
**एक ताक**—वि. सारखें.
**एकतालीस**—वि. एकेचाळीस.
**एकतीस**—वि. एकतीस.
**एकदम**—अ. तावडतोब, एकदम.
**एकन्नी**—स्त्री. एक आणा.
**एकपटा**—वि. अखंड, एक पट्ट्याचा.
**एक फसला**—वि. वर्षातून एकच पीक निघणारें.
**एक बारगी**—अ. अचानक, एकदम, सगळें सगळेंच्या
**एक़बाल**—पु. प्रताप, भाग्य, वैभव, स्वीकार.
**एकरंग**—वि. सारखें, शुद्ध मनाचा, सगळीकडे सारखा असलेला.
**एकरस**—वि. सारखा, एकाच तऱ्हेचा.
**एक़रार**—पु. स्वीकार, प्रतिज्ञा, करार.
**एक़रार नामा**—करारपत्र.
**एकल—ला**—वि. एकटा.
**एकलौता**—वि. एकुलता एक.
**एकबांज**—स्त्री. एकाच मुलाची आई, काकवंध्या.
**एकवेणी**—वि. वियोगिनी, एकच वेणी घातलेली, विधवा.
**एकशफ**—पु. ज्याचे खुर दुभंगलेले नाहींत असा पशु.
**एकसठ**—वि. एकसष्ठ.
**एकसत्तावाद**—पु. पार्मेनिडीजचा अद्वैत सिद्धान्त.
**एकसर**—वि. एकटा, सर्व, एका टोकापासून दुसऱ्या टोकापर्यंत.
**एकसाँ**—वि. सारखा.
**एकहत्तर**—वि. एकाहत्तर.
**एकहत्था**—वि. एकाच्याच हातांत असणारा.
**एकहरा**—वि. एकेरी.
**एकहरा बदन**—काटकुळें शरीर.
**एकांत**—वि. अत्यंत, एकटा, निर्जन. —पु. एकांत.
**एका**—पु. ऐक्य. —स्त्री. दुर्गा.
**एकाई**—स्त्री. एक, घटक, प्रमाण, एकंचें स्थान, एकंच्या जागेवर लिहिला जाणारा अंक.
**एकाएक**—अ. एकाएकीं.
**एकाएकी**—वि. एकाकी, एकटा. —अ. अचानक, एकाएकीं.

**एकाकार**–पु. अद्वैतता. –वि. एका [आकाराचा
**एकाकी**–क्रि. एकटा.
**एकादश**–वि. एकादशी, अकरा.
**एकादशा**–पु. अकराव्या दिवसाचें क्रियाकर्म अि. (मृत्यूनंतरचें).
**एकीभूत**–वि. मिसळलेलें.
**एकोतरसो**–वि. एकशेंएक.
**एकोतरा**–पु. एकोत्रा (व्याजाचा दर), एक दिवसाआड येणारा ज्वर.
**एकौझा**–वि. एकटा.
**एक्का**–पु. एक जनावराचा तांगा, एक्का, (पत्त्यांत).–वि. एकटा.
**एक्का दुक्का**–एकटा दुकटा.
**एक्कावान**–पु. एक्केवाला.
**एक्की**–स्त्री. एक बैलाची गाडी, एक्का [(पत्त्यांतील).
**एक्यानवे**–वि. एक्याण्णव.
**एक्यावन**–वि. एक्कावन.
**एक्यासी**–वि. एक्याऐंशी.
**एखनी**–स्त्री. मांसाचा रस्सा.
**एड़–ड़ी**–स्त्री. टांच.
**एड़ देना-लगाना**–लाथ मारणें, घोड्यास टांच मारणें, विघ्न आणणें. [करणें.
**एड़ीचोटीका पसीना एक करना**–ढोरमेहनत
**एड़ीचोटी पर से वारना**–ओंवाळून टाकणें, तुच्छ समजणें,
**एड़ी घिसना या रगड़ना**–पाय घासून धुणें, दु:खांत खितपत पडणें.
**एड़ीसे चोटीतक**–डोक्यापासून पायापर्यंत.
**एतक़ाद**–पु. विश्वास, भरवंसा.
**एतदाल**–पु. समानता, नेमस्तपणा.
**एतबार**–पु. विश्वास.
**(किसीका) एतबार उठना**–पत जाणें.
**एतबार खोना**–पत गमावणें.
**एतबार जमना**–विश्वास बसणें.
**एतमाद**–पु. विश्वास.
**एतराज़**–पु. अडथळा, विरोध.
**एतवार**–पु. रविवार.
**एता**–इतका.
**एतिक, एती**–वि. इतकी.
**एमन**–पु. यमन राग.
**एराक**–पु. इराक प्रांत. [इराकी घोडा.
**एराकी**–वि. इराकचा. –पु. उत्तम जातीचा
**एराफ़–ब**–पु. जहाजाचें बूड.
**एलची**–पु. राजदूत, प्रतिनिधि.
**एलचीगरी**–पु. राजदूताचें कार्य.
**एला**–स्त्री. वेलदोडा.
**एलुवा**–पु. एक औषध.
**एवं**–अ. तसेंच.
**एव**–अ. सुद्धां. [(मनुष्य).
**एवज़**–पु. मोबदला, प्रतिकार, बदली
**एवज़ मुआवज़ा**–पु. अदलाबदल, प्रतिकार.
**एवज़ी**–स्त्री. बदली.
**एवमस्तु**–असेंच होवो.
**एशिया**–पु. आशिया खंड. [संबंधी.
**एशियाअी**–वि. आशियामधील, आशिया-
**एह**–सर्व. हा.
**एहतमाम**–पु. व्यवस्था, तपासणी, देखरेख, अधिकार क्षेत्र, प्रयत्न.
**एहतमाल**–पु. सहन, संशय, भय, भार.
**एहतियाज**–पु. आवश्यकता. [पापभीरुता.
**एहतियात**–स्त्री. सावधगिरी, पथ्य, संरक्षण,
**एहसान**–पु. उपकार. [विसरणारा.
**एहसान फरामोश**–वि. कृतघ्न, उपकार
**एहसानमंद**–वि. कृतज्ञ, आभारी.
**एहा**–स.–हें. –वि. असें. –अ. हेंच.

**एहि**–सर्व. ह्याला.
**एहू**–अ. हासुद्धां, आणखीसुद्धां.

## [ ऐ ]

**ऐं**– अ. अं–(आश्चर्यसूचक).
**ऐंचना**–क्रि. स. ओढणें, ताणणें, दुसऱ्याचें कर्ज आपल्या अंगावर घेणें.
**ऐंचाताना**–वि. चकणा.
**ऐंचातानी**–स्त्री. ओढाताण. [ विंचरणें.
**ऐंछना**–क्रि. स. झाडणें, साफ करणें, केस
**ऐंठ**–स्त्री. गर्व, ऐट, द्वेष.
**ऐंठन**–स्त्री. पीळ, गर्व. [ पीळ.
**(उलटी) ऐंठन**–अुजवी कडून डावीकडचा
**(सीधी) ऐंठन**–डावीकडून अुजवी कडचा पीळ.
**ऐंठना**–क्रि. स. पीळ देणें, वळणें (दोरी), मुरगाळणें, तगाद्यानें वसूल करणें, मारणें (पैसा), अुकळणें (धन). –क्रि. अ. अुखडणें, पीळ बसणें, मुरडा येणें, वांकडें बोलणें, वळणें (हातपाय).
**ऐंठ लेना**–अुपटणें (वस्तु).
**ऐंठेकी बेल**–दगडी खांबावर चारी बाजूस कोरलेली वेल.
**ऐंठवाना**–क्रि. स. पीळ घालून घेणें.
**ऐंठा**–पु. दोरी वळण्याचा पेंच.
**ऐंठू**–वि. मिजाशी, अभिमानी.
**ऐंड**–स्त्री. गर्व, ठसका (नटण्याचा), भोंवरा (पाण्याचा). –वि. निकामी, वांकडा.
**ऐंड हो जाना**–फुकट जाणें, मोडतोड होणें.
**ऐंड़दार**–वि. गर्विष्ठ, ऐटदार, रंगेल, नखरेबाज. [ गर्व करणें.
**ऐंड़ना**–क्रि. स. आळसानें पडून रहाणें,
**(अंग) ऐंडा करना**–गर्व करणें.
**ऐंड़बेंड़**–वि. वांकडा तिकडा.
**ऐंडा**–वि. तिरपा. –पु. वजन.
**ऐंडाना**–क्रि. अ. आळेपिळे देणें, गर्व करणें.
**ऐंढा**–पु. एक प्रकारचा कोयता.
**ऐ**–पु. शिव. –अ. अरे, अहो.
**ऐक्य**–पु. मिलाफ, एकमत, एकरूपता, ब्रह्म आणि जीवात्मा यांचें ऐक्य.
**ऐजन**–अ. तसेंच, तेंच.
**ऐज़ाज़**–पु. आदर, सन्मान.
**ऐदाद**–स्त्री. संख्या, मोजणी. [ घर.
**ऐन**–वि. पूर्ण, योग्य, ठीक, बरोबर. –पु.
**ऐनक**–स्त्री. चष्मा..
**ऐना**–पु. आरसा.
**ऐनीता**–पु. माकडास आरसा दाखविण्याचे वेळचा दरवेशांचा शब्द.
**ऐपन**–पु. हळद नि तांदूळ ओले वाटून बनविलेलें मंगल द्रव्य (मूर्तीच्या कपाळीं तसेंच घागरीवर याचा लेप करतात.)
**ऐब**–पु. दोष, खोड, अवगुण, कलंक.
**ऐब लगाना**–दोष देणें, कलंक लावणें.
**ऐबक**–पु. गुलाम, दास.
**ऐबगो**–वि.. निंदक.
**ऐबगोई**–स्त्री. निंदा.
**ऐबजो**–वि. छिद्रान्वेषी.
**ऐबजोई**–स्त्री. दोषदृष्टि.
**ऐबना**–क्रि. अ. येणें.
**ऐबपोश**–पु. दोष झांकणारा मनुष्य.
**ऐबी**–वि. वाईट, दुष्ट, अवगुणी.
**ऐमाल**–पु. कार्य.
**ऐया**–स्त्री. वृद्ध स्त्री, आजी.
**ऐयाम**–पु. दिवस.
**ऐयार**–पु. धूर्त.
**ऐयारी**–स्त्री. धूर्तता.

**ऐयाश**–वि. सुखलोलुप, विषयलंपट.
**ऐयाशी**–स्त्री. भोगविलास. [ सटरफटर.
**ऐरा गैरा**–वि. तिऱ्हाईत, अनोळखी, तुच्छ,
**ऐरे गैरे नत्थू खैरे**–कुठला कुणाचा कोण.
**ऐरापति**–पु. ऐरावत.
**ऐराब**–पु. ऊर्दू स्वरांच्या खुणा, बुद्धिबळांत अिरेस घालणें. [ पूर, खळबळ.
**ऐल**–पु. 'अिला' चा पुत्र पुरूरवा, विपुलता,
**ऐलान**–पु. घोषणा, दौंडी.
**ऐवान**–पु. महाल.
**ऐश**–पु. चैन.
**ऐशोआराम**–पु. सुख चैन.
**ऐसा–स**–वि. असें, असा, याप्रमाणें.
**ऐसा तै(वै)सा**–सामान्य, हलका, असातसा.
**ऐसी तैसी**–तुच्छतादर्शक शिवी.
**ऐसी तैसी करना**–समाचार घेणें (व्यंग).
**ऐसी तैसीमें जाना**–चुलींत जाणें (शिवी).
**ऐसे**–अ. या प्रकारानें.
**ऐसे तो**–अ. तसें म्हटलें तर.

## [ ओ ]

**ओंगना**–क्रि. स. वंगण घालणें (चाकास).
**ओंगा**–पु. आघाडा.
**ओंठ**–पु. ओठ.
**ओंठ काटना या चबाना**–दांत ओठ खाणें.
**ओंठ चाटना**–जिभल्या चाटणें.
**ओंठ चूसना**–अधर चुंबन घेणें.
**ओंठ फड़कना**– संतापानें ओठ थरथरणें.
**ओआ**–पु. हत्ती पकडण्याचा खड्डा.
**ओक**–पु. ओंजळ, घर, निवासस्थान, आश्रयाची जागा, नक्षत्रांचा किंवा ग्रहांचा समुदाय.–स्त्री. ओकारी, वमन.
**ओकना**–क्रि.अ. ओकणें, म्हशीसारखें रेंकणें
**ओकाई**–स्त्री. ओकारी.
**ओखरी-ली**–स्त्री. उखळी, रगडा (मद्रासी).
**ओखलीमें सिर देना**–तळहातीं शिर घेणें, बलिदानास सिद्ध होणें.
**ओखा**–पु. बहाणा, ढोंग. –वि. रुक्ष, कठीण, झिरझिरीत, शुद्ध नसलेला, खोटा.
**ओखी**–वि. वाकडी तिकडी, कठीण.
**ओग**–पु. वर्गणी, महसूल.
**ओघ**–पु. समूह, ढीग, प्रवाह.
**ओछा**–वि. हलका, क्षुद्र, किरकोळ, उथळ.
**ओछाई**–स्त्री. क्षुद्रता, नीचता.
**ओछापन**–पु. नीचता.
**ओज**–पु. बल, प्रकाश, कवितेंतील वीर रस.
**ओजस्वी**–वि. शक्तिमान्, प्रभावशाली.
**ओझ**–पु. पोट, आंतडे.
**ओझर**–पु. जठर, पोट.
**ओझल**–वि. आड.
**ओझा**–पु. मांत्रिक, मैथिल आणि गुजराथी ब्राम्हणांतील एक जात.
**ओझाइन**–स्त्री. ओझाची स्त्री, मांत्रिक स्त्री.
**ओझाई**–स्त्री. मांत्रिकाचा धंदा, मंत्रतंत्र.
**ओट**–स्त्री. आडोसा, व्यवधान, आश्रय.
**(आँखोंसे) ओट हो जाना**–अदृश्य होणें, डोळ्याआड होणें.
**ओटन**–पु. सरकी काढण्याचें यंत्र.
**ओटना**–क्रि. स. सरकी काढणें, स्वतःचा हेका चालविणें, आंगावर घेणें.
**ओटनी**–स्त्री. सरकी काढण्याचें यंत्र.
**ओटा**–पु. आडोश्याची भिंत, सरकी काढणारा माणूस.
**ओटी**–स्त्री. पाहा 'ओटनी.' [ घेणें.
**ओठंगना**–क्रि. अ. टेकून बसणें, विश्रांति
**ओढ़न**–पु. ढाल, अवरोध, रक्षणाचें साधन.

**ओड़ना**—क्रि.स. अडविणें, निवारणें, पसरणें·
**ओड़ा**—पु. खड्डा, मोठी टोपली, उणीव.
**ओढ़ना**—क्रि. स. अंग झांकणें, अंगावर घेणें. —पु. पांघरूण.
**ओढ़ना उतारना**—अपमान करणें.
**ओढ़ना ओढ़ाना**—विधवेशीं लग्न करणें.
**ओढ़नी**—स्त्री. ओढणी.
**ओढ़नी बदलना**—मैत्रीण बनविणें.
**ओढ़र**—पु. बहाणा, मिष, ढोंग.
**ओढ़ाना**—क्रि. स. झांकणें (वस्त्रानें).
**ओत**—स्त्री. आळस, सुख, लाभ. —वि. [विणलेलें.
**ओत कसर**—लाभहानि.
**ओतप्रोत**—वि. गुंफलेलें, एकजीव झालेलें,
**ओद**—वि. भिजलेला, ओला.—पु. ओलावा.
**ओदन**—पु. शिजलेले तांदूळ.
**ओदरना**—क्रि. अ. फाटणें, नष्ट होणें.
**ओदा**—वि. आर्द्र, भिजलेला.
**ओदारना**—क्रि. स. फाडणें, छिन्नविच्छिन्न करणें, जमीनदोस्त करणें, पाडणें.
**ओध**—अ. जवळ.
**ओधना**—क्रि. अ. बांधलें जाणें, गुंतणें. [दोरी.
**ओनचन**—स्त्री. खाटेचे पायतण ताणण्याची
**ओनचना**—क्रि. स. बाजेच्या पायथ्याला लागून असलेली दोरी ताणणें.
**ओनवना**—क्रि. अ. वांकणें, ओणवें होणें,
**ओना**—पु. उगम. [तुटणें, भरून येणें (ढग).
**ओना लगना**—तलाव वाहून जाणें.
**ओप**—स्त्री. चमक, झिलई.
**ओपची**—पु. कवचधारी योद्धा.
**ओपना**—क्रि. स. घासणें, झिलई देणें.
**ओपनी**—स्त्री. धार लावण्याचा दगड, उजळण्याचें साधन. [सूचक उद्गार).
**ओफ़**—अ. अरेरे (दुःख, कष्ट किंवा आश्चर्य-
**ओबरी**—स्त्री. लहान घर, लहानशी खोली.
**ओर**—स्त्री. दिशा, पक्ष. —पु. टोंक, किनारा.
**ओर आना**—अंतकाळ जवळ येणें.
**ओर निबाहना या निभाना**—मरेपर्यंत कर्तव्य पूर्ण करणें.
**ओरमा**—स्त्री. एकेरी शिवण.
**ओरहा**—पु. हरभऱ्याचें रोपटें.
**ओराना**—क्रि. अ. संपणें. [लाकूड.
**ओरिया**—स्त्री. ताणा ताणण्यासाठीं गाडलेलें
**ओरे**—पु. गारा (पावसाच्या).
**ओलंदेज-जी**—वि. हॉलंडचा.
**ओलंबा-भा**—पु. टोमणा, गाऱ्हाणें.
**ओल**—पु. सुरण.—स्त्री. आडोसा, आश्रय, जामीन, तारण, ओलीस ठेवलेली वस्तु वा व्यक्ति, बहाणा.—वि. ओलें.
**ओलचा**—पु. पाणी उपसण्याचें भांडें.
**ओलती**—स्त्री. पागोळी.
**ओलना**—क्रि. स. आडोसा करणें, अडविणें, सहन करणें, टोचणें.
**ओला**—पु. वर्फाची गार, खडी साखरेचा वाटोळा खडा, एक प्रकारची बाभूळ, आडोसा, गुप्त गोष्ट.—वि. थंड.
**ओलियाना**—क्रि. स. ओटींत घालणें, ठासून
**ओली**—स्त्री. मांडी, पदर, झोळी. [भरणें.
**ओली ओड़ना**—पदर पसरून मागणें.
**ओली लेना**—दत्तक घेणें.
**ओषधि**—स्त्री. औषधि वनस्पति, एक वेळ
**ओस**—स्त्री. दव. [फळें देऊन सुकणारें रोपटें.
**ओस पड़ जाना-पड़ना**—कोमेजणें, उत्साह भंग होणें, लज्जित होणें.
**ओसका मोती**—आळवावरचें पाणी.
**ओसना**—क्रि. स. वाळवणें (धान्य).
**(अपनी) ओसना**—सारखी बडबड करणें.

(किसीको) ओसना–खूप फटकारणें.
ओसाना–क्रि. स. धान्य वारवणें.
ओसार–पु. विस्तार.
ओह–अ. दुःख, आश्चर्य इ. सूचक शब्द.
ओहदा–पु. हुद्दा.
ओहदेदार–पु. अधिकारी.
ओहरी–स्त्री. थकवा.
ओहा–पु. गाईचे स्तन.
ओहार–पु. पालखी वरचा पडदा.
ओहि–स. त्यालाच.
ओहो–अ. आश्चर्य व आनंदसूचक शब्द.

## [ औ ]

औंगना–क्रि. स. वंगण घालणें.
औंगा–वि. मुका.
औंगी–स्त्री. मुकेपणा.
औंघना–क्रि. अ. डुलकी घेणें.
औंघाई–स्त्री. डुलकी. [ओतणें.
औंजना–क्रि. अ. व्याकुळ होणें. –क्रि. स.
औंटन–पु. चारा कापण्याचा लाकडी ओंडा.
औंठ–स्त्री. किनारा, कांठ.
औंठा–पु. पायांतील एक दागिना.
औंड–पु. खड्डा खणणारा मजूर.
औंडा–वि. गंभीर, खोल, वर आलेला.
औंदा(द)ना–क्रि. अ. त्रासणें, जीव गुदमरणें.
औंधना–क्रि. अ. उपडें होणें, उलटें होणें.
औंधा–वि. उपडें.
औंधाना–क्रि. स. उपडें करणें, लटकविणें.
औंरा–पु. आंवळा.
औकन–स्त्री. ढीग.
औक़ात–पु. वेळ. –स्त्री. शक्ति.
औगत–स्त्री. अवगति, दुर्गति. –वि. माहिती.
औगी–स्त्री. पराणी असलेला चाबूक, बैल
औगुन–पु. दुर्गुण. [हाकण्याचा चाबूक.
औगुनी–वि. दुर्गुणी.
औघट–वि. अवघड. [–वि. मनमानेल तसें.
औघड़–पु. अघोरी, अविचारी मनुष्य.
औघर–वि. विलक्षण, अव्यवस्थित.
औचक–अ. अचानक, एकाएकीं.
औचट–स्त्री. संकट. –अ. सहसा.
औचित–वि. निश्चित.
औचिती–स्त्री. उपयुक्तता.
औछ–स्त्री. दारुहळदीचा गड्डा.
औज–पु. उंचपणा, श्रेष्ठपद, उंची.
औजड़–वि. अडाणी.
औज़ार–पु. हत्यार (लोहारा सुताराचें).
औझड़–अ. निरंतर.
औटना–क्रि. अ. आटणें.
औटनी–स्त्री. पळी, डाव.
औटाना–क्रि. स. आटविणें. [होणारा.
औढर–वि. चंचल, थोडक्यांत प्रसन्न
औदसा–स्त्री. दुर्दशा, अवदसा.
औध–पु. अयोध्या, कोसल प्रांत.
औधि–स्त्री. वेळ, आयुष्य.
औनापौना–अ. कमी जास्त. –वि. पाऊण.
औने पौने करना–येईल त्या किंमतीनें
औनि–स्त्री. पृथ्वी, अवनि. [विकून टाकणें.
औपनिवेशिक–वि. वसाहती संबंधी.
औपन्यासिक–वि. कादंबरी संबंधीं, अद्भुत.
औम–स्त्री. क्षयतिथि.
और–अ. आणि.–वि. दुसरें, अधिक.
औरत–स्त्री. स्त्री, बायको.
औरसना–क्रि. अ. विरस होणें, नाखुष होणें.
औरेब–पु. वक्रगति, डावपेंच, तिरपें कापड कापणें (शिप्याचें), तिरपी चाल, पेच.
औलाद–स्त्री. संतति.
औलामौला–वि. मनमौजी.
औलिया–पु. सिद्ध, पीर.

**औवल**–वि. प्रथम, आरंभींचा, पूर्वीचा, मुख्य, सर्वश्रेष्ठ, सर्वोत्तम.
**औशि**–अ. अवश्य. [साधारण.
**औसत**–पु. सरासरी. –वि. मध्यम,
**औसतन्**–अ. सरासरीनें.
**औसना**–क्रि. अ. खाण्याच्या वस्तु नासणें, गरमी पडणें, उकाडा होणें, उन्हाळ्यानें
**औसर**–पु. वेळ. [व्याकुळ होणें.
**औसान**–पु. हिम्मत, परिणाम, शेवट, शुद्धी.
**औसाना**–क्रि. स. अढींत घालून पिकविणें.
**औसाफ़**–पु. सद्गुण.' वस्फ'चें अ. वचन.
**औसेर**–स्त्री. विलंब, चिंता.
**औहत**–स्त्री. अपघात, दुर्दशा.
**औहाती**–स्त्री. सौभाग्यवती.

## [क]

**कँऊधा**–पु. विजेची चमक, चकचकाट, लखलखाट. [प्रकारचा आंबा.
**कंक**–पु. पांढरी घार, खेंकडा, विशेष
**कंकड़–र**–पु. खडा, सुकविलेली किंवा भाजलेली तंबाखू, कणी.
**कंकड़ी**–स्त्री. वाळूचे कण. [असलेला.
**कँकड़(री)ला**–वि. रेताड, खडे कांटे
**कंकन**–पु. बांगडी.
**कंकरीट**–स्त्री. कॉंक्रीट.
**कंकाल**–पु. हाडांचा सांपळा.
**कंकाली**–पु. एक नीच जात, कर्कशा.
**कंकोल**–पु. कंकोळ.
**कँखवारी**–स्त्री. कांखमांजरी.
**कँखौरी**–स्त्री. कांख, कांखेंत येणारी गांठ.
**कंगन**–पु. बांगडी, कांकण, शिखांच्या डोक्या-वरील लोखंडी कडें.
**कँगना**–पु. कंकण बांधतांना म्हणावयाचें गाणें.–स्त्री. एक प्रकारचें गवत.
**कँगनी**–स्त्री. लहान कंकण, कंगोरा, वर्तुळ.
**कँगला**–वि. दरिद्री.
**कँगसी**–स्त्री. पंजा, पकड.
**कंगाल**–वि. दुष्काळग्रस्त, निर्धन.
**कंगालगुंडा**–वि. गरीब परंतु चैनी.
**कंगाल बाँका**–वि. दरिद्री पण मानी.
**कंगाली**–स्त्री. निर्धनता.
**कँगुरिया**–स्त्री. करंगळी. [बुरूज.
**कँगूरा**–पु. शिखर, किल्ल्यावरील लहान
**कंघा**–पु. कंगवा, मोठी फणी, मागाची फणी.
**कंघी**–स्त्री. फणी.
**कँघेरा**–पु. फणी बनविणारा.
**कंघी चोटी करना**–वेणी फणी करणें.
**कंचन**–पु. सोनें, धोतरा, रक्तकांचन. –वि. निरोगी
**कंचन बरसना**–संपत्ति व शोभायुक्त होणें.
**कंचनिया**–स्त्री. कांचनाच्या झाडाची एक
**कंचनी**–स्त्री. वेश्या. [जात.
**कंचुकी**–पु. अंतःपुर रक्षक, द्वारपाल, साप.
**कँचुवा**–पु. चोळी. [–स्त्री. चोळी.
**कँचेरा**–पु. कांचेचें काम करणारा.
**कंछा**–स्त्री. बारीक डहाळी, अंकुर.
**कंजई**–वि. खाकी रंगाचें. –पु. खाकी रंग, खाकी रंगाच्या डोळ्याचा घोडा.
**कंजड़**–पु. दोरखंड वळणारी जात (मांग).
**कंजा**–पु. करंजीचें फळ. –वि. खाकी रंगाचा, घाऱ्या डोळ्याचा.
**कंजाक**–पु. लुटारू, डाकू.
**कँजियाना**-क्रि. अ. निखारे निवणें, कोमेजणें.
**कंजूस**–वि. कृपण, कंजूष.
**कंजूसी**–स्त्री. कंजूषपणा.
**कंटकी**–वि. कांटेदार.
**कँटबाँस**–पु. भरीव कांटेरी वेळू.

**कंटर**–पु. काचेची सुरई. [ वितीची काठी.
**कंटा**–पु. बांगडया रंगविण्याची दीड
**कंटाइन**–स्त्री. डाकीण, कर्कशा.
**कंटाप**–पु. कोणत्याहि वस्तूचा पुढील जड
**कंटाल**–पु. घायपात, वेळू. [ भाग.
**कँटिया**–स्त्री. लहान खिळा, मासे मारण्याचा गळ, डोक्यांत घालावयाचा एक
**कँटीला**–वि. कांटेदार. [ दागिना.
**कंटूनमेंट**–स्त्री. सैनिक छावणी.
**कँटेला**–पु. बारीक लांब केळयांचें झाड.
**कंटोप**–पु. कान टोपी.
**कंट्राक्ट**–पु. मक्ता.
**कंठ करना**–तोंडपाठ करणें.
**कंठगत**–वि. गळयाशीं आलेलें.
**(प्राण) कंठगत होना**– मृत्यु जवळ येणें.
**कंठमाला**–स्त्री. गंडमाळा (रोग).
**कंठला**–पु. ताईत, हसळी (मुलांची).
**कंठासरी**–स्त्री. गळसरी, कंठी.
**कंठस्थ**–वि. तोंडपाठ. [ गळा.
**कंठा**–पु. कंठ (पोपटाचा), हसळी, कंठा,
**कंठाग्र**–वि. तोंडपाठ.
**कंठी**–स्त्री. माळ, कंठी, हसळी.
**कंठी उठाना**–शपथ घेणें.
**कंठी देना**–शिष्य करणें, माळ घालणें.
**कंठी लेना**–माळ घेणें, त्यागी बनणें.
**कंडरा**–स्त्री. मोठी रक्तवाहिनी.
**कंडा**–पु. गोंवरी, सरकंडा.
**कंडा होना**–सुकणें, मरणें, दुबळे होणें.
**कंडारी**–पु. कर्णधार.
**कंडाल**–पु. शिंग, तुतारी, पाणी भरण्याचें तांब्या पितळेचें मोठें भांडें.
**कंडी**–स्त्री. गोंवरी. [यांचा बनलेलाकंदील.)
**कंडील**–स्त्री. (माती, अभ्रक किंवा कागद
**कंडीलिय**–स्त्री. लहान दीपगृह.
**कंडु**–स्त्री. कानाचा एक रोग, खाज.
**कंडुक**–पु. बिब्बा, भिलावा.
**कंडवा**–पु. कणसावर पडणारा रोग.
**कँडेरा**–पु. पिंजारी.
**कंडोल**–पु. कठडा (बांबूचा).
**कंडौरा**–पु. शेण्या थापडण्याची जागा, गोंवऱ्या सांठविण्याची जागा.
**कंत-थ**–पु. कांत, पति, ईश्वर.
**कंथा**–स्त्री. गोधडी, घोंगडी, शरीर.
**कंथी**–पु. गोधडी पांघरणारा साधु.
**कंद**–पु. कंदमूळ, खडीसाखर.
**कंदरप, कंदर्प**–पु. मदन, कामदेव.
**कंदर**–पु. गुहा. **कंदरा**–स्त्री. गुहा.
**कंदल**–पु. कोंब, कपाळ, सोनें, वादविवाद, गाल, समूह, केळ, मंजुळ ध्वनि, दूषण.
**कंदला**–पु. सोन्या-चांदीची तार, सोन्या-चांदीची लगड.(दागिने करणारा सोनार.
**कंदलागर**–पु. धातूंत खोटी भेसळ करून
**कंदा**–पु. कंद, रताळें. [अभ्रकाचा).
**कंदील**–स्त्री. कंदील (कागदाचा किंवा
**कंदुक**–पु. चेंडू, सुपारी, गोलउशी, एक वर्ण वृत्त. [किंवा पिराच्या नांवें अन्नसंतर्पण.
**कंदूरी**–स्त्री. तोंडलें. –पु. बीबी फातमा
**कँदैला**–वि. घाणेरडा.
**कँदोरा**–पु. करगोटा.
**कंधनी**–स्त्री. करगोटा.
**कंधर**–पु. मान, ढग, नागरमोथा.
**कंधा**–पु. खांदा.
**कंधावर**–स्त्री. बैलाच्या मानेवरील जूं, खांद्यावर टाकावयाचा रुमाल.
**कंधार**–पु. कंदाहार.
**कंधि**–पु. समुद्र, मान, गळा.

**कँधियाना**—क्रि. स. खांदा लावणें.

**कंधेला**—पु. स्त्रियांच्या साडीचा खांद्यावर येणारा भाग. [खांद्यावरून टाकणें.

**कंधेला डालना**—डोक्यावर पदर न घेतां

**कँपकँपी**—स्त्री. थरकांप.

**कँपना**—क्रि. अ. कांपणें, भीतिग्रस्त होणें.

**कंपा**—पु. पक्षी धरण्याचा फांस.

**कंपा मारना**—पक्षाला पकडणें, फसविणें.

**कँपाना**—क्रि. स. हलविणें, भिवविणें.

**कंपू**—पु. छावणी, फौजेचा तळ, तंबू.

**कंबल-र**—पु. कांबळें, पावसाळ्यांतील किडा.

**कंबु, कंबुक**—पु. शंख, शंखाची बांगडी, हत्ती.

**कंबोज**—पु. गांधार जवळील अफगाणि-

**कँवल**—पु. कमळ. [स्थानचा एक भाग.

**कँवलगट्टा**—पु. कमळाचें बी.

**कंस**—पु. कासें (धातु), प्याला, सुरई, झांज, कांशाचें भांडें, उग्रसेनाचा मुलगा.

**कँसुला**—पु. मणी बनविण्याचा सोनाराचा कांशाचा चौकोन.

**क**—पु. ब्रम्हा, विष्णु, कामदेव, सूर्य, प्रकाश, प्रजापति, दक्ष, अग्नि, वायु, राजा, यम. आत्मा, मन, शरीर ,काल, धन, शब्द.

**कई**—वि. कित्येक.

**ककओ**—स्त्री. फणी.

**ककड़ी**—स्त्री. काकडी.

**ककड़ीके चोरको कटारीसे मारना**—काकडी-च्या चोराला फांशीची शिक्षा.

**ककवी**—स्त्री. बांगडी.

**ककरी**—स्त्री. काकडी. [वर्णमाला.

**ककहरा**—पु. 'क' पासून 'ह' पर्यंतची

**ककोड़ा**—पु. तोंडल्यासारखें एक फळ.

**ककोरना**—क्रि. स. कोरणें, खोदणें, उपटणें.

**कक्कड़**—पु. भाजलेला तंबाखूचा चुरा.

**कक्कड़खाना**—हुक्का पिणाऱ्या टोळीचेंस्थान.

**कक्कड़बाज**—पु. फार तंबाखू ओढणारा.

**कक्कड़वाला**—पु. पैसे घेऊन हुक्का पाज-णारा. [काका.

**कक्का**—पु. काश्मीरांतील एक प्रदेश, नगारा,

**कक्ष**—पु. बगल, कासोटा, जंगल, सुकलेलें गवत, भूमि, घर, पाप, इयत्ता, सैन्याच्या आजूबाजूचा भाग, कमरपट्टा.

**कक्षा**—स्त्री. परीघ, ग्रहमार्ग, तुलना, श्रेणी, उंबरा, बगल, भिंत, लंगोट, वर्ग.

**कखरी**—स्त्री. कांख, कूस.

**कखरी लरिका गांव गोहार**—काखेंत कळसा नि गांवाला वळसा.

**कखौरी**—स्त्री. कौंखेतील फोड.

**कगदही**—स्त्री. कागदपत्रांचें दप्तर.

**कगर**—पु. कांहींसा उंच किनारा, बांध, कंगोरा, पूर. [उंच किनारा.

**कगार**—पु. उंच किनारा, टेकडी, नदीचा

**कच**—पु. केस, कोरडी जखम, झुंड, ढग, बृहस्पतीचा मुलगा, टोंचण्याचा शब्द,

**कचक**—स्त्री. ठेंच. [ठेंचण्याचा शब्द.

**कचकच**—स्त्री. बडबड. [दांत ओंठ खाणें.

**कचकचाना**—अ. कचकच आवाज करणें,

**कचकड़ा**—पु. कांसवाची पाठ, कचकडा.

**कचकेला**—पु. कच्चें केळें.

**कचकोल**—पु. भिक्षापात्र (नारळाचें).

**कचदिला**—वि. हळवा.

**कचनार**—पु. एक लहानसें झाड (यास सुंदर पिवळीं फुलें येतात).

**कचपच**—पु. खच्चून भरणें, बडबड.

**कचपची**—स्त्री. कृत्तिका नक्षत्र, टिकली.

**कचपेंदिया**—वि. अशक्त, अस्थिर बुद्धीचा.

**कचबच**—पु. मुलेंबाळें, परिवार.

**कचरकचर**–पु. कच्चें फळ खाण्याचा आवाज, बडबड. [ भोजन.

**कचरकूट**–पु. लाथा बुक्क्या मारणें, इच्छा-

**कचरपचर**–वि. गिचमिड.

**कचरना**–क्रि. स. तुडविणें, पोटभर खाणें.

**कचरा**–पु. कच्चें टरबूज, काकडी, कचरा, उडदाचें किंवा हरबऱ्याचें पीठ, शेवाळ.

**कचरी**–स्त्री. काकडीच्या जातीचें एक फळ, त्या फळाचे सुकविलेले तुकडे, सालीसकट डाळ, सरकी.

**कचलोंदा**–पु. भिजविलेल्या पिठाचा गोळा.

**कचलोन**–पु. काळें मीठ.

**कचलोहू**–पु. जखमेंतून येणारें पाणी.

**कचवांसी**–स्त्री. शेत मोजण्याचें माप, जमाव.

**कचवाट**–स्त्री. चीड.

**कचहरी**–स्त्री. दरबार, न्यायालय, कचेरी,

**कचहरी चढ़ना**– कोर्टाची पायरी चढणें.

**कचाई**–स्त्री. कच्चेपणा, अननुभवीपणा.

**कचाना**–क्रि. अ. कच खाणें, भिणें.

**कचालू**–पु. उकडलेल्या बटाट्याचा तुकड्यांत तिखट मीठ घालून केलेला खाद्य पदार्थ, एक प्रकारचा अळू कंद.

**कचालू करना या बनाना**–बदडणें.

**कचिया**–पु. विळा, दंताळें, काळेंमीठ.

**कचियाना**–क्रि.अ. हिम्मत हरणें, मागें पडणें.

**कचीची**–स्त्री. जबडा, दाढ.

**कचुल्ला**–पु. वाटी, पेला.

**कचूमर**–पु. ठेंचलेली वस्तु, ठेंचुन केलेलें लोणचें, कोशिंबिर.

**कचूमर करना या निकालना**–खूप चेंचणें,

**कचूर**–पु. आंबेहळद, कांचरी. [खूप मारणें.

**कचाना**–क्रि.स. टोंचणें, घुसविणें.

**कचोरा**–पु. प्याला.

**कचोरी**–स्त्री. उडीद वगैरेचें पीठ भरून

**कच्चर**–पु. घाणेरडे पदार्थ. [केलेली पुरी.

**कच्चा**–वि. कच्चा मातीचा, न पिकलेला, न शिजलेला, पुष्ट न झालेला, कमजोर, ठरविलेल्या मापापेक्षां कमी. –पु. सांगाडा, जबडा.

**कच्चा जी या दिल**–भित्रें मन. [लाजविणें.

**कच्चा करना**–भिववणें, खोटें ठरविणें,

**कच्चा पड़ना**–अप्रामाणिक ठरणें, संकुचित होणें. [लेली हकीगत, रहस्य.

**कच्चा चिट्ठा**–पु. जशीच्या तशी सांगित-

**कच्चा हाथ**–पु. कामांत प्रवीण नसणें.

**कच्चीपक्की**–स्त्री. दुर्वचन.

**कच्ची बही**–स्त्री. रोजकीर्द.

**कच्ची बात**–स्त्री. अश्लील गोष्ट. [साखर.

**कच्ची चीनी**–स्त्री. पांढरी न केलेली

**कच्ची रसोई**–स्त्री. फक्त पाण्यांत शिजविलेलें अन्न (जसें–भाकरी, भात, वरण.)

**कच्ची सड़क**–स्त्री. खडी न दाबलेला रस्ता.

**कच्ची सिलाई**–स्त्री. लांब लांब अंतरावर दोरा भरणें.

**कच्चे पक्के दिन**–पु. चार पांच महिन्याचें गर्भारपण, दोन ऋतूंच्या संधिकालांतील दिवस. [मुलेंबाळें.

**कच्चे बच्चे**–पु. लहान लहान मुलें, पुष्कळ

**कच्छप**–पु. कासव, कूर्मावतार, कुबेराच्या नऊ निधींपैकीं एक, 'दोहे' मधील एक भेद.

**कच्छपी**–स्त्री. कासवी, सरस्वतीची वीणा.

**कच्छा**–पु. नांवाचा समूह, दोन सुकाणूंची

**कच्छू**–पु. कांसव. [नाव.

**कछनी**–स्त्री. गुडघ्याच्या वर नेसलेलें धोतर, लहान धोतर.

**कछवाहा**–पु. रजपूतांतील एक जात.
**कछान**–पु. गुडघ्याच्या वर धोतर नेसण्याचा प्रकार.
**कछार**–पु. नदी किंवा समुद्र कांठची भिजलेली सखल जमीन.
**कछु, कछुक**–वि. कांहीं, थोडासा.
**कछुआ**–पु. कांसव.
**कछुई**–स्त्री. कासवी.
**कछोटा, कछौटा**–पु. कांसोटा.
**कज**–पु. वांकडेपणा, दोष.
**कजक**–पु. अंकुश.
**कजकोल**–पु. सुंदर उक्तींचा संग्रह, भिकाऱ्याचें खापर.
**कजरा**–पु. काजळ, काळ्या डोळ्यांचा बैल.
**कजरारा**–वि. काजळी, काळा.
**कजलाना**–क्रि. अ. काळें पडणें, आग विझणें.–क्रि. स. काजळ घालणें.
**कजली**–स्त्री. काळोखी, पारा व गंधक यांच्या मिश्रणाची पूड, पावसांत येणारा एक सण, काळे डोळे असलेली गाय.
**कजली तीज**–स्त्री. भाद्रपद वद्य तृतीया.
**कजली बन**–पु. केळीचें बन, आसामांतील हत्ती असलेलें अरण्य.
**कजलौटा**–पु. काजळाची डबी.
**कजलौटी**–स्त्री. काजळाची लहान डबी.
**क़ज़ा**–स्त्री. मृत्यु.
**क़ज़ाक, क़ज़्ज़ाक**–पु. डाकू, लुटारू.
**क़ज़ाकी**–स्त्री. लुटारूपणा, कपट.
**कजावा**–पु. उंटाच्या पाठीवरील लांकडी सांगाडा.
**कजिया**–पु. भांडण.
**कजी**–स्त्री. वांकडेपणा, दोष.
**कज्जल**–पु. काजळ, सुरमा, ढग, काळोखी, एक छंद.
**क़ज़्ज़ाक**–पु. लुटारू.
**कट**–पु. हत्तीचें गंडस्थळ, गंडस्थळ, प्रेत, प्रेतयात्रा, स्मशान, एक प्रकारचा काळा रंग, तट्टी, वाळा वगैरे गवत, वेताच्या रोपट्याप्रमाणें असणारें एक रोपटें, चटई.
**कटक**–पु. फौज, शिबिर, कंकण, पर्वताचा मध्य भाग, ढुंगण, गवताची चटई, समूह, हत्तीच्या दांतावर बसविलेलें पितळी टोंपण.
**कटकई-काई**–स्त्री. सेना, सैन्य.
**कटकट**–स्त्री. दातांचा कटकट आवाज, भांडण.
**कटकटाना**–क्रि. अ. दांत वाजणें.
**कटकबाला**–पु. मुदतीची विक्री.
**कटकोल**–पु. पिकदाणी.
**कटखना**–वि. कापून खाणारा, दांतानें तोडणारा. –पु. युक्ति.
**कटघरा-हरा**–पु. मोठा पिंजरा, लांकडी घर.
**कटजीरा**–पु. काळें जिरें.
**कटड़ा**–पु. म्हशीचें पोर (पारडू).
**कटती**–स्त्री. विक्री, कपात, धान्याची कापणी.
**कटती कहना**–मर्मभेदी बोलणें
**कटना**–क्रि. अ. कापलें जाणें, लढाईंत मरणें, रस्ता संपणें, दळणें, निःशेष भाग लागणें, खोडलें जाणें, धारेच्या वस्तूनें जखम होणें, एकादा भाग वेगळा होणें, नष्ट होणें, वेळ जाणें, फसवून निघून जाणें, लज्जित होणें, द्वेष करणें, मोहित होणें, मिळकत होणें.
**कटर**–स्त्री. एक प्रकारची मोटी नाव, लहान नाव.
**कटरा**–पु. लहान चौकोनी बाजार, म्हशीचा पाडा.
**कटवाँ**–वि. कापून तयार केलेला, कांटेदार.
**कटवाँ ब्याज**–कटमुदतीचें व्याज.
**कटसरैया**–स्त्री. एक कांटेरी झाड.
**कटहरा**–पु. पिंजरा, लांकडी घर. –स्त्री.

एक गोडा मासा.
**कटहल-र**–पु. फणस, फणसाचें झाड.
**कटहा**–वि. चावरा.
**कटा**–पु. कापाकापी. –वि. कापलेला, फुटलेला, तुटलेला. [पीक कापण्याची मजूरी.
**कटाअी**–स्त्री. कापणी, कापण्याचे काम,
**कटाऊ**–पु. काटछाट.
**कटाकट**–पु. कटकट, आवाज, भांडण.
**कटाकटी**–स्त्री. कापाकापी.
**कटान**–स्त्री. कापण्याची क्रिया किंवा प्रकार.
**कटाना**–क्रि. स. कापविणें.
**कटार**–स्त्री. कट्यार.
**कटारा**–पु. चिंचेचें बोटुक, ब्रम्हदंडी, मोठी कट्यार. [विळा.
**कटारी**–स्त्री. कट्यार, नारळ सोलण्याचा
**कटाव**–पु. कापणें, कापून केलेली वेलबुट्टी.
**कटावदार**–वि. खोदकाम केलेलें.
**कटावन**–पु. कात्रण, कापण्याचें काम.
**कटास**–पु. रानमांजर, कट्यार.
**कटाह**–पु. उंचवटा, मोठी कढई, कासवाची पाठ, विहीर, नरक, झोपडी, म्हशीचें
**कटि**–स्त्री. कमर, हत्तीचें गंडस्थळ. [पोर.
**कटिबद्ध**–वि. तत्पर, कंबर बांधलेला.
**कटिया**–स्त्री. पैलू पाडण्याचें काम, तुकडे
**कटिसूत्र**–पु. करगोटा. [केलेला चारा.
**कटीला**–वि. तीक्ष्ण, परिणामकारक, मोहित करणारा, झोकदार, कांटेदार, कांट्यांनीं भरलेला, टोंकदार. [रुद्ध वर्णयोजना.
**कटु**–वि. कडू, अनिष्ट, काव्यांत रसावि-
**कटुआ**–पु. काळ्या रंगाचा पिकाचा किडा,
**कटूमर**–स्त्री. जंगली अुंबर. [पाट.
**कटोरदान**–पु. पितळेचें झांकणासहित भांडें.
**कटोरा**–पु. रुंद तोंडाचें बैठें भांडें.
**कटोरा चलाना**–मंत्रबलानें चोर पकडण्याचा होरा पाहणें.
**कटौती**–स्त्री. देण्याच्या पैशांतून ठरलेला किंवा धर्मार्थ पैसा कापून घेणें.
**कट्टर**–वि. चावणारा, हट्टी, अंधश्रद्धाळू.
**कट्टहा**–पु. महाब्राह्मण. [जबडा.
**कट्टा**–वि. घट्टाकट्टा, बळकट. –पु.
**कट्टे लगना**–दुसऱ्याच्या हातीं लागणें.
**कट्ठा**–पु. जमीन मोजण्याचें पांच हात चार अंगुळें लांबीचें माप, वाईट गहूं.
**कठ**–पु. एक ऋषि, लाकूड, एक यजुर्वेदीय उपनिषद, जंगली.
**कठकलेजी**–वि. पाषाणहृदयी.
**कठकेला**–पु. एक प्रकारचें बेचव केळें.
**कठकोल**–पु. सुतार पक्षी.
**कठताल**–पु. टाळी, झांज.
**कठपुतली**–स्त्री. लांकडी बाहुली, दुसऱ्याच्या सांगण्याप्रमाणें वागणारी व्यक्ति. [पेटी, लांकडी भांडें.
**कठड़ा–रा**–पु. लाकडी पिंजरा, लांकडी
**कठफोड़ा–फोड़वा**–पु. सुतार पक्षी.
**कठबंधन**–पु. हत्तीचा खोडा.
**कठबाप**–पु. सावत्र बाप.
**कठबेल**–पु. कवठाचें झाड.
**कठमलिया**–पु. वैष्णव, ढोंगी साधु.
**कठमस्त**–वि. व्यभिचारी, अडदांड.
**कठमस्ती**–स्त्री. मस्ती, गुंडगिरी.
**कठमुल्ला**–वि. अडेलतट्टू.
**कठला**–पु. मुलांच्या गळ्यांत घालावयाची
**कठहुज्जती**–स्त्री. भांडकुदळेपणा. [माळ.
**कठिन**–वि. कठोर, कठीण. [असाध्यता.
**कठिनाई**–स्त्री. कठोरता, कठीणपणा,
**कठिनी**–स्त्री. खडू, लेखणी, कुदळ,

मडकें, गेरू, खारी जमीन.
**कठिया**–वि. जाड व कठीण कवच असलेलें.
**कठियाना**–क्रि. अ. वाळून कडक होणें.
**कठुआ(वा)ना**–क्रि. अ. थंडीनें काकडणें, वाळून लांकडासारखें कठीण होणें.
**कठुला**–पु. हार, माला.
**कठूमर**–पु. जंगली औदुंबर.
**कठैला**–पु. वाडगा. [ वाडगा.
**कठौता**–पु. लाकडाचें मोठें रुंद भांडें,
**कड़क**–स्त्री. घोड्याचा वायुवेग, गर्जना, मूत्ररोग, कळ, वीज, चमक.
**कड़कड़**–पु. कडकड असा आवाज, कडक वस्तु तुटल्याचा आवाज. [लेला, प्रचंड.
**कड़कड़ना**–वि. कडकड शब्द करीत अस-
**कड़कड़ाना**–क्रि.अ. कडकड आवाज होणें, (तेल, तूप वगैरे) खूप तापणें. –क्रि. स. (तूप, तेल वगैरे) खूप तापविणें.
**कड़कड़ाहट**–स्त्री. जोराचा आवाज.
**कड़कना**–क्रि. अ. कडकड आवाज होणें, दम भरणें, फाटणें.
**कड़क नाल**–स्त्री. रुंद तोंडाची तोफ.
**कड़क बिजली**–स्त्री. चंद्राकार बाळी, तोंडेदार बंदुक. [ गीत.
**कड़खा**–पु. लढाईच्या वेळीं गाइलें जाणारें
**कड़खैत**–पु. भाट, रणगीत गाणारा.
**कड़बड़ा**–वि. कांहीं केस पांढरे व कांहीं
**कड़बी–वी**–स्त्री. कडवा. [ काळे असलेला.
**कड़ा**–पु. हातांत किंवा पायांत घालावयाची कडी, एक प्रकारचें कबूतर. एकाद्या धातूची आंगठी किंवा कडें. –वि. कठिण, कठोर, उग्र, कसलेलें, कोरडा, धष्टपुष्ट, प्रचंड, सोशिक, दु:साध्य, असह्य, कर्कश.
**कड़ाई**–स्त्री. कठोरता, कडकपणा. [ उपवास.
**कड़ाका**–पु. कठिण वस्तु तुटण्याचा आवाज,
**कड़ाकेका**–जोराचा, जोरदार, जलद, खूप.
**कड़ाबीन**–स्त्री. लहान बंदुक, रुंद तोंडाची
**कड़ाहा**–पु. मोठी कढई. [ बंदुक.
**कड़ाही**–स्त्री. लहान कढई.
**कड़िहार**–काढणारा.
**कड़ियल**–पु. खापर. –वि. कठोर.
**कड़ी**–स्त्री. कडी, कडवें, लहान बंधारा, संकट, लगाम. –वि. कठिण, कठोर.
**कड़ीदार**–वि. कड्या असलेला.
**कड़ुआ**–वि. कडू, रागीट, अप्रिय, कठिण.
**कड़ुआ करना**–पैसे घालविणें.
**कड़ुआ घूँट**–कठिण गोष्ट, अपमान.
**कड़ुआ मुँह**–कडू शब्द बोलणारें तोंड.
**कड़ुआ होना**–वाईट होणें.
**कड़ुए कसैले दिन**–वाईट दिवस.
**कड़ुआना**–क्रि. अ. कडू लागणें, रागावणें,
**कड़ुआहट**–स्त्री. कडूपणा. [ डोळे दुखणें.
**कड़ुवी रोटी**–सुतकाचे पहिले तीन दिवस नातेवाईक पाठवितात तें अन्न.
**कड़ेरा**–पु. धार लावणारा.
**कड़ोड़ा**–पु. फार मोठा अधिकारी.
**कढ़ना**–क्रि. अ. निघणें, उगवणें, पुढें जाणें, दूध आटणें, प्रतिस्पर्ध्यावर विजय मिळविणें.
**कढ़ जाना**–हात धरून जाणें, आटून जाणें.
**कढ़नी**–स्त्री. घुसळखांबाची दोरी.
**कढ़लाना**–क्रि. स. ओढणें, बाहेर काढणें.
**कढ़ाई**–स्त्री. कढई, कशीद्याचें काम व त्याची मजूरी.
**कढ़ाना, कढ़वाना**–क्रि. स. काढविणें.
**कढ़ाव**–पु. कशीदा.

**कढ़ेरना**–पु. सोन्याचांदीच्या भांड्यांवर नकशी काढण्याची छिन्नी.

**कढ़ोरना**–क्रि. स. ओढणे.

**कत**–पु. लेखणीचें टोंक.–अ. कां, कशासाठीं.

**क़तई**–अ. अगदीं.

**कतना**–क्रि. अ. कांतलें जाणें.

**कतन्नी**–स्त्री. कातर.

**कतब**–पु. लेख.

**कतरन**–स्त्री. कापड किंवा कागद वगैरे कापलेले रद्दी तुकडे, कातरण.

**कतरना**–क्रि. स. कातरणें.

**कतरनी**–स्त्री. कातर.

**कतरब्योंत**–स्त्री. काटछाट, उलटापालट, विचार, युक्ति, हिशोबांत बसविणें.

**क़तरा**–पु. बिंदु, थेंब. [तुकडा, मोठी नाव.

**कतरा**–पु. कापलेला तुकडा, दगडाचा लहान

**कतराई**–स्त्री. कातरण्याचें काम, कातरण्याची मजूरी.

**कतराना**–स्त्री. चुकविणें. –क्रि. स. कातरविणें.

**क़तल**–पु. वध, संहार.

**क़तलबाज़**–पु. वधिक, कत्तल करणारा.

**क़तला**–पु. तुकडा.

**क़तलाम-क़त्लेआम**–पु. सर्व संहार.

**क़तली**–स्त्री. मिठाईचा चौकोनी तुकडा.

**कतवाना**–क्रि. स. कांतविणें.

**कतवार**–पु. केरकचरा.

**कतवारख़ाना**–पु. उकिरडा.

**कतहुं (हूं)**–अ. कोठेंहि. [पद्धत

**कता**–स्त्री. घाट, तऱ्हा, कपडे कातरण्याची

**कता करना**–कापड बेतणें. [ण्याचें काम.

**कताई**–स्त्री. कांतण्याबद्दलची मजूरी, कांत-

**क़ताकलाम**–पु. मध्येंच बोलणें.

**कतान**–पु. एक प्रकारचें रेशमी कापड, अळशीचें झाड, एक प्रकारची मलमल.

**कताना**–क्रि. स. कांतविणें.

**क़तार**–स्त्री. ओळ, समूह.

**कतारा**–पु. लाल ऊंस.

**कति,**–वि. किती, कोण, अगणित.

**कतिपय**–वि. कित्येक, थोडेसे.

**कतीरा**–पु. स्वच्छ पांढरा गोंद.

**कतेक**–वि. कित्येक, पुष्कळ.

**कतौनी**–स्त्री. कांतण्याबद्दलची मजूरी, एकादें काम करण्यास बराच वेळ बसून रहाणें. [लहान तलवार.

**कत्ता**–पु. बांबू कापण्याचें हत्यार, फांसा,

**कत्ती**–स्त्री. सुरी, लहान तलवार, कट्यार, सोनाराची कात्री, पगडी.

**कत्थई**–वि. काताच्या रंगाचा.

**कत्थक**–पु. नाचणारी एक जात.

**कत्था**–पु. कात, खैराचें झाड.

**कत्बा**–पु. भिंतीवर कोरलेला लेख.

**कथंचित्**–अ. कदाचित. [पुराणिक.

**कथक-क्कड़**–पु. पुष्कळ गोष्टी सांगणारा,

**कथना**–क्रि. स. सांगणें, निंदा करणें.

**कथनीय**–वि. वर्णन करण्यास योग्य, निंदनीय.

**कथरी**–स्त्री. गोधडी.

**कथानक**–पु. गोष्ट, लघुकथा.

**कथामुख**–पु. गोष्टीच्या पुस्तकाची

**कथावस्तु**–स्त्री. कथानक. [प्रस्तावना.

**कथावार्ता**–स्त्री. अनेक प्रकारच्या गप्पागोष्टी. [धाराचें बोलणें.

**कथोद्घात**–पु. प्रस्तावना, नाटकांत सूत्र-

**कथोपकथन**–पु. संभाषण, वादविवाद.

**कद**–स्त्री. द्वेष, हट्ट, परिश्रम. –अ. कधीं.

**क़द**–पु. उंची, बांधा.

**कदंब**–पु. कळंबवृक्ष, मोहरी, देवताड,

हळद, शिरस, शिशिर ऋतु, निर्गुणी पुरुष, शततारका, देवडांगर. समूह, मध.
**क़द्आवर**—वि. उंच बांध्याचा.
**कदन**—पु. मरण, वध, युद्ध, पाप, दुःख.
**कदन्न**—पु. वाईट अन्न, कदान्न.
**कदम**—पु. कदंबवृक्ष, एक प्रकारचें गवत.
**क़दम**—पु. पाऊल, घोड्याच्या चालीचा एक प्रकार, दोन पावलांतील अंतर, चिखलांत किंवा धुळींत उठलेलीं पाउलें.
**क़दम उठाना**—लवकर चालणें, उन्नति करणें.
**क़दम चूमना**—अत्यंत आदर करणें.
**क़दम छूना**—नमस्कार करणें, शपथ घेणें.
**क़दम रखना**—प्रवेश करणें, पाऊल टाकणें.
**क़दम पर क़दम रखना**—अनुकरण करणें, मागें मागें चालणें.
**क़दमचा**—पु. संडासांत पाय ठेवण्याकरितां केलेली जागा.
**क़दमबोसी**—स्त्री. पाद चुंबन, वडिलांची सेवा करणें.
**कदमा**—स्त्री. एक मिठाई.
**क़दर**—स्त्री. मान, प्रतिष्ठा.
**क़दरदान**—वि. गुणग्राहक.
**क़दरदानी**—स्त्री. गुणग्राहकता.
**कदराना**—क्रि. अ. भिणें, माघार घेणें.
**कदर्य**—पु. केरकचरा.—वि. वाईट.
**कदर्थित**—वि. दुर्दशा झालेला.
**कदर्य**—वि. कंजूस.
**कदरी**—स्त्री. साळुंकी. [हरीण.
**कदली**—स्त्री. केळ, एक झाड, एक तऱ्हेचें
**कदह**—पु. वाडगा, खंडन.
**कदा**—अ. कधीं.
**कदाकार**—वि. कुरूप.
**कदाच**—अ. कदाचित्.
**कदाचार**—पु. वाईट आचरण.
**क़दामत**—स्त्री. प्राचीनता.
**क़दामतपसंद**—वि. पुराणमतवादी.
**क़दावर**—वि. उंचा पुरा.
**कदी**—वि. हट्टी. —अ. कधीं.
**क़दीम**—मी वि. प्राचीन.
**कदुष्ण**—वि. थोडेंसे उष्ण.
**कदूरत**—स्त्री. द्वेष, घाण.
**कदे**—अ. केव्हांही.
**क़दे आदम**—वि. मनुष्याच्या उंचीचा.
**कद्दावर**—वि. उंच बांध्याचा.
**कद्दू**—पु. दुधीभोपळा.
**कद्दूकश**—पु. किसणी, एक मिठाई.
**कद्दूदाना**— पु. जंत.
**कधी**—अ. केव्हां.
**कनंगली**—स्त्री. करंगळी.
**कन**—पु. कण, भिक्षा, वाळूचा कण, शारीरिक शक्ति, उष्टें, धान्याचा कण.
**कनककली**—पु. बुगडी, लवंग.
**कनअुड़**—वि. पहा 'कनौड़ा.'
**कनकचंपा**—स्त्री. सोनचांफा.
**कनकजीरा**—पु. चिमणसाळ. [कापणारा.
**कनकटा**—वि. कान कापलेला, कान
**कनकना**—वि. ठिसूळ, चुरचुरणारा, चिडका, अरुचिकर. [होणें, सावध होणें.
**कनकनाना**—क्रि. अ. चुरचुरणें, रोमांचित
**कनकनाहट**—स्त्री. खाज, चुरचुर.
**कनकफल**—पु. धोत्र्याचें फळ, जमालगोटा.
**कनकाचल**—पु. सोन्याचा पर्वत, मेरु पर्वत.
**कनकी**—स्त्री. तांदळाची कणी, कण.
**कनकूत**—पु. शेतांतील पिकाबद्दल अनुमान.
**कनकौवा**—पु. पतंग, वावडी.
**कनखजूरा**—पु. घोण.
**कनखियाना**—क्रि.स. तिरप्या नजरेनें पाहाणें,

डोळ्यानें खूण करणें.
**कनखी**–स्त्री. तिरपी नजर, डोळ्याची खूण.
**कनखी मारना**–डोळ्यानें खूण करणें.
**कनखोदनी**–स्त्री. कानकोरणें.
**कनगुरिया**–स्त्री. करंगळी.
**कनछेदन**–पु. कान टोचणें.
**कनटोप**–पु. कानटोपी.
**कनधा (हा) र**–पु. कर्णधार, नावाडी.
**कनपटी**–स्त्री. कानशील.
**कनपेड़ा**–पु. कानाचा एक रोग.
**कनफटा**–पु. गोरखनाथाचे अनुयायी.
**कनफूंका–फुंकवा**–वि. दीक्षा देणारा, दीक्षा घेणारा, कान फुंकणारा.
**कनबतियाँ**–स्त्री. कानगोष्टी.
**कनबिधा**–पु. कानटोंचणारा. –वि. टोंचलेल्या कानाचा.
**कनफुसका**–वि. चुगलखोर.
**कनफुसकी**–स्त्री. कानमंत्र.
**कनफुसी**–स्त्री. कुजबुज.
**कनमनाना**–क्रि. अ. झोंपेंतून जागें होणें, एखाद्या गोष्टीविरुद्ध चळवळ करणें.
**कनमैलिया**–पु. कानांतील मळ काढणारा.
**कनरस**–पु. गाण्याचा आनंद, गाणें किंवा गोष्टी ऐकण्याचें व्यसन.
**कनरसिया**–वि. गाण्याचा शौकीन.
**कनवाँसा**–पु. पणतु.
**कनवाँसी**–स्त्री. पणती (नातवाची मुलगी.)
**कनवास**–पु. कॅनवास.
**कनसलाई**–स्त्री. लहान घोण.
**कनसार**–पु. ताम्रपटावर लेख खोदणारा.
**कनसाल**–पु. बाजेच्या खुरांचीं तिरपीं भोकें.
**कनस्तर**–पु. टीनचा चौकोनी डबा.
**कनसूओ**–स्त्री. चाहूल.
**कनहा**–पु. पिकाचें अनुमान करणारा.
**क़नाअत**–स्त्री. संतोष, संयम.
**कनाओ**–स्त्री. फांदी, डहाळी.
**कनागत**–पु. पितृपक्ष, श्राद्ध.
**क़नात**–स्त्री. तंबूचें जाड कापड.
**कनार**–पु. घोड्याचें पडसें.
**कनारी**–स्त्री. कानडी भाषा, कर्नाटकांत रहाणारा माणूस.
**कनासी**–स्त्री. कानस.
**कनिका**–पु. अतिसूक्ष्म भाग, कण.
**कनिआरी**–स्त्री. पांगारा, सोनचांफा, कण्हेर.
**कनियाँ**–स्त्री. मांडी.
**कनियाना**–क्रि. अ. डोळा चुकवून निघून जाणें, पतंग एक बाजूला झुकणें, कडेवर घेणें.
**कनियार**–पु. कण्हेर, सोनचांफा.
**कनिष्ठिका**–स्त्री. करंगळी.
**कनी**–स्त्री. लहान तुकडा, हिरकणी, तांदळाची कणी, थेंब.
**कनी खाना या चाटना**–हिरकणी खाऊन प्राण देणें.
**कनीनिका**–स्त्री. डोळ्यांतील बाहुली, कन्या.
**कनीज़**–स्त्री. दासी.
**कने**–अ. जवळ, बाजूला.
**कनेठा**–वि. एकाक्ष, चकणा. –पु. धाण्याचा दांडा.
**कनेठी**– स्त्री. कान पिरगळण्याची शिक्षा.
**कनेर**–पु. कण्हेर.
**कनौग**–पु. कोपरा, कांठ, भाऊबंद, कनिष्ठ.
**कनौड़ा**–वि. अपंग, काणा, कलंकित, लज्जित. –पु. विकत घेतलेला गुलाम, कृतज्ञ मनुष्य, तुच्छ मनुष्य.
**कनौती**–स्त्री. जनावरांचे कान, किंवा कान उभे करण्याचा प्रकार, कानांतील बाळी.
**कन्ना**–पु. पतंगाची कणी, किनारा, तांदळाची कणी, वनस्पतीवर पडणारी कीड.
**कन्नी**–स्त्री. पतंगाचें टोंक, पतंग नीट उडण्याकरितां बांधलेली कापडाची

लांबट चिंधी, किनारा. —पु. गवंड्याचें एक हत्यार.
**कन्हाई, कन्हैया**—पु. श्रीकृष्ण, अत्यंत आवडता मनुष्य, सुस्वरूप मुलगा.
**कपट**—पु. कपट, लपंडाव. [वेगळें करणें.
**कपटना**—क्रि. स. छाटून टाकणें, कापून
**कपटा**—पु. पिकें नष्ट करणारा एक किडा.
**कपटी**—वि. कपटी, कपट करणारा.
**कपड़छ(छा)न**—पु. एकादी बारीक केलेली वस्तु कपड्यानें चाळण्याचें कार्य.
**कपड़द्वार**—पु. कपड्यांचें भांडार.
**कपड़मिट्टी**—स्त्री. ओल्या मातीचा लेप दिलेलें कापड. [कापड.
**कपड़धूलि**—स्त्री. एक प्रकारचें तलम रेशमी
**कपड़ा**—पु. कापड़, पोषाख.
**कपड़े आना, कपड़ोंसे होना**—रजस्वला होणें.
**कपड़े उतार लेना**—लुटणें.
**कपड़े रंगना**—साधु होणें. [कापड.
**कपड़ौ(रौ)टी**—स्त्री. मातीच्या लेपाचें
**कपर्द, कपर्दक**—पु. शंकराची जटा, कौडी,
**कपर्दिका**—स्त्री. कौडी. [उत्कर्ष.
**कपर्दिनी**—स्त्री. दुर्गा.
**कपर्दी**—पु. शंकर, अकरा रुद्रांपैकीं अेक.
**कपसा**—स्त्री. चिखल, मडक्यावर रंग चढ-
**कपार**—पु. कपाळ. [विण्याची चिक्कण माती.
**कपालक्रिया**—स्त्री. जळत असलेल्या प्रेताचें बांबूनें किंवा लाकडानें डोकें फोडण्याची क्रिया. [जात.
**कपाली**—पु. शंकर, भैरव, भिकारी, अेक
**कपास**—स्त्री. कापूस.
**कपासी**—वि. फिक्या पिवळ्या रंगाचा. —पु. फिक्का पिवळा रंग.
**कपि**—पु. वानर, हत्ती, सूर्य, विष्णु.
**कपित्थ**—पु. कवठाचें झाड किंवा फळ, ताक.
**कपिल**—वि. पांढरा, मळकट, पांढऱ्या रंगाचा.—पु. अग्नि, कुत्रा, ऊंद, शिलाजित, महादेव, सूर्य, विष्णु, सांख्य शास्त्राचे मूळ प्रवर्तक ऋषि. —स्त्री. काळी द्राक्षें, जळू, पिंगट गाय, पुंडरीक दिग्गजाची स्त्री, शिसव, कोरफड.
**कपिला**— वि. भोळी, पांढऱ्या रंगाची, धुरकट रंगाची, पांढऱ्या ठिपक्याची. —स्त्री. पांढऱ्या रंगाची गाय, गरीब गाय, दक्षाची कन्या.
**कपी**—स्त्री. गरडी, कप्पी.
**कपूत**—पु. कुपुत्र.
**कपूती**—स्त्री. नालायकी.
**कपूर**—पु. कापूर.
**कपूरकचरी**—स्त्री. एक सुगंधित वनस्पति.
**कपूरकाट**—पु. सुवासिक तांदुळाची जात.
**कपूर खाना**— विष खाणें.
**कपूरा**—पु. बकऱ्याचा अंडकोश.
**कपोत**—पु. कबूतर, पारवा, पक्षी, पांढऱ्या
**कपोल**—पु. गाल. [रंगाचा कच्चा सुरमा.
**कप्पर**—पु. कपडा. [वस्त्र.
**कप्फा**—पु. अफूचा फेस, अफू वाळविण्याचें
**कपोलकल्पित**—वि. बनावट.
**कफ**—पु. फेस, कफ.
**कफ़**—पु. हाताचा तळवा, पायाचा तळवा, फेस, कफ (शर्टचे).
**कफ़गीर**—पु. झारा, लांब पळी.
**कफ़न**—पु. प्रेताला घालावयाचें वस्त्र.
**कफ़नको कौड़ी न होना**—अत्यंत दरिद्री असणें. [अकस्मात प्रगट होणें.
**कफ़न फाड़कर अुठना**—प्रेत जिवंत होणें,

**कफ़न चिल्लाना या कफ़न बोलना**–अचानक आरडाओरड करणें.
**कफ़न सिरसे बांधना**–शिर तळहातीं घेणें.
**कफ़नखसोट**–वि. अत्यंत लोभी.
**कफ़नखसोटी**–स्त्री. प्रेतावरील अर्धे वस्त्र फाडून घेण्याचा डोंबाचा हक्क, बऱ्या वाईट मार्गानें पैसा मिळविण्याची वृत्ति, कंजूषपणा.
**कफ़नचोर**–पु. अट्टल चोर.
**कफ़नाना**–क्रि. स. गाडण्याकरितां किंवा जाळण्याकरितां प्रेताला कपडयांत लपेटणें.
**कफ़नी**–स्त्री. प्रेताच्या गळयांत घालावयाचें वस्त्र, साधूंची कफनी.
**कफ़स**–पु. पिंजरा, कैदखाना, अरुंद जागा, कबुतरांचें लांकडी घर.
**कफ़ा(फ़्फ़ा)रा**–पु. प्रायश्चित्त.
**कफ़ालत**–पु. जामिनकी.
**कफ़िला**–पु. जहाजांत डेकवर लावलेल्या फळ्या.
**कफ़ील**–पु. जामीन.
**कब**–अ. केव्हां.
**कबक, कब्क**–पु. चकोर.
**कब कब**–अ. कधींतरी.
**कबड्डी**–स्त्री. हुतुतू (खेळ), पक्षी पकडण्याचा फांस.
**क़बर**–स्त्री. समाधि, थडगें.
**कबरा**–वि. पांढरे काळे डाग असलेला.
**क़बरिस्तान**–पु. स्मशान.
**क़बल, क़ब्ल**–अ. अगोदर. –वि. पूर्वीचा.
**क़बा**–पु. पायघोळ अंगरखा.
**कबाड़**–पु. निरुपयोगी वस्तु, निरुपयोगी काम.
**कबाड़ा**–पु. लुडबुड, तंटा.
**कबाड़िया, कबाड़ी**–पु. जुना माल विकणारा मनुष्य, हलकें सलकें काम करणारा मनुष्य, भांडखोर माणूस.
**कबाब**–पु. लोखंडी शिगेवर भाजलेलें मांस.
**कबाबचीनी**–स्त्री. कंकोळ.
**कबाबी**–वि. कबाब विकणारा, मांसाहारी.
**कबार**–पु. व्यापार, निरुपयोगी वस्तु. निरुपयोगी काम, हलकें काम.
**कबाला**–पु. एका माणसाची संपत्ति दुसऱ्याच्या नांवावर करविलेला कागद.
**कबालानवीस**–पु. खत पत्रें लिहिणारा कारकून.
**कबाला नीलाम**–पु. लिलाव घेणाऱ्यास दिलेलें अधिकारपत्र.
**कबाला लिखाना**–दस्तऐवज लिहविणें.
**कबादत**–स्त्री. वाईटपणा, अडचण.
**कबीर**–वि. श्रेष्ठ, महान.–पु. कबीर नांवाचा संत, होळीच्या दिवसांत गावयाचें एक अश्लील गाणें.
**कबीरबड़**–पु. नर्मदातटीं भडोच जवळचा अेक जुना वटवृक्ष.
**कबीला**–स्त्री. बायको.
**कबुलवाना, कबुलाना**-क्रि.स. कबूल करविणें.
**कबूतरबाज़**–वि. ज्याला कबूतरें उडविण्याची हौस आहे असा.
**कबूद**–वि. निळें, नीलकंठी.
**क़बूल**–पु. स्वीकार.
**क़बूलना**–क्रि. स. स्वीकारणें.
**क़बूलियत**–स्त्री. मंजूरीचा दस्तऐवज.
**कबूली**–स्त्री. चण्याच्या डाळीची खिचडी.
**क़ब्ज़**–पु. अधिकार, मलावरोध.
**क़ब्ज़ा**–पु. मूठ, अधिकार, बिजागरी.
**क़ब्ज़ेपर हाथ डालना**–म्यानांतून तलवार काढण्याकरितां मुठीवर हात ठेवणें.
**क़ब्ज़ादार**–पु. अधिकारी.–वि. मूठ असलेलें.
**क़ब्ज़ियत**–स्त्री. मलावरोध.
**क़ब्र**–स्त्री. प्रेतें गाडण्याचा खळगा, समाधि.

**क़ब्रका मुँह झाँकना**–मरतां मरतां वाचणें.
**क़ब्रमें पैर या पाँव लटकाना**–मसणांत गोवऱ्या जाणें.
**क़ब्रगाह,क़ब्रिस्तान**–पु.प्रेतें गाडण्याची जागा.
**कभी**–अ. कधींतरी, कधीं.
**कभी का**–केव्हांचा, कधींचा.
**कभी कभार, कभी कभी**–कधींमधीं.
**कभी न कभी**–केव्हांतरी, कधींतरी.
**कभू**–अ. पाहा'कभी'. [चित्रकार. –वि. दक्ष.
**कमंगर**–पु. धनुष्य बनविणारा, हाडवैद्य,
**कमंगरी**–स्त्री. धनुष्य बनविण्याचा धंदा किंवा कला, हाडवैद्यकी, चित्रकारी, कुशलता.
**कमंचा**–पु. गिरमिट फिरविण्याची धनुकली.
**कमंडल**–पु. कमंडलु. [दोरी.
**कमंद**–पु. धड,–स्त्री. फांस, फांस असलेली
**कम**–वि. थोडें, वाईट.–अ. फारसा नाहीं.
**कमसे कम**–कमींत कमी.
**कमअसल**–वि. वर्णसंकर, अकुलीन.
**कमकस**–वि. आंगचोर, आळशी.
**कमख़ाब**–पु. जरीचें काम केलेला रेशमी कपडा. [छत.
**कमचा**–पु. लहान कमान, सारंगी, मेहरपदार
**क़मची**–स्त्री. बारीक लवचिक डहाळी, बारीक छडी, लाकडाची पातळ पट्टी.
**कमच्छा**–स्त्री. कामरूप, एका देवीचें नांव.
**कमज़ोर**–वि. अशक्त.
**कमज़ोरी**–स्त्री. दुर्बलता.
**कमठ**–पु. कांसव, साधूचा तुंबा, बांबू.
**कमठा**–पु. धनुष्य.
**कमठी**–स्त्री. कांसवी, पट्टी, कामटी.
**कमती**–वि. कमी.–स्त्री. कमतरता.
**कमनसीब**–वि. दुर्दैवी.
**कमनसीबी**–स्त्री. दुर्दैव.
**कमना**–क्रि. अ. कमी होणें.
**कमनीय**–वि. सुंदर, इच्छा करण्याजोगा.
**कमनैत**–पु. तिरंदाज.
**कमनैती**–स्त्री. तिरंदाजी.
**कमबख़्त**–वि. अभागी.
**कमबख़्ती**–स्त्री. दुर्दैव.
**कमयाब**–वि. दुर्लभ.
**कमर**–स्त्री. कंबर, एखाद्या वस्तूचा मधला बारीक भाग, सदऱ्याचा वगैरे कमरेवरील भाग.
**कमर कसना या बाँधना**–तयार होणें.
**कमर टूटना**–निराश होणें. [होणें.
**कमर खोलना**–विश्रांति घेणें, निरुत्साही
**कमर सीधी करना**–अंग मोकळें करणें.
**क़मर**–पु. चंद्र.
**कमरकस**–पु. पळसाचा डिंक. [भिंत, तट.
**कमरकोट–टा**–पु. रक्षणाकरितां बांधलेली
**कमरकोष**–पु. सज्ज्याची पुढें आलेली लग.
**कमरख**–पु. करमळ फळ, करमळ.
**कमरखी**–वि. करमळाच्या आकाराचें.
**कमरटूटा**–वि. कुबडा, नामर्द, सुस्त.
**कमरबंद**–पु. नाडी, कमरेला बांधावयाचा पट्टा, पेटी. –वि. तत्पर.
**कमरबल्ला**– पु. छपरांतील आडवें लांकूड, किल्ल्याचा तट. [कांबळें.
**कमरा**–पु. खोली, फोटो काढण्याचा कॅमेरा,
**कमरिया**–पु. ठेंगणा हत्ती. –स्त्री. कांबळे, कंबर.
**कमल**–पु. कमळ, मूत्राशय, पाणी, तांबें, एक प्रकारचें हरीण, सारस, डोळा, सहा मात्रांचा एक छंद, मेणबत्ती लावण्याचा एक कांचेचा ग्लास, कावीळ, गर्भाशय.

**कमल अुलट जाना**—गर्भाशय अुलटा होणें.
**कमल खिलना**—चेहरा खुलणें.
**कमल गट्टा**—पु. कमळाचें बी.
**कमलज**—पु. ब्रह्मा.
**कमलनाथ**—पु. विष्णु.
**कमलनाल**—स्त्री. कमळाचा देठ.
**कमलबाई**—स्त्री. कावीळ.
**कमलयोनि**—पु. ब्रह्मा.
**कमला**—स्त्री. लक्ष्मी, संपत्ति, मोठें संतरें, कावीळ. —पु. सुरवंट.
**कमलालया**—स्त्री. लक्ष्मी.
**कमली**—पु. ब्रह्मा. —स्त्री. लहान कांबळी.
**कमवाना**—क्रि. स. मिळविण्याचें काम दुसऱ्याकडून करविणें.
**कमसमझी**—स्त्री. अडाणीपणा, कमी समजूत.
**कमसिन**—वि. कमी वयाचा-वयाची.
**कमसिनी**—स्त्री. बालपण.
**कमाअी**—स्त्री. मिळकत, व्यवसाय.
**कमाऊ**—वि. कमविणारा.
**कमाच**—पु. रेशमी कापड.
**कमान**—स्त्री. धनुष्य, तोफ, बंदुक, आज्ञा, फौजेंतील नोकरी, इंद्रधनुष्य, कमान.
**कमान चढ़ना**—राग येणें.
**कमान पर जाना**—लढाईवर जाणें.
**कमान बोलना**—नोकरीवर किंवा लढाईवर जाण्याची आज्ञा देणें.
**कमानचा**—पु. लहान महिराप, सारंगी वाजविण्याची धनुकली. [ बनविणें.
**कमाना**—क्रि. स. मिळविणें, कामाला योग्य
**कमानिया**—पु. तिरंदाज. —वि. धनुष्याकार.
**कमानी**—स्त्री. कमान. [ धनुकली.
**कमायज**—स्त्री. तंतुवाद्य वाजविण्याची
**कमाल**—पु. पूर्णता, कौशल्य, अद्भुत कार्य, कबीराचा मुलगा. —वि. पूर्ण, सर्वांत उत्तम, पुष्कळ.
**कमालियत**—स्त्री. पूर्णता, निपुणता.
**कमासुत**—वि. मिळवता, उद्योगी.
**कमी**—स्त्री. उणीव, नुकसान.
**क़मीज़-स**—स्त्री. शर्ट, सदरा.
**कमीन**—पु. शिकारी लपण्याची जागा, शिकारीची वाट पहात लपून बसणें.
**कमीनगाह**—पु. शिकारी लपण्याची जागा.
**कमीना**—वि. नीच.
**कमीनापन**—पु. नीचता.
**कमीला**—पु. कपिला वृक्ष. (याच्या फळाचा लाल रंग रेशमास देतात)
**कमुवा**—पु. वल्हय़ाचा दांडा.
**कमून**—पु. जिरें.
**कमेरा**—पु. मजूर, नोकर.
**कमेला**—पु. वधस्थान, खाटिकखाना. [ सांचा.
**कमेहरा**—पु. बांगड्या करण्याचा मातीचा
**कमोद (दि) न**—स्त्री. चंद्र-विकासी कमळ,
**कमोरा**—पु. मातीचें भांडें. [ कुमुद.
**कमोरी**—स्त्री. मातीची घागर.
**कमोबेशी**—वि. अधिक उणें.
**कम्बख़्त**—वि. दुर्दैवी.
**कम्बख़्ती**—स्त्री दुर्दैव.
**कम्बल, कम्मल**—पु. घोंगडी.
**कम्मा**—पु. ताडपत्रावर लिहिलेला लेख.
**कयपूती**—स्त्री. निलगिरीचें झाड.
**क़याफ़ा**—पु. चेहरा, आकृति.
**क़याम**—पु. ठिकाण, विश्रामस्थान, स्थिरता.
**क़यामत**—स्त्री. प्रलयकाळ, खळबळ, प्रलय.
**क़यास**—पु. अनुमान.
**क़यासी**—वि. कल्पित. [ पंजर.
**करंक**—पु. मस्तक, कमंडलु, करवंटी, अस्थि-

**करंगा-गी**–पु. एक प्रकारचा जाड तांदूळ.
**करंज**–पु. एक प्रकारचें झाड, एक प्रकारचें दारूकाम, कोंबडा. –वि. घाऱ्या डोळयांचा.
**करंड**–पु. मधाचें मोहोळ, तलवार, करंडक नांवाचा हंस, टोपली, हत्यारांना धार लावण्याचा दगड.
**करंडी**–स्त्री. कच्च्या रेशमाचें वस्त्र.
**करंतीन**–पु. स्पर्शजन्य रोगाची सांथ असलेल्या भागांतून दुसऱ्या भागांत आलेल्या लोकांना कांहीं दिवस वस्ती करण्यास दिलेली वेगळी जागा.
**करंहि**–स्त्री. जोडे शिवण्याची ऐरण.
**कर**–पु. हात, सोंड, किरण, महसूल, गार (बर्फाची), युक्ति, संबंधकारकाचा प्रत्यय.
**करक**–पु. कमंडलु, डाळिंब, पळस, वकुल, पानें नसलेलें कांटेरी झाड.–स्त्री. वळ, थांबून थांबून येणारी कळ.
**करकच**–पु. समुद्रापासून तयार केलेलें मीठ.
**करकट**–पु. कचरा.
**करकटिया**–पु. एकपक्षी.
**करकरना**–वि. खरखरीत. –क्रि. अ. कडकडणें, फाटणें, [ खडबडीत.
**करकरा**–पु. एक पक्षी. –वि. रवाळ,
**करकराहट**–स्त्री. कठिणपणा, डोळयांत कण खुपल्यानें होणारें दुःख.
**करकस**–वि. कर्कश.
**करखा**–पु. उत्साह, तेज, लढाईच्या वेळीं गाइलें जाणारें गाणें, . काळोखी.
**करगस**–पु. तीर, गिधाड.
**करगह**–पु. साळी कपडा विणीत असतांना पाय टाकून बसतो तो खळगा, कपडा विणण्याचें यंत्र. [ (मार्गशीर्षी).
**करगट्टी**–स्त्री. एक प्रकारचे जाड तांदुळ
**करगी**–स्त्री. साखर कारखान्यांत साखर सारखी करण्याचें यंत्र.
**करग्रह**–पु. लग्न.
**करघा**–पु. हात माग.
**करचंग**–पु. डफ, मोठी खंजिरी.
**करछा**–पु. लांब दांडीचा चमचा,
**करछाल**–स्त्री. उडी, उसळी.
**करछी**–स्त्री. पाहा 'करछा'.
**करछुला**–पु. झारा, मोठा चमचा.
**करछुली**–स्त्री. पळी, उलथणें.
**करज**–पु. नख, बोट, एक सुगंधी पदार्थ.
**करटक**–पु. कावळा, हत्तीचें कानशील.
**करटी**–पु. हत्ती. [ ध्वनि.
**करड़ करड़**–पु. कुडम कुडुम खाण्याचा
**करतब**–पु. काम, कला, करामत.
**करतबी**–वि. निपुण, करामती.
**करतरी**–स्त्री. कात्री, सुरी, लहान तलवार, ताल देण्याचें वाद्य. [ एक छंद.
**करतल**–पु. हाताचा तळवा, चार मात्रांचा
**करतली**–स्त्री. तळहात, टाळी, बैलगाडी हांकण्यास बसण्याची जागा.
**करतार**–पु. ईश्वर, टाळी, झांज, चिपळी.
**करताल**–पु. टाळी, करताळ, झांझ, चिपळचा.
**करती**–स्त्री. मेलेल्या वासराच्या कातडयांत भुसा भरून बनविलेलें वासरूं.
**करतू**–स्त्री. मोटेच्या नाडयास आडवी बांधलेली काठी (ही हातांत असते).
**करतूत**–ति स्त्री. काम, कला. [ कचरा.
**करदा**–पु. विकावयाच्या वस्तूंत मिसळलेला

**करवा काटना**–विक्रीच्या वस्तूंतील घटीचें दाम कमी करणें किंवा माल अधिक देण्याची रीति, मोड देऊन नवें भांडें घेण्यांत दिलेला बट्टा.

**करदोरा**–पु. करगोटा.

**करधनी**–स्त्री. कमरेंतील साखळी, एक प्रकारचे लालसर तांदूळ.

**करघर**–पु. ढग.

**करन**–पु. आंबट गोड लागणारी एक वनस्पति (ही चटणींत वापरतात).

**करनफूल**–पु. कानांतील दागिना.

**करनवेध**—पु. कान टोंचण्याचा संस्कार.

**करना**–पु. एक फूलझाड, काम, दर्शन, ईड लिंबू. –क्रि. स. भोगणें, शिजविणें, घेऊन जाणें (पति किंवा पत्नी रूपानें), बनविणें, एकादें पद देणें, स्वीकार करणें, धंदा सुरू करणें, दिवा विझ-[विणें, रंग देणें.

**करनाओ**–स्त्री. तुतारी.

**करनाटक**–पु. कर्नाटक प्रांत.

**करनाटकी**–वि. कर्नाटकांत राहाणारा, जादुगार.–पु. कसरतीचे खेळ दाखविणारा मनुष्य.

**करनाल**–पु. एक प्रकारची तुतारी, एकप्रकारचा मोठा ढोल, एक प्रकारची तोफ.

**करनी**–स्त्री. काम, मृताचे संस्कार, थापी [(गवंड्याची).

**करनैल**–पु. कर्नल.

**करपर**–वि. कंजूष. –पु. कवटी (डोक्याची).

**करपरी**–स्त्री. सांडगा.

**करपा**–पु. फणसाचा देठ.

**करपान**–पु. पुरळ.

**करपीडन**–पु. लग्न.

**करपृष्ठ**–पु. हाताच्या तळव्याचा मागचा [भाग.

**करबच**–पु. घोड्याच्या किंवा बैलाच्या पाठीवर लादण्याची गोण.

**करबरना**–क्रि. अ. कलरव करणें, चंचल होणें, पुष्कळ लहान लहान जीवांचें एकदम हालचाल करणें, वळवळणें.

**करबला**–पु. ज्या ठिकाणीं हुसेन मारला गेला तें अरबस्तानांतील एक रेताड मैदान, जेथें पाणी मिळत नाहीं असें ठिकाण, मुसलमानांचे ताबूत गाडण्याचें ठिकाण.

**करबाल**–स्त्री. तलवार, नख.

**करबी**–स्त्री. कडबा. [कविण्याची जागा.

**करबूस**–पु. घोड्याच्या जिनांत बंदूक लट-[कविण्याची जागा.

**करभ**–पु. हत्तीचा छावा, करपृष्ठ, उंटाचें पिल्लूं, कंबर, एक सुगंधित वनस्पति.

**करभीर**–पु. सिंह. [डिक.

**करम**–पु. कर्म, दैव, कृपा, एक प्रकारचा [डिंक.

**करमभोग**–कर्मभोग.

**करम फूटना, करम टेढ़ा होना, करम तिरछा होना**–नशीब फुटणें.

**करमका धनी**–भाग्यवान. [गोष्ट.

**करमरेख**–ललाट रेषा, नशीबांत असलेली [गोष्ट.

**करमकल्ला**–पु. कोबी.

**करमचंद**–पु. कर्म.

**करमठ**–वि. कर्मठ. [लाटा शांत होणें.

**करमरिया**–स्त्री. शांति. –वि. सागराच्या [लाटा शांत होणें.

**करमसेंक**–पु. सार्वजनिक हुक्का, कडक पोळी (कमी तुपांत भाजलेली).

**करमाली**–पु. सूर्य.

**करमी**–वि. काम करणारा, कर्मठ.

**कर(ल)मुँहा**–वि. कलंकी, काळतोंड्या.

**करमूली**–पु. एक इमारती लांकूड. [काठी.

**करमेस**–पु. हातमागाची वर बांधलेली [काठी.

**खलु**–अ. निश्चयानें, खात्रीनें. –पु. शब्दालंकार, प्रश्न, प्रार्थना, कारण, नियम, [निषेध, निश्चय.
**खलेल**–पु. पेंड.
**खल्क**–पु. सृष्टि, मानवजात.
**खल्लड़**–पु. कातडें, पखाल, औषधें कुटण्याचा खल.
**खल्वाट**–वि. टक्कल पडलेला.–पु. टक्कल.
**खवा**–पु. खांदा.
**खवाना**–क्रि. स. खावविणें, भरविणें.
**खवास**–पु. हुजऱ्या, राजाचा न्हावी, न्हावी.
**खवासिन**-स्त्री. हुजऱ्याचें काम करणारी स्त्री.
**खवासी**–स्त्री. सेवा, चाकरी, हत्तीच्या हौद्यांत किंवा गाडींत मागच्या बाजूला नोकराचें बसण्याचें स्थान.
**खवैया**–पु. खादाड.
**खशखाश**–स्त्री. खसखस.
**खस**–स्त्री. वाळा.
**खसकना**–क्रि. अ. सरकणें.
**खसकाना**–क्रि. स. सरकविणें, हटविणें.
**खसखसा**–वि. ज्याचे कण दाबल्यानें वेगळे होतात अशी वस्तु, फार लहान केस.
**खसखाना**–पु. वाळ्याचे पडदे लावलेली [खोली.
**खसखसी**–वि. आकाशी.
**खसना**–क्रि. अ. सरकणें.
**खसम**–पु. नवरा, स्वामी, मालक.
**खसरा**–पु. शेताचें नोंदणीबुक, जमाखर्चाची [चोपडी, खरूज.
**खसलत**–स्त्री. स्वभाव.
**खसाना**–क्रि. स. ढकलणें, पाडणें. [ग्यता.
**खसासत**–स्त्री. दुष्टपणा, कृपणता, अयो-
**खसिया**–वि. नपुंसक, खच्ची केलेला.
**खसी**–स्त्री. खच्ची केलेला प्राणी, बकरा.
**खसीस**–वि. कंजूष. [झोंबी.
**खसोट**–स्त्री. ओरखडा, ओढाताण, झोंबा-
**खसोटना**–क्रि. स. उखडणें, उपटणें, जबरदस्तीनें घेणें. [दुःखी.
**खस्ता**–वि. ठिसूळ, खुसखुशीत, घायाळ,
**खस्सी**–पु. बकरा.–वि. हिजडा.
**खहि**–स्त्री. धूळ.
**खाँ**–पु. सरदार, कित्येक गांवांचा प्रमुख.
**खाँखर**–वि. छिद्रें असलेला, जाळीदार (कापड), पोकळ.
**खाँग**–पु. काटा, गेंड्याचें शिंग, जंगली डुकराचा तोंडाबाहेर निघालेला दांत. –स्त्री. कमतरता. [वान, उद्धट.
**खाँगड़–ड़ा**–वि. सुळेदार, हत्यारबंद, बल-
**खाँगना**–क्रि. अ. कमी होणें.
**खाँगी**–स्त्री. कमतरता.
**खाँच**–स्त्री. जोड, वीण, घडण.
**खाँचना**–क्रि. स. चिन्ह करणें, ओढणें, लवकर लवकर लिहिणें.
**खाँचा–ची**–पु. हारा, करंडा.
**खाँड**–स्त्री. स्वच्छ न केलेली साखर.
**खाँडना**–क्रि. स. तोडणें, चावणें.
**खाँडा**–पु. शस्त्र, अस्त्र, भाग.
**खाँधना**–क्रि. स. खाणें.
**खाँभ**–पु. खांब, लखोटा. [घालणें.
**खाँभना**–क्रि. स. पाकिटांत (लखोटा)
**खाँवाँ**–पु. रुंद व मोठा खंदक.
**खाँसना**–क्रि. अ. खोकणें.
**खाँसी**–स्त्री. खोकला.
**खाई**–स्त्री. खंदक.
**खाऊ**–वि. खादाड.
**खाक**–स्त्री. माती, धूळ. –वि. तुच्छ, [अकिंचन.
**खाक उड़ना**–उध्वस्त होणें.
**खाक उड़ाना या छानना**–वणवण फिरणें.
**खाकमें मिलना**–धुळीस मिळणें.

**खाकरोब**–पु. महार.
**खाकसार**–पु. तुच्छ व्यक्ति.
**खाकसारी**–स्त्री. नम्रता, दीनता.
**खाकस्याह्–सियाह्**–वि. धूळधाण.
**ख़ाका**–पु. रूपरेषा, मसुदा, खर्चाचा अंदाज.
**ख़ाका उड़ाना**–उपहास करणें.
**ख़ाका उतारना**–नक्कल करणें.
**ख़ाकी**–वि. खाकी रंगाचा, पडीक (जमीन).
**खागना**–क्रि. अ. टोंचणें.
**खागा**–स्त्री. तलवार.
**खाज**–स्त्री. खुजली.
**खाजा**–पु. खाद्यवस्तु, एक मिठाई.
**खाजी**–स्त्री. खाद्य पदार्थ.
**खाजी खाना**–थप्पड खाणें.
**खाट**–स्त्री. खाट, बाज.
**खाटी**–वि. आंबट. –स्त्री. खाट. बाज.
**खाड़ी**–स्त्री. आखात.
**खातमा**–पु. अंत, मृत्यु.
**खाता**–पु. वखार, खातें.
**ख़ातिम**–स्त्री. आंगठी, मोहर.
**ख़ातिर**–स्त्री. आदर. –अ. साठीं.
**ख़ातिरख़्वाह्**–अ. यथेच्छ, अनुरूप.
**ख़ातिरजमा**–स्त्री. समाधान, विश्वास.
**ख़ातिरदारी**–स्त्री. आदरसत्कार.
**ख़ातिरी**–स्त्री. सन्मान, समाधान.
**खाती**–स्त्री. खादलेली जमीन, जमीन खोदणारी एक जात, सुतार.
**ख़ातून**–स्त्री. सभ्य स्त्री.
**खाद**–पु. खत. राब
**खादर**–पु. कुरण, सपाटीची जमीन.
**ख़ादिम**–पु. दास, नौकर.
**खादी**–वि. दूषित, रक्षक, भक्षक कांटेरी, दोष काढणारा, .–स्त्री. खादी, जाड कापड.
**ख़ान**–स्त्री. खाण.–पु. जेवण्याची पद्धत, जेवण सामुग्री, सरदार.
**ख़ानए ख़ुदा**–पु. मशीद.
**खानक**–पु. खाण खोदणारा.
**ख़ानकाह्**–स्त्री. मठ, विहार (मुसलमानी).
**ख़ानखर**–पु. सुरुंग, गुहा.
**ख़ानख़ाना**–पु. मोगल सरदारांची पदवी.
**ख़ानगी**–वि. खाजगी. –स्त्री. वेश्या.
**ख़ानदान**–पु. वंश, कुळ.
**ख़ानदानी**–वि. कुलीन, वंशपरंपरागत.
**ख़ानदानियत**–पु. कुलीनता.
**ख़ानसामा**–पु. स्वैंपाकी. (मुसलमानी).
**खाना**–क्रि. स. जेवणें, गिळणें, फस्त करणें, लांच घेणें, सोसणें.
**ख़ाना**–पु. घर, संग्रहस्थान, विभाग, कोष्टक.
**(मुँहकी) खाना**–पाहणें, पराजित होणें.
**ख़ानाख़राब**–वि. लफंगा.
**ख़ानाजंगी**–स्त्री. गृहकलह.
**ख़ानाज़ाद**–पु. दास, पाळलेला.
**ख़ानातलाशी**–धुंडाळणें, घराची झडती.
**ख़ानादारी**–स्त्री. गृहस्थीचें काम.
**ख़ानानशीन**–वि. सर्व काम सोडून घरीं बसून राहणारा.
**ख़ानापुरी**–स्त्री. कोष्टक भरणें. [नसलेला
**ख़ानाबदोश**–वि. निराश्रित, घरदार
**ख़ानासाज़**–वि. घरीं तयार झालेलें.– पु. स्वयंपाकी.
**खानि**–स्त्री. खाण.–अ. बाजूला, प्रकार.
**खानिक**–स्त्री. खाण.–वि. खाणी पासून उत्पन्न झालेला.
**खानी**–स्त्री. खाण, घर, खजिना.
**खाप**–स्त्री. म्यान.

**खाबड़**–वि. खडबडीत.
**खाम**–वि. कच्चा, वाईट.
**खाम**–पु. पाकीट, खांब, जोड.–वि. क्षीण.
**खामखयाली**–स्त्री. व्यर्थ विचार.
**खामखाह**–अ. निरर्थक, उगीचच, जबरदस्ती.
**खामना**–क्रि. स. मातीनें लिंपून बंद करणें, पत्र पाकिटांत बंद करणें.
**खामी**–स्त्री. उणीव. कच्चेपणा.
**खामोश**–वि. चूप, गप्प.
**खामोशी**–स्त्री. स्तब्धता, मौन.
**खामोशी नीमरजा**–मौनं सम्मति लक्षणं.
**खायफ**–वि. भित्रा.
**खाया**–पु. कोंबडीचें अंडें, अंडकोष.
**खार**–पु. राख, क्षार, खारी जमीन.
**खार**–पु. कांटा, फांस, द्वेष, दाढीमिशी.
**खार खाना**–डूक धरणें, जळफळणें.
**खारा**–वि. खारट, अरुचिकर.–पु. रेघांचें कापड, गवत किंवा सुकलेलीं पानें बांधण्याची जाळी, जाळीदार पिशवी, [टोपली.
**खारिक**–पु. खारिक.
**खारिज**–वि. काढून टाकलेला, वेगळा, सुनावणीस न निघालेली केस.
**खारिजा**–वि. बहिष्कृत, वेगळा केलेला.
**खारिश**–स्त्री. खरुज.
**खारी**–स्त्री. एक प्रकारचें मीठ.–वि. खारट.
**खारुआँ**–पु. एक प्रकारचा रंग, या रंगानें रंगलेलें जाड कापड.
**खाल**–स्त्री. कातडी, भाता, प्रेत, रिकामी जागा, द्वीपकल्प, मोट, आखात.
**खाल उधेड़ना या खींचना**–चाबकानें फोडून काढणें.
**खाल**–स्त्री. तीळ.
**खालसा**–पु. शीख पंथ. –वि. एकाचाच अधिकार असलेलें, राज्याचा.
**खाला**–वि. खालचा.
**खाला ऊँचा**–उंचनीच.
**खाला**–स्त्री. मावशी.
**खालाजीका घर**–बापाचें घर, सोपें कार्य.
**खालिक़**–पु. ईश्वर, सृष्टिकर्त्ता.
**खालिस**–वि. पवित्र, शुद्ध.
**खाली**–वि. रिकामें, व्यर्थ, मात्र, निकामी, निरुपयोगी, वापरांत नसलेली.-अ. केवल.
**खाली हाथ होना**–निर्धन होणें.
**(बात) खाली जाना या पड़ना**–वचन व्यर्थ होणें.
**खालू**–पु. मावशीचा नवरा, मावसा.
**खावं(विं)द**–पु. पति, मालक.
**खास**–वि. विशेष, स्वतःचा, खुद्द, विशुद्ध. –स्त्री. जाड कपड्याची पिशवी.
**खासकर**–विशेषतः.
**खास व आम**–लहान मोठें सर्व लोक.
**खासक़लम**–पु. खाजगी कारभारी.
**खासगी**–वि. राजा किंवा धनी यांचा, [स्वतःचा.
**खासदान**–पु. पानदान.
**खासबरदार**–पु. राजाच्या स्वारीपुढें चालणारा शिपाई.
**खासा**–पु. राजभोग, उत्तम मलमल, राजाच्या स्वारीचा घोडा व आवडते हत्तीघोडे ठेवण्याचा तबेला, प्रकृति. –वि. चांगला, भरपूर, सुंदर, निरोगी.
**खासियत**–स्त्री. वैशिष्टय, स्वभाव, गुण.
**खाहमखाह**–,अ. जबरदस्ती, अवश्य.
**खास्सा**–पु. एकाद्या व्यक्तीचा किंवा वस्तूचा विशेषगुण.
**खिचना**–क्रि. अ. चित्रित होणें, आकर्षित होणें, सत्व निघून जाणें, थांबून रहाणें.

अनुराग कमी होणें, ओढलें जाणें.
**खिंचवाना**–क्रि. स. दुसऱ्याकडून ओढविणें.
**खिंचाई**–स्त्री. ओढण्याची क्रिया, ओढण्याची मजुरी.
**खिंचाना**–क्रि. स. दुसऱ्याकडून ओढविणें.
**खिंचाव**–पु. ताण.
**खिंडाना**–क्रि. स. विखरणें.
**खिखिंद**–पु. किष्किंधा पर्वत.
**खिचड़वार**–पु. मकरसंक्रांत.
**खिचड़ी**–स्त्री. खिचडी.–वि. एकत्र केलेलें.
**खिचड़ी पकाना**–गुप्त मसलत करणें.
**खिचड़ी अलग पकाना (ढाई चांवलकी) खिचड़ी अलग पकाना**–सर्वांशीं फटकून वागणें.
**खिचाव**–पु. ओढण्याची क्रिया, ताण.
**खिजलाना**–क्रि. अ. चिडणें.–क्रि. स. चिडविणें. [काळ.
**ख़िज़ाँ**–स्त्री. हेमंत ऋतु, ऱ्हास होण्याचा
**ख़िज़ाब**–पु. केसाना लावण्याचा कलप.
**ख़िजालत**–स्त्री. लाज.
**खिझना**–क्रि. अ. रागावणें.
**खिझाना**–क्रि. स. चिडविणें.
**खिड़कना**–क्रि. अ. पाय काढणें, पसार होणें.
**खिड़काना**–क्रि. स. काढून टाकणें.
**खिड़की**–स्त्री. बारी, खिडकी.
**खिताब**–पु. संबोधन, पदवी.
**ख़ित्ता**–पु. प्रांत, जमिनीचा तुकडा.
**ख़िदमत**–स्त्री. सेवा, चाकरी.
**ख़िदमतगार**–पु. सेवक, चाकर.
**ख़िदमतगुज़ार**–वि. स्वामीनिष्ठ सेवक.
**ख़िदमती**–वि. खूप सेवा करणारा, सेवा करण्याबद्दल मिळणारें (वेतन).
**खिन**–पु. क्षण.
**खिन्न**–वि. उदासीन, अप्रसन्न, असहाय.
**खियाना**–क्रि. अ. रगडल्यामुळें घासलें जाणें, क्रि. स.–खेळविणें, विकसित करणें. खावविणें.
**ख़िरक़ा**–स्त्री. फकिरांची पांघरावयाची गोधडी.
**ख़िरद**–स्त्री. बुद्धि.
**ख़िरदमंद**–वि. बुद्धिमान.
**खिरनी**–स्त्री. खिरणीचें झाड व फळ.
**ख़िरमन**–पु. कापलेल्या पिकाचा ढीग, खळें.
**ख़िराज**–पु. राजाला द्यावयाचा कर.
**ख़िराम**–स्त्री. गति, नखरेबाज चाल.
**ख़िरामाँ**–वि. नखऱ्यानें चालणारा.
**खिरिरना**–क्रि. स. धान्य चाळणें किंवा पाखडणें.
**ख़िलअत**–स्त्री. पारितोषिक, मानाचीं वस्त्रें.
**ख़िलक़त**–स्त्री. सृष्टि, गर्दी.
**खिलकौरी**–स्त्री. खेळ, गम्मत.
**खिलखिलाना**–क्रि. अ. खो खो हसणें.
**खिलत**–स्त्री. पारितोषिक (राजाकडून मिळालेला पोशाक).
**खिलना**–क्रि. अ. फुलणें, खुलणें, सुशोभित होणें, मधून फाटणें, वेगळें होणें.
**ख़िलवत**–स्त्री. एकांत, निर्जन स्थान.
**ख़िलवतख़ाना**–पु. सल्ला मसलत करण्याचें गुप्त स्थान.
**खि(खे)लवाड़**–पु. मौज, खेळ.
**खि(खे)लवाना**–क्रि. स. भरविणें, प्रफुल्लित करणें, खावविणें.
**खिलाई**–स्त्री. खाण्याचें किंवा खावविण्याचें काम, मुलांना संभाळणारी दाई.
**खिलाड़ी**–पु. खेळाडू, खेळ करणारा, कसरत्या, जादूगार.
**खिलाना**–क्रि. स. भोजन करविणें, खेळविणें, विकसित करणें.

**खि़लाफ़**–वि. विरुद्ध.
**खि़लाफ़गोई**–स्त्री. खोटें बोलणें.
**खि़लाफ़त**–स्त्री. वारसा, खलिफाचा अधिकार, खलिफाचें पद. [ विरुद्ध.
**खि़लाफ़दस्तूर, खिलाफ़मामूल**–नियमा
**खि़लाफ़वर्ज़ी**–स्त्री. अयोग्य वर्तन, अवज्ञा.
**खि़लाल**–स्त्री. खेळांत होणारी हार, अंतर,
**खिलौना**–पु. खेळणें. [ दांत कोरणें.
**खि़ल्त**–पु. शरीरांतील कफ, प्रकृति.
**खि़ल्त मिल्त**–वि. मिश्रित.
**खिल्ली**–स्त्री. हास्य, पानाचा विडा, काटा.
**खिल्लीबाज़**–थट्टेखोर.
**खि़श्त**–स्त्री. वीट.
**खिसकना, खिसना**–क्रि. अ. सरकणें.
**खिसाना**–क्रि. अ. कुढणें, रागावणें, शरमणें.
**खिसारा**–पु. नुकसान.
**खिसियाना**–क्रि. अ. खिजणें, लज्जित होणें, रागावणें, रुसणें.
**खिसी**–स्त्री. लाज, धीटपणा.
**खिसौहाँ**–वि. लाजलेला, कुढणारा.
**खींच**–स्त्री. ओढ.
**खींचतान, खींचातानी, खींचा खींची**–स्त्री. परम्परांविरुद्ध कारवाई.
**खींचना**–क्रि. स. ओढणें, पिशवींतून बाहेर काढणें, एकाद्या वस्तूचें टोंक धरून आपल्या बाजूला ओढणें, बळजबरीनें आपल्या बाजूला आणणें, आकर्षित करणें, गाळणें (दारू इत्यादि), काढणें (अर्क इत्यादि), चित्रित करणें.
**खीज**–स्त्री. राग, चीड येण्यासारखी गोष्ट.
**खीजना**–क्रि. अ. रागावणें.
**खीझना**–क्रि. अ. पहा 'खीजना'.
**खीन**–वि. क्षीण, दुर्बल, सूक्ष्म.
**खीप**–पु. लाजाळूचें एक झाड. [ पाणी.
**खीर**–स्त्री. खीर, दूध, झाडाचा चीक,
**खीर चटाना**–उष्टावण करणें.
**खीरा**–पु. काकडी सारखें एक लांबट फळ.
**खीरी**–स्त्री. जनावराच्या कासेचा एक मांसल भाग,–खिरणीचें फळ व झाड.
**खील**–स्त्री. लाही, पुळी.
**खीली**–स्त्री. विडा.
**खीवन**–स्त्री. मस्ती. [ लाज.
**खीस**–वि. नष्ट.–स्त्री. अप्रसन्नता, हानि,
**खीसा**–पु. खिसा, थैला.
**खुंबी, खुंभी**–स्त्री. लवंग, कांनातील बुगडी.
**खुआर**–वि. नष्ट, तिरस्कृत, दीन.
**खुक्ख**–वि. रिकामा.
**खुखड़ी**–स्त्री. कुकडी, नेपाळी सुरी.
**खुगीर**–पु. खोगीर, लोकरी कापड.
**खुच(चु)र**–स्त्री. नसते दोष दाखविणें.
**खुजलाना**–क्रि. स. खाजविणें.–क्रि. अ.
**खुजलाहट**–स्त्री. खाज. [ खाज येणें.
**खुजली**–स्त्री. खाज, खरूज.
**खुजाना**–क्रि. स. पाहा 'खुजलाना'.
**खुरजी**–स्त्री. मोठी पिशवी.
**खुटक**–स्त्री. चिंता, भीतियुक्त संशय.
**खुटकना**–क्रि. अ. वरवर तोडणें किंवा ओरबाडणें.
**खुटका**–पु. पाहा 'खटका'.
**खुटचाल**–स्त्री. दुष्टपणा, त्रास, दुराचार.
**खुटचाली**–वि. दुष्ट, दुराचारी. [ होणें.
**खुटना**–क्रि. अ. उघडणें, संपणें, वेगळे
**खुटपन–ना**–पु. खोटेपणा, अवगुण.
**खुटाई**–स्त्री. खोटेपणा.
**खुटाना**–क्रि. अ. संपणें.–क्रि. अ. संपविणें.
**खुटिला**–पु. कर्णफूल.

**खुटी**–स्त्री. खपली.
**खुट्टी**–स्त्री. रेवडी (मिठाई).
**खुट्ठी**–स्त्री. जखमेवरची खपली.
**खुड्डी**–स्त्री. संडासांत पाय ठेवण्याकरितां केलेलें पावलाच्या आकाराचें उंचवटे, संडासांतील खळगा.
**खुतबा**–पु. स्तुति, घोषणा, भाषण.
**खुत्थी–थी**–स्त्री. पीकाची कापणी केल्या नंतर जमिनीवर रहाणारे रोपांचे खुंट.
**खुद**–अ. स्वतः.
**खुदबखुद**–आपण होऊन, आपोआप.
**खुदकशी**–स्त्री. आत्महत्या.
**खुदकाश्त**–स्त्री. स्वतः कसण्याचें शेत.
**खुदकुशी**–स्त्री. आत्महत्या.
**खुदगरज**–वि. स्वार्थी.
**खुदगरजी**–स्त्री. स्वार्थीपणा.
**खुददार**–वि. स्वाभिमानी.
**खुददारी**–स्त्री. स्वाभिमान.
**खुदना**–क्रि. अ. खोदलें जाणें.
**खुदनुमा**–वि. घमेंडखोर, बडेजाव मिरविणारा.
**खुदपरस्त**–वि. स्वार्थी.
**खुदमुख्तार**–वि. स्वच्छंद.
**खुदरा**–पु. किरकोळ वस्तु, फुटकळ.
**खुदरौ**–वि. आपोआप उगवणारें.
**खुदवाई**–स्त्री. खोदण्याचें काम किंवा मजूरी.
**खुदवाना**–क्रि. स. खोदविणें.
**खुदसिताई**–स्त्री. आत्मस्तुति.
**खुदा**–पु. ईश्वर, स्वयंभू.
**खुदाई**–स्त्री. पाहा 'खुदवाई'.
**खुदाई**–स्त्री. देवपण, सृष्टि. –वि. दैवी.
**खुदाका घर**–पु. देऊळ, मशीद.
**खुदातर्स**–वि. ईश्वराचें भय बाळगणारा, दयाळू.
**खुदाताला**–पु. ईश्वर.
**खुदादाद**–वि. ईश्वरदत्त.
**खुदा न खास्ता**–ईश्वर न करो कीं.
**खुदाया**–अ. हे ईश्वरा.
**खुदावंद**–पु. धनी, ईश्वर.
**खुदा हाफ़िज़**–ईश्वर तुमचें रक्षण करो. (निरोप घेतानां म्हणतात.)
**खुदी**–स्त्री. अहंकार, स्वार्थपरायणता.
**खुद्दी**–स्त्री. धान्याच्या कण्या.
**खुनक**–वि. फार थंड.
**खुनकी**–स्त्री. थंडपणा, आर्द्रता.
**खुनस**–स्त्री. क्रोध, रुसवा.
**खुनसाना**–क्रि. अ. रागावणें, रुसणें.
**खुनसी**–वि. क्रोधी रागीट, हट्टी.
**खुफ़िया**–वि. गुप्त.
**खुफ़िया पुलिस**–हेर, गुप्त पोलीस.
**खु(ब)भना**–क्रि. स. टोचणें, घुसणें, सलणें.
**खुभी**–स्त्री. हत्तीच्या दांतावरील पितळी टोप, कांनातील कुडी.
**खुम**–पु. घागर, मद्याची सुरई.
**खुमरा**–पु. एका प्रकारचे मुसलमान फकीर. –स्त्री. खजूरीच्या पानांची चटई.
**खुमान**–वि. दीर्घायुषी (आशीर्वाद), शिवाजी.
**खुमार**–पु. पाहा 'खुमारी'.
**खुमारी**–स्त्री. धुंदी, नशा उतरण्याच्या वेळचा थकवा, जागरणामुळें येणारा थकवा, कैफ.
**खुमी**–स्त्री. दांतांत भरलेली चांदी, भूछत्र, अळंबें, हत्तीच्या दांतावर बसविलेलें टोपण.
**खुरंड**–स्त्री. जखमेवरील खपली.
**खुर**–पु. जनावरांचे खूर.
**खुरखुर**–स्त्री. धर धर शब्द.
**खुरखुरा**–वि. खरखरीत.

**खुरखुराना**–क्रि. अ. गळ्यांत घर घर होणें, खरखरीत लागणें.
**खुरखुराहट**–स्त्री. श्वास घेतांना होणारा गळ्यांतील आवाज, खरखरीतपणा.
**खुरचन**–स्त्री. खरवडून काढलेली वस्तु.
**खुरचना**–क्रि. अ. खरवडून काढणें.
**खुरजी**–स्त्री. जनावरांवर सामान लादण्याचा मोठा थैला.
**खुरदरा**–वि. खरखरीत.
**खुरदा**–पु. बारीकसारीक वस्तु, लहान नाणें.
**खुरदा करना**–नष्ट करणें.
**खुरदाफ़रोश**–वि. बारीक सारीक वस्तू विकणारा.
**खुरपका**–पु. जनावरांचा एक रोग.
**खुरपा**–पु. चारा कापण्याचें हत्यार.
**खुरमा**–स्त्री. एक पक्वान्न किंवा मिठाई, खारिक.
**खुरशीद**–पु. सूर्य.
**खुराक**–स्त्री. भोजन, औषधाचा डोस.
**खुराकी**–स्त्री. भोजनासाठीं दिलेला पैसा.
**खुराफ़ात**–स्त्री. कुरापत, बखेडा.
**खुरिश**–स्त्री. खाद्य पदार्थ, शिधासामग्री.
**खुरी**–स्त्री. खुराचें चिन्ह.
**खुर्द**–वि. सूक्ष्म, लहान.
**खुर्दबीन**–स्त्री. सूक्ष्मदर्शक यंत्र.
**खुर्दबुर्द**–अ. नष्टभ्रष्ट.
**खुर्दरा**–वि. खरखरीत.
**खुर्दा**–पु. मोड, किरकोळ वस्तु.
**खुर्रम**–वि. नुकताच शिपलेला, प्रसन्न.
**खुर्राट**–वि. वृद्ध, अनुभवी, चलाख.
**खुलना**–क्रि. अ. उघडणें, मुक्त होणें, फाटणें, सुरू होणें, (सडक, कालवे इत्यादि तयार होणें,) कारखाना (दुकान, ऑफीस इत्यादि) सुरू होणें, गुप्त गोष्ट फुटणें, गाडी निघणें.
**खुलकर बातें करना**-मोकळ्या मनानें बोलणें.
**खुले आम, खुले ख़ज़ाने, खुले मैदान**–उघड उघड.
**खुलवाना**–क्रि. अ. उघडविणें.
**खुला**–वि. मोकळा, अडथळ्याशिवाय, स्पष्ट.
**खुलासा**–पु. सारांश. –वि. उघडलेला, अडथळ्याशिवाय, स्पष्ट.
**खुलूस**–पु. सरळपणा आणि पवित्रपणा; निष्ठा.
**खुल्क**–पु. सुशीलता.
**खुल्लमखुल्ला**–अ. उघड उघड.
**खुश**–वि. प्रसन्न, चांगलें.
**खुश आमदेद**–सुस्वागतम्.
**खुशकिस्मत**–वि. भाग्यवंत, नशीबवान.
**खुशख़त**–वि. सुंदर अक्षर लिहिणारा, –पु. सुंदर लिखाण.
**खुशख़बर**–वि. चांगली बातमी सांगणारा.
**खुशख़बरी**–स्त्री. शुभ वार्ता.
**खुशखुल्क**–वि. चांगल्या स्वभावाचा.
**खुशगवार**–वि. मनोहर, बरें वाटणारें.
**खुशगुलू**–वि. चांगल्या सुराचा, चांगल्या आवाजाचा.
**खुशज़ायक़ा**–वि. स्वादिष्ट.
**खुशदामन**–स्त्री. बायकोची आई, सासू.
**खुशदिल**–वि. हंसतमुख.
**खुशबख़्त**–वि. चांगल्या स्वभावाचा, भाग्यशाली.
**खुशबू**–स्त्री. सुगंध.
**खुशबूदार**–विव. सुगधित.
**खुशमिज़ाज**–वि. आनंदी स्वभावाचा.
**खुशहाल**–वि. सुखी, संपन्न.
**खुशामद**–स्त्री. खुशामत, खोटी स्तुति.
**खुशामदी**–वि. खुशामतखोर.
**खुशामदी टट्टू**–पु. पुढें पुढें करणारा मनुष्य.
**खुशी**–स्त्री. आनंद, इच्छा.
**खुश्क**–वि. शुष्क, अरसिक, फक्त, दुसरे कसलेंच उत्पन्न नसलेला.

**खुश्कसाली**–स्त्री. दुष्काळी वर्ष.
**खुश्की**–स्त्री. नीरसता, कोरडेपणा, जमीन.
**खुसर**–पु. सासरा.
**खुसरवाना**–वि. राजकीय, बादशाही.
**खुसरू**–पु. सम्राट, बादशाहा.
**खुसा(स्या)ल**–वि. खुश.
**खुसिया**–पु. अंडकोश. [चंद्रग्रहण.
**खुसूफ़**–पु. जमिनींत घुसण्याची क्रिया,
**खुसूमत**–स्त्री. वैर, शत्रुता.
**खुसूसन्**–अ. विशेषें करून.
**खुसूसियत**–स्त्री. विशेषता.
**खुही**–स्त्री. घोंगडीची खोळ.
**खूँखार**–ख्वार. –वि. क्रूर, रक्तपिपासू.
**खूँट**–स्त्री. कानाचा मळ, विचारपूस. –पु. तरफ,बाजू, टोंक, कोंपरा.
**खूँटना**–क्रि. स.–चौकशी करणें, छेडणें. –क्रि. अ. कमी होणें.
**खूँटा**–पु. पशु बांधण्याचा खुंट.
**खूँद**–स्त्री. थोड्याजागेंत घोड्याचें चालणें किंवा पाय आपटीत रहाणें.
**खूँदना**–क्रि. अ. तुडविणें, तुडवून खराब करणें, उड्यामारणें.
**खूँरेज़**–वि. रक्तपात करणारा.
**खूँरेज़ी**–स्त्री. रक्तपात.
**खू**–स्त्री. संवय. [चौकशी करणें.
**खूटना**–क्रि. अ. बंद होणें, संपणें. –क्रि. स.
**खूद, खूदड़–र**–पु. एकादी वस्तु चाळल्या-नंतर शिल्लक राहिलेला भाग.
**खून**–पु. रक्त, वध.
**खून उबलना**–डोळे संतापानें लाल होणें.
**खूनका घूँट पीना**–अपमान गिळून टाकणें.
**खूनखच्चर**–भयंकर मारामारी.
**खून पीना**–मारून टाकणें, सतवणें.
**खून लगाकर शहीदोंमें मिलना**–स्वार्थासाठीं पुढारी बनणें.
**खून सफेद होना**–माया ममताहीन होणें.
**खून सिरपर चढ़ना या सवार होना**– एकाद्याला मारून टाकण्यास तयार होणें.
**खूनी**–वि. खुनी. [चांगल्या रितीनें.
**खूब**–वि. उत्तम, सुंदर. –अ. वाहवा,
**खूबकलाँ**–स्त्री. एका गवताचें बीं.
**खूबसूरत**–वि. सुस्वरूप.
**खूबानी**–स्त्री. जरदाळू. [चांगुलपणा.
**खूबी**–स्त्री. कौशल्य, विपुलता, गुण,
**खूराक**–स्त्री. भोजन.
**खूसट**–पु. घुबड. –वि. अरसिक, अपशकुनी.
**खेक(ख)सा**–पु. एक फळभाजी.
**खेजड़ी**–पु. शमीचें झाड.
**खेड़**–पु. सैनिकांचा तळ.
**खेड़ा**–पु. लहान गांव.
**खेड़ी**–स्त्री. एक प्रकारचें लोखंड, गर्भावरण.
**खेत**–पु. शेत, रणक्षेत्र, पीक.
**खेत करना**–सपाट करणें.
**खेत आना–रहना**–धारातीर्थी मरणें.
**खेत कमाना**–शेती करणें.
**खेत रखना**–युद्ध जिंकणें.
**खेत लेना**–युद्ध करणें.
**खेतिहर**–पु. शेतकरी.
**खेती**–स्त्री. शेत, पीक.
**खेतीबारी–ड़ी**–स्त्री. शेतकी.
**खेद**–पु. दुःख, थकवा. [मागें धावणें.
**खेदना**–क्रि. स. मारून पळविणें, शिकारीच्या
**खेदा**–पु. रानटी पशूला शिकारीकरितां घेऊन ठराविक ठिकाणीं आणणें, शिकार.
**खेना**–क्रि. स. वल्हविणें, काळ घालविणें.
**खेप**–स्त्री. एका खेपेंत येण्याइतकी वस्तु,

गाडी वगैरेची एक खेप.
**खेपना**–क्रि. स. घालविणें, व्यतीत करणें.
**खेम**–पु. क्षेम, कुशल.
**खेमटा**–पु. बारा मात्रांचा ताल, या तालावर गावयाचें गाणें.
**खेमा**–पु. तंबू.
**खेरा**–पु. खेडें.
**खेल**–पु. खेळ.
**खेलक**–पु. खेळाडू.
**खेलना**–क्रि. अ. खेळणें, विहार करणें, देव खेळणें.– क्रि. स. करमणूक करणें.
**खेलवाड़**–पु. खेळ, तमाशा, थट्टा.
**खेलवाड़ी**–वि. खेळाडू, विनोदी.
**खेलवार**–वि. खेळणारा. -पु. खेळ, तमाशा.
**खेलाड़ी**–वि. खेळाडू, विनोदी.–पु.खेळणारा मनुष्य, तमाशा करणारा, ईश्वर.
**खेलाना**–क्रि. स. खेळविणें, खेळांत सामील करणें.
**खेलार**–पु. पाहा 'खेलाड़ी'.
**खेलारू**–पु. खेळणारा.
**खेवट, खेवक**–पु. नावाडी.
**खेवना**–क्रि. स. नाव चालविणें.
**खेवा**–पु. तरीचें भाडें, नावेंतून नदीपलीकडे जाण्याचें काम, वेळां.
**खेवाई**–स्त्री. नावाड्याचें काम, नाव वल्हवण्याची मजूरी.
**खेस**–पु. उपरणें, चादर.
**खेसारी**–स्त्री. एकप्रकारचा वाटाणा.
**खेह**–स्त्री. धूळ, राख.
**खेह खाना**–वेळ फुकट घालविणें, दुर्दशाग्रस्त होणें.
**खैर**–अ. असो, कांहीं हरकत नाहीं. –स्त्री. कल्याण.
**खैर**–पु. खैराचें झाड, कात, एक पक्षी.
**खैरअंदेश, खैरख्वाह**–वि. शुभचिंतक.
**खैरआफ़ियत**–स्त्री. क्षेम कुशल.
**खैरबाद**–पु. कल्याण होवो, खुशाल रहा. (निरोप घेतांना म्हणतात.)
**खैरमक़दम**–पु. स्वागत, कोणी आलें असतां या बसा म्हणण्याची पद्धत.
**खैरात**–स्त्री. पुण्य, दान.
**खैराती**–धर्मादाय.
**खैरियत**–स्त्री. क्षेम, कल्याण, रक्षण, हित.
**खोंच**–स्त्री. ओरखडा.
**खोंचा**–पु. पक्षी धरण्याचा लांब बांबू.
**खोंचिया**–पु. भिकारी.
**खोंची**–स्त्री. भीक, मुठीभर अन्न.
**खोंटना**–क्रि. स.एकाद्या वस्तूचा वरचा भाग तोडणें.
**खोंडा**–वि. एकादा अवयव तुटलेला, पुढचे दोन तीन दांत पडलेला.
**खोंता**–पु. घरटें.
**खोंप**–स्त्री. कपड्याचा फाटलेला भाग, शिवणाचा टांका.
**खोंपा**–पु. फाळ असलेलें नांगराचें लाकूड, अंबाडा.
**खोंसना**–क्रि. स. अडकविणें.
**खोआ**–पु. खवा. [काढलेल्या उसाचा चोथा.
**खोई**–स्त्री. घोंगडीची खोळ, लाह्या, रस
**खो(क)खला**–वि. पोकळ. –पु. ढोली.
**खोखा**–पु. हुंडीपत्र, भरपाई केलेली हुंडी.
**खोज**–स्त्री. शोध, पत्ता, चाकोरी.
**खोजक, खोजी**–वि. संशोधक.
**खोजना**–क्रि. स. शोधणें.
**खोजा**–पु. हिजडा, सरदार, सेवक.
**खोजी**–वि. शोधक.
**खोट**–स्त्री. दोष, भेसळ. –वि. दुष्ट.
**खोटता**–स्त्री. पहा 'खोटाई'.
**खोट होना**–भेसळ असणें.
**खोटा**–वि. खोटा, अवगुणी.
**खोटाई**–स्त्री. वाईटपणा, कपट, दोष, दुष्टता.
**खोड़**–स्त्री. भूतबाधा, उणेपणा, दुर्गुण, वाईट संवय.

**खोड़रा**–पु. जुन्या झाडांतील पोकळ भाग.
**खोड़ा**–वि. लंगडा.
**खोता**–पु. घरटे.
**खोद**–पु. शिरस्त्राण.
**खोदना**–क्रि. स. खणणें, उकरणें, खणून उपटून टाकणें, नक्षी काढणें, बोटानें किंवा छडीनें दाबणें, उत्तेजित करणें.
**खोदर**–वि. खडबडीत.
**खोदवाना**–क्रि. स. खोदविणें.
**खोदविनोद**–स्त्री. छाननी, पूसतपास.
**खोदाई**–स्त्री. खणण्याचें काम किंवा मजूरी.
**खोना**–क्रि. स. हरविणें, घालविणें, बिघडविणें. क्रि. अ.–जवळची वस्तु जाणें, विसरून जाणें, गहाळ होणें.
**खोन्चा**–पु. मिठाई विकणाऱ्या फेरीवाल्याचें मिठाई ठेवण्याचें मोठें ताट.
**खोपड़ा—रा**–पु. खोबरें, कवटी, डोकें, गर.
**खोपड़ी-री**–स्त्री. कवटी, डोकें. [पिकविणें.
**खोपड़ी खा जाना, खोपड़ी चाट जाना**–डोकें
**खोपड़ी खाली होना**–डोकें भणाणणें.
**खोपड़ी गंजी होना**–सपाटून मार बसणें.
**खोपा**–पु. छपराचा कोपरा, घराचा रस्त्याच्या बाजूकडील कोपरा, अंबाडा.
**खोभरा**–पु. खुंटी.
**खोम**–पु. समुह.
**खोय**–स्त्री. संवय.
**खोया**–पु. खवा. –वि. हरवलेला.
**खोर**–स्त्री. अरुंद गल्ली, जनावरांना खाणें
**खोर**–वि. खाणारा. [देण्याचें भांडें.
**खोरना**–क्रि. अ. आंघोळ करणें.
**खोरा**–पु. वाडगा, पाणी पिण्याचें भांडें.
**खोरि**–स्त्री. अरुंदगल्ली, दोष, खोड, उणेपणा, चंदनाचें आडवें गंध.
**खोरी**–स्त्री. पाहा 'खोर'.
**खोल**–पु. खोळ, आवरण, जाड चादर.
**खोलना**– क्रि. स. उघडणें, छिद्र करणें, बंधन तोडणें, मुक्त करणें, क्रम सुरू ठेवणें, सडक, कालवे वगैरे तयार करणें, दुकान कचेरी वगैरेचें काम सुरू
**खोली**–स्त्री. आवरण. [करणें, प्रकट करणें.
**खोशा**–पु. लहान लहान फळांचा गुच्छ,
**खोह**–स्त्री. गुहा. [धान्याचा तुरा.
**खौं**–स्त्री. खड्डा.
**खौज**–पु. खोल विचार.
**खौफ़**–पु. भय.
**खौफ़ज़दा**–वि. भ्यालेला.
**खौफ़नाक**–वि. भयंकर. [एक दागिना.
**खौर**–स्त्री. चंदनाचा टिळा, डोक्यांतील
**खौरना**–क्रि. स. उगाळणें, गंध लावणें.
**खौरहा**–वि. टकल्या, खरूज झालेला (पशू).
**खौरा**–पु. खवडा, एक प्रकारची खरूज.
**खौरी**–स्त्री. कपाळ, कवटी, भस्म, राख.
**खौलना**–क्रि. अ. उकळणें.
**खौलाना**–क्रि. स. पाणी, दूध वगैरे गरम
**ख्यात**–वि. प्रसिद्ध [करणें, उकळणें.
**ख्याति**–स्त्रि. प्रसिद्धि. मत.
**ख्याल**–पु. विचार, कल्पना, आठवण, आदर,
**ख्यालमें रखना**–लक्ष असणें.
**ख्यालसे उतरना**–विसरणें.
**ख्याली**–वि. कल्पित, खेळ करणारा.
**ख्याली पुलाव पकाना**–मनांत मांडे खाणें.
**ख्रिष्टान**–पु. ख्रिस्ती.
**ख्रीष्ट**–पु. येशूख्रिस्त.
**ख्वाँ**–प्रत्य. नामाच्या शेवटीं आल्यास 'णारा' असा अर्थ होतो. (जसें–क़िस्साख्वाँ–गोष्ट सांगणारा).

**ख्वाँदा**–वि. सुशिक्षित, दत्तक (पुत्र).
**ख्वाजा**–पु. धनी, सरदार, प्रतिष्ठित व्यक्ति.
**ख्वाजासरा**–पु. हिजडा. [ हिजडा.
**ख्वान**–पु. ताट.
**ख्वानचा**–पु. पाहा 'खोन्चा'.
**ख्वाब**–पु. स्वप्न.
**ख्वाबगाह**–स्त्री. शयनागार.
**ख्वार**–वि. खाणारा, दुर्दशाग्रस्त, तिरस्कृत.
**ख्वास्तगार**–वि. इच्छुक.
**ख्वाह**–अ. अथवा, वाटेलतर.–वि. इच्छुक.–स्त्री. इच्छा.
**ख्वाहमख्वाह**–अ. जरूर, अवश्य.
**ख्वाहिश**–स्त्री. इच्छा, आकांक्षा.
**ख्वाहिशमंद**–वि. अभिलाषी.

## [ ग ]

**गंग**–पु. एक हिंदी कवि, एक मात्रा वृत्त. –स्त्री. गंगानदी.
**गंगबरार**–पु. मळीची जमीन, नदीचें प्रवाह बदलल्यामुळें उघडी पडलेली जमीन.
**गंगशिकस्त**–पु. प्रवाहानें वाहून गेलेली [ जमीन.
**गंगाल**–पु. घंगाळ.
**गंगालाभ**–पु. मृत्यु. [ ती जागा.
**गंगासागर**–पु. जेथें गंगा समुद्राला मिळते
**गंगेरन**–स्त्री. गंगोटी (औषधि).
**गंगोझ**–पु. गंगोदक.
**गंज**–पु. डोक्याचे केस जाण्याचा रोग, डोक्यांत होणारे बारीक फोड. –स्त्री. खजीना, ढीग, समूह, धान्याची पेंड, अपमान, खाण, संपत्ति.
**गंजन**–पु. अनादर, पिडा, नाश.
**गंजना**–क्रि. स. ढीग घालणें, गांजणें, चूर्ण करणें, तोडणें.
**गंजा**–वि. टकल्या. –स्त्री. दारूचें दुकान, बाजार भरविण्याची जागा, दारूचें भांडें.
**गंजिया**–स्त्री. जाळीदार विणलेली पिशवी.
**गंजी**–स्त्री. ढीग, रताळें, गंजीफराक.–वि. टक्कल असलेली, गांजा पिणारा.
**गंजीफा**–पु. खेळण्याचे पत्ते, गंजीफा.
**गँजेड़ी**–वि. गांजा पिणारा.
**गँठकटा**–पु. खिसेकातरू.
**गँठजोड़ा, गँठबंधन**–पु. लग्न प्रसंगीं वर व वधूच्या वस्त्रास गांठ मारणें, लग्न, मैत्री.
**गंड**–पु. गाल, कानशील, फोड, गांठ, चिन्ह, हत्तीचें गंडस्थळ.
**गंडा**–पु. चार वस्तुंचा समुदाय, गांठ, मंतरलेला दोरा, हंसळी, पोपटाचा कंठ.
**गँडासा**–पु. जनावरांच्या चाऱ्याचे तुकडे करावयाचें हत्यार.
**गंडेरी**–स्त्री. उसाची गंडेरी.
**गंता**–वि. जाणारा.
**गंदगी**–स्त्री. मलिनता, अपवित्रता, मळ.
**गंदना**–पु. एक प्रकारचें गवत.
**गँदला**–वि. मळलेला. [ ण्याजोगा.
**गंदा**–वि. घाणेरडा, अशुद्ध, घृणा कर-
**गंदुम**–पु. गहूं.
**गंदुमी**–वि. गहूंवर्णी. [ अगर, सुगंधी पदार्थ.
**गंध**–पु. वास, थोडासा भाग, गर्व, काळा
**गंधबिलाव**–पु. जव्हारी मांजर.
**गंधर्व**–पु. दुसरा पति, गंधर्व, हरीण, घोडा, भूत, कोकिळ, सूर्य, ज्ञानी, देवाचा गवई.
**गँधाना**–क्रि. स. घाण करणें. –क्रि.अ. घाण येणें. [ चीक, देवदाराचा डिंक.
**गंधाबिरोजा**–पु. एका झाडाचा औषधी
**गंधी**–पु. सुगंधी तेलें, अत्तरें इत्यादि विकणारा, एक प्रकाचें गवत, एक किडा.
**गँधीला, गँधैला**–वि. घाणेरडा, दुर्गंधयुक्त.

**गंभीर**–वि. खोल, गंभीर, गहन, गूढ, घोर, शांत.
**गंव**–स्त्री. डाव, मतलब, संधी, उपाय.
**गंवई**–स्त्री. लहान गांव.
**गंवना**–क्रि. अ. जाणें.
**गंवर मसला**–पु. खेडवळांचा वाक्प्रचार.
**गंवाना**–क्रि.स. घालविणें, हरविणें, विसरणें, काढणें. [ गांवढळ.
**गंवर-रू**–वि. ग्रामीण, मूर्ख, अज्ञान,
**गंवरी**–स्त्री. ग्रामीणता, मूर्खपणा, ग्रामीण स्त्री.– वि. –कुरूप, मूर्खासारखा.
**गंवेली**–स्त्री. खेडवळ स्त्री. [ गांठ.
**गंस**–पु. हाडवैर, वर्मी लागणारी गोष्ट,
**गंसना**–क्रि. स. घट्ट बांधणें, घट्ट विणणें. –क्रि. अ. भरणें.
**गंसीला**–वि.टोंकदार, ठोसर, भोंक नसलेला.
**गइंद**–पु. गजेंद्र, मोठा हत्ती. [ करणें.
**गई करना**–क्रि. अ. गय करणें, उपेक्षा
**गई बहोर**–वि. हरवलेली वस्तु पुन्हा मिळविणारा, बिघडलेलें सुधारणारा.
**गऊ**–स्त्री. गाय. [ एक भेद.
**गगन**–पु. आकाश, शून्य, छप्पय छंदाचा
**गगन के फूल**–अशक्य काम.
**गगनभेड़**–स्त्री. सारस पक्षी.
**गगरा**–पु. घागर.
**गगरी-रिया**–स्त्री. लहान घागर, कळशी.
**गच**–पु. चुना वगैरे घालून पक्की केलेली जमीन.
**गचकारी**–स्त्री. चुनेगच्ची करण्याचें काम.
**गचना**–क्रि. स. ठासून भरणें. [ निभावणें,
**गछना**–क्रि. अ. जाणें.–क्रि. स. चालविणें,
**गज**–पु. हत्ती, आठाची संख्या, एक राक्षस, एक वानर.
**गज़**–पु. लांबी मोजण्याचें एक माप, एक प्रकारचा तीर, लोखंडाचा दांडा.
**गज़ इलाही**–पु. एकेचाळीस अंगुलाचें माप.
**गज़क**–पु. दारू प्याल्यानंतर तोंडाची रुचि बदलण्याकरितां खावयाच्या वस्तु,
**गजगाह**–पु. हत्तीची झूल. [ न्याहारी.
**गज़ट**–पु. सरकारी गॅझेट.
**गजदान**–पु. हत्तीचा मद.
**ग़ज़ब**–पु. राग, आपत्ति, अन्याय, विलक्षण
**ग़ज़बका**–विलक्षण. [ गोष्ट.
**गजबांक, गजबाग**–पु. अंकुश.
**गजर**–पु. गजर (घड्याळ, घंटा, वाद्य
**गजरदम**–भल्या पहाटेस. [ इत्यादि).
**गजरा**–पु. वेणी, गजरा (फुलांचा).
**ग़ज़ल**–स्त्री. फारसी व उर्दू मधील एक प्रकारची कविता, गझल.
**गजा**–पु. खजूर, एक मिठाई.
**गजाना**–स्त्री. सडविणें, ढीग करणें.
**ग़ज़ाल**–पु. पाडस (हरणाचें).
**गजी**–स्त्री. एक प्रकारचें जाड देशी कापड, हत्तीण.
**गज्झा**–पु. बुडबुडे, ढीग, खजीना, धन.
**गझिन**–वि. दाट, जाड.
**गटई**–स्त्री. मान, गळा.
**गटकना**–क्रि. स. खाणें, गट्ट करणें.
**गटगट**–पु.गटगट आवाज(पितांना होणारा).
**गटपट**–स्त्री. दाट मैत्री, सहवास.
**गट्टा**–पु. मनगट, घोटा, गांठ, बी, एक
**गट्ठर**–पु. मोठें गाठोडें. [प्रकारची मिठाई.
**गट्ठा**–पु. घास किंवा लाकडाचें ओझें,
**गट्ठी**–स्त्री. लसणाचा कांदा. [मोठें गाठोडें.
**गठन**–स्त्री. घडण.
**गठना**–क्रि. अ. दोन वस्तुंचें मिश्रण,

शिवतांना दोरा भरणें, घट्ट विणणें.
**गठरी**–स्त्री. गांठोडें, जमविलेला पैसा.
**गठरी मारना**–एकाद्याचा पैसा लुटणें.
**गठवाना**–क्रि. स. गांठविणें, शिजवून घेणें, जोड बसविणें.
**गठा बदन**–वि. पिळदार बांध्याचा.
**गठाव**–पु. शिलाई, गठविण्याचें काम.
**गठिया**–स्त्री. ओझें लादण्याची दुहेरी थैली, मोठें गांठोडें, सांधे सुजण्याचा रोग.
**गठियाना**–क्रि. स. गांठ मारणें, गांठींत बांधणें.
**गठीला**–वि. ज्याला बऱ्याच गांठी आहेत असें, गोंडस, मजबूत. [विलेली गोष्ट.
**गठौत–ती**–स्त्री. मैत्री, एकत्र येऊन ठर-
**गडंग**–पु. घमेंड, आत्मश्लाघा.
**गड़**–पु. खड्डा, आडोसा, कोट.
**गड़क**–स्त्री. एक मासा.
**गड़गड़**–स्त्री. गडगडाट, पोटांतील गुरगुर.
**गड़गड़ा**–पु. एक गाडी, एक हुक्का.
**गड़गड़ी**–स्त्री. चौघडा.
**गड़गूदर**–पु. चिंधी.
**गड़ जाना**–लाजणें. [काढणें.
**गड़े मुर्दे उखाड़ना**–उखाळ्या पाखाळ्या
**गड़दार**–पु. मस्त हत्तीच्या बरोबर भाला घेऊन चालणारा नोकर.
**गड़ना**–क्रि. अ. घुसणें, टोचणें, दुखणें.
**गड़पना**–क्रि. स. गिळणें, बळकावणें.
**गड़बड़**–वि. उंचसखल, अव्यवस्थित, वाईट. –पु. क्रमाचा भंग, अव्यवस्था, दंगा.
**गड़बड़ झाला**–पाहा 'गड़बड़'.
**गड़बड़ाध्याय**–पाहा 'गड़बड़'.
**गड़बड़ाना**–क्रि. अ. गड़बडणें, अव्यवस्थित होणें, अस्ताव्यस्त होणें.
**गड़बड़ी**–स्त्री. गोंधळ, खडबड.
**गड़मड़**–वि. भेसळ.
**गड(डे)रिया**–पु. मेंढपाळ.
**गड़हा**–पु. खड्डा.
**गड़ा**–पु. रास.
**गड़ाना**–क्रि. स. भोसकणें, गाडणें.
**गड़ायन**–वि. बोचणारा, टोंचणारा.
**गड़ारी**–स्त्री. वर्तुळाकार रेषा, रहाट.
**गड़ारीदार**–वि. आडव्या रेघा असलेलें [कापड.
**गड़ू**–पु. ढीग.
**गड़ूबड़ू-मड़ू**–पु. घालमेल, विसंगती.
**गडूर**–पु. कुबडा, गरुड.
**गडोलना**–पु. पांगुळ गाडा.
**गड्डाम**–वि. पाजी, तुच्छ.
**गड्डालिका**–स्त्री. अंधानुकरण.
**गड्डी**–स्त्री. चवड, रास, ढीग.
**गढ़**–पु. किल्ला.
**गढ़ंत**–वि. काल्पनिक. –पु. रचना.
**गढ़न**–स्त्री. आकृति, बनावट, रचना.
**गढ़ना**–क्रि. स. घडविणें, सुधारणें, कल्पित गोष्ट रचणें, मारणें.
**गढ़वई, गढ़वै**–पु. किल्लेदार.
**गढ़ा**–पु. खड्डा.
**गढ़ाई**–स्त्री. घडण, घडाई, घडणावळ.
**गढ़ाना**–क्रि. स. घडविणें, कष्टकारक होणें.
**गढ़ी**–स्त्री. लहान किल्ला, कोट असलेलें [गांव.
**गढ़ैया**–वि. रचनाकार.
**गणना**–स्त्री. मोज, हिशेब, संख्या.
**गणपति**–पु. गणपति. [कोरम.
**गणपूर्ति**–स्त्री. नियुक्त संख्या (सभेची),
**गणवेश**–पु. युनिफार्म.
**गण्य-न्य**–वि. मोजण्याजोगें, प्रतिष्ठित.
**गत**–वि. गेलेला, मेलेला, जाणलेलें, स्थित,

रहित. –स्त्री. उपयोग, दशा, पद्धत, रूपरंग.
**गत बनाना**–दुर्दशा करणें.
**गत्ता**–पु. रंग कामाची चौकट आणि कापड, कागदाचा पुठ्ठा. [काठी.
**गतका**–पु. फरीगदगा, कातडें चढविलेली
**गत्ताल खाता**–पु. बट्टा खातें, बुडीत खातें.
**गति**–स्त्री. एका ठिकाणाहून दुसऱ्या ठिकाणीं जाणें, चाल, मार्ग, स्थिति, विषय, स्पंदन, शिरकाव, दैव, आधार, जाण्याचें ठिकाण, सामर्थ्य, प्राप्ति, कर्मफल, पुनर्जन्म, सिद्धांत, परिणाम, पुरावा, आचार, स्वरूप, समारंभ, व्रण, अनाचार, पवित्रा.
**गत्थ, गथ**–पु. भांडवल, टोळी.
**गथना**–क्रि. स. गुंफणें, थापा देणें.
**गद**–पु. रोग, श्रीकृष्णाचा धाकटा भाऊ.
**गदका**–पु. गदगा, चामड्यानें मढविलेला सोटा.
**गदकारा**–वि. नरम, गुलगुलीत, गुबगुबीत.
**गदगद**–वि. सद्गदित.
**गदना**–क्रि. स. म्हणणें.
**गदगदा**–वि. गुबगुबीत.
**ग़दर**–पु. खळबळ, बंड.
**गदरा**–वि. अर्धा कच्चा.
**गदराना**–क्रि. अ. पिकावयास येणें, तारुण्य प्राप्त होणें, डोळ्यांत मळ येणें, घाणेरडें होणें. –वि. घाण झालेला.
**गदला**–वि. घाणेरडा.
**गदहपन**–पु. गाढवपणा, मूर्खपणा.
**गदहपचीसी**–स्त्री. गद्धे पंचविशी.
**गदहा**–पु. वैद्य, गाढव, मूर्ख.
**गदहेपर चढ़ाना**–बेअब्रू करणें.
**गदहे का हल चलाना**–सत्यानाश करणें.
**गदा**–स्त्री. गदा. –पु. फकीर, भिकारी.
**गदाई**–वि. नीच, रद्दी. –स्त्री. भिक्षावृत्ति.
**गदेला**–पु. गादी.
**गदेरी-ली**–स्त्री. तळवा (हाताचा).
**गदोरी**–स्त्री. तळवा (हाताचा).
**गद्द**–पु. नरम वस्तुवर एकादी वस्तु आपटल्याचा आवाज, अपचनामुळें पोट फुगणें.
**गद्दर**–वि. अर्धा कच्चा, मोठी गादी.
**गद्दा**–पु. मोठी गादी, कापसा सारख्या नरम वस्तूचें गाठोडें, एकाद्या नरम वस्तूचा मार.
**गद्दी**–स्त्री. लहान गादी, व्यवसाय करणाऱ्याची बैठक, अधिकाऱ्याचें पद.
**गद्दीपर बैठना**–अधिकार ग्रहण करणें.
**गद्दीनशीन**–वि. सिंहासनारूढ, उत्तराधिकारी.
**गधा**–पु. गाढव, मूर्ख.
**गन**–पु. गण, सेवक, झुंड.
**गनक**–स्त्री. ज्योतिषि.
**गन गन**–स्त्री. घणघण शब्द, रोमांच.
**गनगौर**–स्त्री. चैत्र शुद्ध तृतीया.
**गनियारी**–स्त्री. गणेरी (शमीसारखीं पानें असतात).
**ग़नी**–पु. धनवान.
**ग़नीम**–पु. लुटारू, शत्रु. [गोष्ट.
**ग़नीमत**–स्त्री. फुकटचा माल, समाधानाची
**ग़नूदगी**–स्त्री. झोंप.
**गन्य**–वि. मोजण्याजोगें, प्रतिष्ठित.
**गन्ना**–पु. ऊस. [गप्पागोष्टी.
**गप, गप्प**–स्त्री. गप्प, अफवा, बढाई,
**गपकना**–क्रि. स. चटकन गिळणें.
**गपड़चौथ**–स्त्री. गप्पागोष्टी.
**गपना**–क्रि. स. गप्पामारणें.
**गपशप**–स्त्री. गप्पागोष्टी.
**गपागप**–पु. एकदम.

**गप्पा**–पु. फसवेगिरी, कपट.
**गप्पी**–वि. थापेबाज.
**गपोड़ा**–पु. गप्प, कपोल कल्पना.
**गपोड़िया**–पु. बडबड्या.
**गफ़**–वि. दाट.
**ग़फ़लत**–स्त्री. असावधानी, चूक.
**गफ्फा**–पु. मोठा घास, लाभ.
**ग़फ़्फ़ार**–वि. फार दयाळू.
**ग़फ़ूर**–वि. क्षमाशील, क्षमा करणारा.
**ग़बन**–पु. दुसऱ्यानें आपल्याजवळ दिलेला माल गडप करणें. [ मुलगा.
**गबरू**–वि. तरणाताठा, साधासुधा, नवरा
**गबरून**–पु. दोरवा, कापूस भरलेलें कापड.
**गबी**–वि. मूर्ख.
**गब्बर**–वि. गर्विष्ठ, मंद, बहुमूल्य, श्रीमंत.
**गब्र**–पु. अग्नीपूजक लोक, पारशी.
**गभीर**–वि. पाहा 'गंभीर.'
**गभुआर**–वि. जावळ, अज्ञान.
**गम**–स्त्री. प्रवेश (एकाद्या विषयांत).
**ग़म**–पु. दुःख, चिंता.
**ग़म खाना**–क्षमा करणें.
**गमक**–पु. जाणारा, सूचक. –स्त्री. तबल्याचा गंभीर ध्वनि, सुगंध.
**गमकना**–क्रि. अ. सुवास येणें, घमघमाट सुटणें, तबला घुमणें.
**गमकीला**–वि. सुगंधीत, सहनशील.
**ग़मख्वारख़ोर**–वि. सहनशील. [ दारू.
**ग़मग़लत**–पु. मनोरंजनाचें साधन, खेळ,
**ग़मगीं**–वि. उदास, दुःखी.
**ग़मगुसार**–वि. दुसऱ्याचें दुःख दूर करणारा.
**गमछा**–पु. पंचा, रुमाल.
**गमछी**–स्त्री. बाराबंदी.
**ग़मज़ा**–पु. प्रेमिकेचा नखरा किंवा हावभाव.
**गंमत**–पु. रस्ता, व्यवसाय. [ ज्ञान.
**गमन**–पु. जाणें, गति, स्त्रीसंग, प्राप्ति,
**गमना**–क्रि. अ. जाणें.
**गम्भारी**–स्त्री. शिवणी (वनस्पति).
**गम्य**–वि. सुबोध, योग्य, मैथुन संबंधास योग्य, सुलभ. –पु. जार.
**गमला**–पु. कुंडी, कमोड.
**गमाना**–क्रि. स. घालविणें.
**ग़मी**–स्त्री. सुतकाचे दिवस, शोक, मृत्यु.
**गय**–पु. घर, आकाश, धन, प्राण, पुत्र, एक राक्षस, गया (तीर्थ).
**गयंद**–पु. मोठा हत्ती.
**गया**–पु. एक तीर्थ, गयेंत होणारे पिंडदान. –क्रि. अ. 'जाना' या धातूचें भूतकाळीं रूप. [ पोहोंचलेला.
**गया गुज़रा या गया बीता**–वाईट अवस्थेला
**गयावाल**–पु. गया तीर्थस्थानांतील पंड्या.
**गर**–पु. रोग, विष, बचनाग, गळा.
**ग़रकाब**–वि. पाण्यांत बुडलेला.
**ग़रक़ी**–स्त्री. बुडणें, पूर, पाण्याच्याखालीं असलेली जमीन, सखल जमीन.
**गरगज**–पु. किल्ल्याच्या भिंतीवरून बांधलेला बुरुज (तोफांसाठीं), मोर्चाची टेकडी, फांशीची जागा, ढीग. –अ.
**गरगरा**–पु. गरडी (चाक). [ विशाळ.
**गरगराना**–क्रि. अ. गरजणें, घरघरणें.
**गरचे**–अ. यद्यपि.
**ग़रज़**–स्त्री. प्रयोजन, जरूरी, इच्छा.
**गरजन**–पु. गर्जना.
**गरजना**–क्रि. अ. गरजणें.
**ग़रज़मंद**–वि. गरजू, इच्छुक. [ नसते.
**ग़रज़मंद बावला**–गरजवंताला अक्कल
**ग़रज़ी**–वि. आपमतलबी.

**गरद्द**–पु. समूह.
**गरद**–स्त्री. धूळ.
**गरदन**–स्त्री. मान.
**गरदन उठाना**–विरोध करणें.
**गरदन काटना**–ठार मारणें, नुकसान करणें.
**गरदन पर**–मानेवर.
**गरदन मारना**–ठार मारणें.
**गरदन में हाथ देना या डालना**–हाकलून [देणें.
**गरदनियाँ**–स्त्री. हाकलन देण्याची क्रिया.
**गरदनी**–स्त्री. सरी (दागिना), कुस्तीचा एक पेच, घोडयावर घालण्याचा कपडा.
**गरदा**–पु. धूळ.
**गरदान**–वि. फिरून पुन्हां त्याच ठिकाणीं येणारा. –पु. फिरून पुन्हां आपल्या ठिकाणीं परत येणारें कबूतर.
**गरदानना**–क्रि. स. पुन्हां पुन्हां बोलणें, [मोजणें.
**गरदूँ**–पु. आकाश, छकडा.
**गरना**–क्रि. अ. शिजणें, विरघळणें, जर्जर होणें, कांकडून जाणें, व्यर्थ होणें.
**गरनाल**–पु. विशाल तोंडाची तोफ.
**गरब**–पु. हत्तीचा मद.
**गरब गहेला**–वि. गर्विष्ठ.
**गरबना**–क्रि. अ. गर्व करणें.
**गरबाँही**–स्त्री. भेट, आलिंगन.
**गरबीला**–वि. घमेंडखोर.
**गरभाना**–क्रि. अ. गर्भवती होणें, ओंब्या, [लोंगर येणें.
**गरम**–वि. उष्ण, तीक्ष्ण, प्रबल, उष्णता उत्पन्न करणारा, उत्साही.
**गरम दल**–पु. जहालपक्ष.
**गरम होना**– रागावणें.
**गरमा गरम**–वि. गरम, उष्ण.
**गरमा गरमी**–स्त्री. भांडण, चलाखी.
**गरमाना**–क्रि. अ. गरम होणें, मस्त होणें. क्रोध येणें. –क्रि. स. तापविणें.
**गरमाहट**–स्त्री. उष्णता.
**गरमी**–स्त्री. उकाडा.
**गरराना**–क्रि. अ. घोर ध्वनि करणें.
**गरल**–पु. विष, सर्पविष, गवताची जुडी, बचनाग, अफू. –स्त्री. मधमाशी.
**गरवित**–वि. अभिमानी.
**गरह**–पु. ग्रह, संकट.
**गराड़ी**–स्त्री. रहाट.
**गराना**–क्रि. स. वितळविणें. [औषध.
**गरारा**–वि. प्रचंड. –पु. चूळ, चूळभरण्याचें
**गराँव**–पु. जनावराच्या गळयास बांधण्याचा [दुहेरी दोरा.
**गरास**–पु. घास, पकड.
**गरियाना**–क्रि. अ. शिव्या देणें.
**गरियार**–वि. आळशी.
**गरी**–स्त्री. खोबरें, बीच्या आंतील गर.
**ग़रीज़**–स्त्री. स्वभाव, सहनशीलता.
**ग़रीज़ी**–स्त्री. प्राकृतिक, स्वाभाविक.
**ग़रीब**–वि. गरीब, दरिद्री.
**ग़रीबख़ाना**–पु. गरीबाचें घर.
**ग़रीबनिवाज**–वि. दयाळू.
**ग़रीबपरवर**–वि. गरीबांचा पालनकर्ता.
**गरु**–वि. वजनदार, गौरवशाली.
**गरुआई–वाई**–स्त्री. जडपणा, मोठेपणा.
**गरुता**–स्त्री. गौरव, मोठेपणा.
**ग़रूर**–पु. गर्व.
**ग़रूरी**–वि. गर्विष्ठ. –स्त्री. अभिमान.
**गरेबान**–पु. गळा (कापडाचा).
**गरेबान फाड़ना**–दुःखानें रडणें.
**गरेबान में मुँह डालना**–लाजणें.
**गरेरना**–क्रि स. गरगरणें.
**गरैया**–स्त्री. दावें.
**गरोह**–पु. झुंड.

**गर्क़**–वि. मग्न, तल्लीन.
**गर्जन तर्जन**–पु. धाकदपटशा.
**गर्द**–स्त्री. धूळ. [ तरट.
**गर्दखोर-रा**–वि.मळखाऊ.–पु. पाय पुसण्याचें
**गर्दन**–स्त्री. मान.
**गर्दन तोड़ बुखार**–मेनेंजॉइटिस रोग.
**गर्दिश**–स्त्री. फेरा, चक्र (दैव), संकट.
**गर्ब**–पु. पश्चिम.
**गर्भ निवारण**–पु. संतति नियमन.
**गर्म**–वि. पाहा 'गरम'.
**गर्रा**–पु. लाखी रंग, लाखी रंगाचा घोडा किंवा कबुतर. [ (गाय, बैलाची).
**गलकंबल, गलकँबल**–पु. गळ्याची पोळी
**गलगंज**–पु. गोंगाट.
**गलगंजना**–क्रि. अ. आरड ओरडा करणें.
**गलगल**–स्त्री. मैनेसारखा एक पक्षी, एक
**गलगला**–वि. ओलेंचिंब. [ लिंबू.
**गलगुथना**–वि. लठ्ठ.[स्तीनें टळणारें संकट.
**गलग्रह**–पु. माशाचा काटा, मोठ्या शिक-
**गलचौर**–स्त्री. गप्पागोष्टी.
**गलछुट**–स्त्री. गालफड, गालाचें कातडें.
**गल जंदड़ा**–पु. पाठ न सोडणारी व्यक्ति, दुखावलेला हात अडकविण्याकरितां गळ्यांस बांधलेला रुमाल.
**गलझंप**–पु. हत्तीच्या मानेवरील झूल,
**ग़लत**–वि. अशुद्ध, खोटें. [साखळ दंड.
**गल तकिया**–पु. गालाखालीं घ्यावयाची लहान नरम उशी.
**ग़लतनामा**–पु. चुकांची यादी.
**ग़लतनी**–स्त्री. गळपट्टा, नेकटाय.
**ग़लतफ़हमी**–स्त्री. गैरसमज.
**ग़लती**–स्त्री. चूक.
**गलतंस**–पु. निःसंतान माणसाची संपत्ति.
**गलथन**–पु. अजागळ स्तन.
**गलथना**–पु. अजागळ.
**गलथैली**–स्त्री. माकडाच्या गालांतील थैली.
**गलंदा**–पु. कटुभाषी, फटकळ.
**गलन**–पु. पडणें, गळणें, पतन.
**गलान**–क्रि. अ. शिजून नरम होणें, जीर्ण होणें, दुर्बळ होणें, थंडीनें शरीर आखडणें, निकामी होणें.
**गलफड़ा**–पु. गालफड, गालाचें कातडें.
**गलफाँसी**–स्त्री. फांशी, त्रासदायक काम.
**ग़लबा**–पु. प्रमुखता, अधिकता, हल्ला, आक्रमण, जय.
**गलबाँही**–स्त्री. गळ्यांत हात घालणें.
**गलमंदरी**–स्त्री. शिवपूजेंत गाल वाजविणें (बंब इत्यादि ध्वनि).
**गलमु(गु)च्छा**–पु. कल्ला, गालमिशा.
**गलवाना**–क्रि. स. विरघळविणें.
**गलसुआ**–पु. गालगुंड.
**गलसुई**–स्त्री. पाहा 'गल तकिया.'
**गला**–पु. गळा, कंठ.
**गला काटना**–फार नुकसान करणें, (सुरण, अळू वगैरेनें) घसा खाजविणें.
**गला घुटना**–श्वासोच्छ्वासास अडथळा होणें.
**गला घोटना**–गळा दाबणें, जबरदस्ती करणें, गळा दाबून मारणें.
**गला छूटना**–एकाद्यापासून सुटका होणें.
**गला दबाना**–अनुचित दाब आणणें.
**गला फाड़ना**–जोरजोरानें ओरडणें.
**गला रेतना**–गळा कापणें.
**गलाना**–क्रि. स. वितळविणें, हळुहळु नाहींसें करणें, पैसे खर्च करणें.
**गलानि**–स्त्री. ग्लानि, दुःख, पश्चात्ताप.
**गलित**–वि. जीर्ण, पडलेला, नष्ट.

**गलियारा**—पु. बोळकंडी, भूपट्टा.
**गली**—स्त्री. गल्ली, आळी.
**गली गली मारे मारे फिरना**—दारोदार हिंडणें (पोटासाठीं).
**गलीचा**—पु. गालीचा. [कचरा, मळ.
**ग़लीज़**—वि. घाणेरडें, अशुद्ध. —पु. केर-
**गलीत**—पु. मळ, कचरा, जीर्ण.
**गलेफ़**—पु. पासोडी.
**गलेबाज़**—वि. चांगलें गाणारा.
**गलेका हार**—अतिशय प्रिय.
**गलेके नीचे उतरना या गले उतरना**—गोष्ट मनांत ठसणें, ध्यानीं येणें.
**गले पड़ना**—इच्छेविरुद्ध मिळणें.
**गले बाँधना या मढ़ना**—दुसऱ्याच्या इच्छे-विरुद्ध त्याला देणें.
**गले लगाना**—आलिंगन देणें.
**गलौ**—पु. चंद्र.
**गल्प**—स्त्री. लघुकथा, कल्पित गोष्ट, बढाई.
**गल्लई**—स्त्री. धान्याच्या रूपांत दिलेला सारा.—वि. गडबडीशीं संबंध असणारा.
**गल्ला**—पु. आरडाओरड, झुंड (जनावरांची).
**ग़ल्ला**—पु. पीक, धान्य, रोजची विक्री.
**गल्लेबान**—पु. धनगर.
**गवँ**—स्त्री. हेतु, संधि.
**गवँसे**—संधि साधून, गुपचुप.
**गव**—पु. रामचंद्राच्या सैन्यांतील एक वानर.
**गवन**—पु. जाणें, वधूचें पहिल्या प्रथम पतिगृहीं जाणें.
**गवनचार**—पु. पतिगृहीं जाण्याची पद्धत.
**गवनना**—क्रि. अ. जाणें.
**गवनि–नी**—स्त्री. चाल. —वि. चालणारी. —अ. जाऊन.—क्रि. अ. गेली.
**गवर्नरी**—स्त्री. शासन, गव्हर्नरचा अधिकार.
**गवय**—पु. गवा.
**गवहिं**—अ. मुकाट्यानें, संधि साधून.
**गवाछ-क्ष**—पु. झरोका.
**गवारा**—वि. पसंत, घेण्यासारखे.
**गवास-सा**—पु. कसाई, हत्त्या करणारा, [गोभक्षक.
**गवाह**—पु. साक्षी.
**गवाही**—स्त्री. साक्ष.
**गवेल-ला**—वि. खेडुत.
**गवेसना**—क्रि. स. शोधणें, धुंडाळणें.
**गवेषणा**—स्त्री. संशोधन.
**गवेषी**—वि. शोधक.
**गवैया**—स्त्री. भांडण.—पु. गवई.
**गवैंहा**—वि. खेडुत.
**ग़श**—पु. मूर्च्छा.
**ग़श खाना**—पु. मूर्च्छा येणें.
**गश्त**—पु. गस्त, पहारा.
**गश्ती**—वि. पहारेकरी.—स्त्री. व्यभिचारिणी.
**गसना**—क्रि. अ. ग्रासणें.
**गसीला**—वि. गुंफलेलें.
**गस्सा**—पु. घास (अन्नाचा).
**गह**—स्त्री. मूठ, पकडण्याची क्रिया.
**गह बैठना**—मुठीवर हात ठेवणें.
**गहक**—अ. लोभपूर्ण, उत्साहपूर्ण.
**गहगहा-गहगह**—वि. प्रफुल्लित.
**गहगहाना**—क्रि. अ. प्रसन्न होणें.
**गहगहे**—अ. आनंदानें, धामधुमीनें.
**गह डोरना**—क्रि. स. पाणी गढुळ करणें.
**गहन**—स्त्री. पकड, हट्ट.—पु. जंगल, दुःख, खोली, दुर्गमस्थान, पाणिग्रहण, दोष, कलंक.—वि. दुर्गम, गहन, खोल.
**गहना**—पु. दागिना. —क्रि. स. धरणें.
**गहनि**—स्त्री. हट्ट, प्रण. [व्याकुळ झालेला.
**गह्वर**—वि. दुर्गम, व्याकुळ, मनोवेगामुळें

**गहबरना**–क्रि. अ. गहिंवरणें.
**गहर**–स्त्री. विलंब, उशीर.
**गहरवार**–पु. एक क्षत्रिय जात.
**गहरा**–वि. खोल.
**गहरा आदमी**–मोठा मनुष्य.
**गहरा पेट**–विशाल हृदय.
**गहरा हाथ**–जोराचा फटका. [ करणें.
**गहराना**–क्रि. अ. खोल होणें. –क्रि. स. खोल
**गहरी घुटना या छनना**–भांग जाड करणें,
**गहरू**–अ. विलंब. [ दाट मैत्री होणें.
**गहलौत**–पु. एक राजपूत वंश.
**गहवा**–पु. चिमटा, सांडस.
**गहवारी**–पु. पाळणा.
**गहिरो**–वि. खोल.
**ग(ही)ला**–वि. गर्विष्ठ, वेडा.
**गहीर**–वि. गंभीर.
**गहेजुआ**–पु. चिचुंद्री.
**गहरे लोग**–चतुर लोक.
**गहेलरा**–वि. वेडा, मुर्ख.
**गहैया**–वि. स्वीकारणारा.
**गाँछना**–क्रि. स. गुंफणें.
**गाँज**–पु. रास.
**गाँजना**–क्रि. स. रास करणें.
**गाँठ**–स्त्री. गांठ. [ पणानें बोलणें.
**मन या हृदयकी गाँठ खोलना**–मनमोकळे-
**मनमें गाँठ पड़ना**–अबोला होणें.
**गाँठका**–पदरचा.
**गाँठका पूरा**–श्रीमंत. [ गांठ देणें.
**गाँठ जोड़ना**–वर व वधु यांच्या वस्त्रास
**गाँठमें बाँधना**–चांगली आठवण ठेवणें.
**गाँठसे**–आपल्या खिशांतून.
**गाँठगोभी**–स्त्री. अलकोल.
**गाँठदार**–वि. गांठीगांठींचा.

**गाँठना**–क्रि. स. गांठ मारणें, शिवणें, ठिगळ
**मतलब गाँठना**–मतलब साधून घेणें. [लावणें.
**गाँठी**–स्त्री. गांठ.
**गाँडर**–स्त्री. गांठे हरळी.
**गाँडा**–पु. झाड, फांदी, ऊसाची, गंडेरी.
**गाँथना**–क्रि. स. गुंफणें, गांठणें.
**गांधी**–स्त्री. हिरव्यारंगाचा एक किडा, एक प्रकारचें गवत, हिंग, गंधी, गुजराथी वाण्यांची एक जात.
**गाँव**–पु. खेडें, गांव.
**गाँस**–स्त्री. अडथळा, वैर, रहस्य, गांठ अधिकार, देखरेख, अडचण. [ आणणें.
**गाँसना**–क्रि. स. गुंफणें, टोचणें, पकडींत
**बातको गाँसकर रखना**–हृदयांत बिंबविणें.
**गाँसी**–स्त्री. हत्याराचें टोंक, गांठ, कपट,
**गाँहक**–पु. गिऱ्हाईक. [ मनोमालिन्य.
**गाइगोठ**–स्त्री गोशाळा. [ णारा.
**गाऊघप्प**–वि. दुसऱ्याचा माल गडप कर-
**गागर–री**–स्त्री. कळशी, लहान घागर.
**गाच**–स्त्री. बारीक जाळीदार कापड.
**गाछ**–पु. लहान झाड. [ वीज, फेस.
**गाज**–स्त्री. गर्जना, वीज पडण्याचा आवाज,
**(किसीपर) गाज पड़ना**–नाश होणें.
**गाजना**–क्रि. अ. ओरडणें, गर्जना करणें.
**गाजर**–स्त्री. गाजर. [मानणें.
**गाजर मूली समझना**–कवडी किमतीचा
**गाजा**–पु. तोंडाला लावण्याचें रोगण.
**गाजी**–पु. वीर पुरुष.
**गाटर**–पु. तुळई.
**गाड़**–स्त्री. खळगा, थारोळें.
**गाड़ना**–क्रि. स. गाडणें.
**गाडर**–स्त्री. मेंढी.
**गाड़ी**–स्त्री. गाडी.

**गाड़ी छूटना**—गाडी सुटणें.
**गाडूला**—पु. पांगुळगाडा. [कठिण.
**गाढा**—वि. दाट, घट्ट विणलेलें, गूढ,
**गाढ़े**—अ. चांगल्या प्रकारें, दृढतापूर्वक.
**गाढ़ेकी कमाई**—अतिशय मेहनतीनें मिळविलेला पैसा.
**गाढ़ेका साथी या संगी**—संकटकाळचा मित्र.
**गाढ़े दिन**—संकटाचा काळ. [भाग.
**गात-त्र**—पु. शरीर, अवयव, हत्तीचा पुढचा
**गाती**—स्त्री. उपरणें.
**गाथ-था**—पु. स्तोत्र, श्लोक, गाणें, प्राकृत भाषा किंवा कविता, एक छंद.
**गाद**—स्त्री. पातळ पदार्थाच्या तळाशीं बसलेला गाळ, तेलांतील गाळ, जाड वस्तु.
**गादड़-र**—वि. भित्रा, आळशी.—पु. कोल्हा.
**गादा**—पु. अर्धवट पिकलेलें धान्य. [गादी.
**गादी**—स्त्री. एक पक्वान्न, तळवा (हाताचा),
**गादुर**—पु. वट वाघुळ. [प्रवाह, लोभ.
**गाध**—पु. जागा, उतार, तळ, शेवट, नदीचा
**गाधि**—पु. विश्वामित्राचा पिता.
**गाना**—पु. गाणें, गीत.—क्रि. स. स्तुति करणें, गाणें, वर्णन करणें.
**गाफ़िल**—वि. बेशुद्ध, असावधान.
**गाभ**—पु. पशूंचा गर्भ.
**गाभा**—पु. कोंब, झाडांतील नरम भाग, रजई वगैरेंतून निघालेला जुना कापूस,
**गभिन-नी**—वि. गर्भिणी. [उभें पीक.
**गाम**—पु. गांव.
**गाय**—स्त्री. माया, वाणी, आत्मा, गाय.
**गायगांठ**—स्त्री. गोठा.
**गायत**—वि. अत्यंत, असाधारण. —स्त्री. चरमसीमा. [मनुष्य).
**गायताल**—पु. निरुपयोगी (वस्तु, पशु वा
**गायत्री**—स्त्री. एक वैदिक मंत्र, दुर्गा, गंगा, ब्रह्मदेवाची स्त्री, खैर, वैदिक छंद.
**ग़ायब**—वि. अंतर्धान.
**ग़ार**—पु. खोल खळगा, गुहा.
**ग़ारत**—वि. नाहींसें, नष्ट.
**गारद**—स्त्री. पहारा.
**गारना**—क्रि. स. दाबून पाणी किंवा रस काढणें, उगाळणें (जसें-चंदन गारना), काढणें, त्रास देणें. [देणें.
**(तन या शरीर) गारना**—शरीराला कष्ट
**गारा**—पु. माती, चुना वगैरेचें मिश्रण.
**गारी**—स्त्री. शिवी, दुर्वचन, कलंक.
**गारुड़**—पु. सोनें, विषावर उतारा (मंत्र), विष शास्त्र.—वि. गरुडा संबंधी,
**गारो**—पु. गर्व, मान. [ गरुडाकृति (व्यूह).
**गाल**—पु. गाल.
**गाल फुलाना**—रुसणें.
**गाल बजाना या मारना**—बढाया मारणें.
**(काल के) गालमें जाना**—मृत्युमुखीं पडणें.
**गालगूल**—पु. वृथा बोलणें.
**गालना**—क्रि. अ. बोलणें, गोष्ट करणें.
**गालमसूरी**—स्त्री. एक प्रकारची मिठाई.
**गाला**—पु. पिंजलेल्या कापसाचा गोळा.
**ग़ालिब**—वि. विजयी, श्रेष्ठ.
**ग़ालिबन**—अ. संभवतः.
**गाली**—स्त्री. शिवी.
**गाली खाना**—शिवी ऐकणें.
**गाली देना**—शिवी देणें.
**गालीगलौज**—स्त्री. एकमेकांना शिव्या देणें.
**गालीगुफ्ता**—पु. शिवीगाळ.
**गालीचा**—पु. गालिचा.
**गालू**—वि. बडबड्या. —पु. गाल.
**गाव**—पु. गाय, बैल.

**गावकुशी**–स्त्री. गोहत्या.
**गावघप्पी**–वि. घुम्या, तोंड पुजा, स्वार्थी.
**गावजबान**–स्त्री. एक जडी बुट्टी.
**गावतकिया**–पु. लोड, मोठा तक्या.
**गावदी**–वि. मूर्ख, अडाणी, बडबड्या.
**गावदुम**–वि. उतरतें, वरून खालीं बारीक [ होत आलेलें.
**गास**–पु. संकट.
**गाह्**–पु. गिऱ्हाईक, पक्कड, गहन, दुर्गम, मगर, बुडी, आंतील भाग.
**गाहक**–पु. गिऱ्हाईक, प्रेम करणारा.
**(जी या प्राणका) गाहक**–प्राण घेणारा.
**गाहकताई**–स्त्री. गुणग्राहकता.
**गाहगाह**–अ. कधींकधीं.
**गाहना**–क्रि. स. बुडी मारून ठाव घेणें, कणसांतून धान्य काढण्यासाठीं आपटणें, [ शोधणें.
**गाह ब गाह**–अ. कधीं कधीं.
**गाहा**–स्त्री. वर्णन, कथा.
**गाही**–स्त्री. पांच पांच वस्तूंचा समूह.
**गिंजना**–क्रि. अ. चोळामोळा होणें.
**गिंजाई**–स्त्री. एक पावसाळी जंतु. [ जाळें.
**गिंडुरी**–स्त्री. खुजावर विणलेलें दोरीचें
**गिंदौड़ा–रा**–पु. जाड पोळी प्रमाणें थापलेली साखर, पाकांतील जाड पुरी.
**गिचपिच**–वि. गिचमिड, अस्पष्ट.
**गिजगिजा**–वि. गिळगिळित, ओलें व नरम.
**गिजा**–स्त्री. खाद्य वस्तु.
**गिटकौरी**–स्त्री. काकडी.
**गिटपिट**–स्त्री. निरर्थक शब्द.
**गिटपिट करना**-मोडकें तोडकें इंग्रजी बोलणें.
**गिट्टक**–स्त्री. चिलिमींत खालीं ठेवावयाचा
**गिट्टा**–पु. खापरी, रोडा. [ खडा.
**गिट्टी**–स्त्री. खडे, फुटलेल्या मातीच्या भांड्याचे तुकडे, चिलमींतील खडा, दोऱ्याचें रीळ.
**गिड़गिड़ाना**–क्रि. अ. अतिशय नम्रतेनें [ बोलणें, विनविणें.
**गिड़गिड़ी**–स्त्री. डमरू.
**गिनती**–स्त्री. मोजणी, संख्या.
**गिनतीमें आना**–महत्त्वाचें समजलें जाणें.
**गिनती गिनानेको**–नांवासाठीं, शपथेला.
**गिनतीके**–फार थोडें.
**गिनना**–क्रि. स. मोजणें, महत्त्वाचें समजणें.
**(दिन) गिनना**–कसें तरी दिवस काढणें.
**गिनवाना**–क्रि. स. मोजविणें.
**गिनी**–स्त्री. एक सोन्याचें नाणें.
**गिमटी**–स्त्री. एक बुट्टेदार मजबूत कापड.
**गियान**–पु. ज्ञान. [ पैकीं एक प्रकार.
**गिर**–पु. पर्वत, संन्याशांच्या दहा प्रकारां-
**गिरई**–स्त्री. एक मासा.
**गिरगिट**–पु. सरडा. [ मुलांचें खेळणें.)
**गिरगिरी**–स्त्री. भिंगरी, किरकिरे (लहान-
**गिरजा, गिरजा घर**–पु. खिस्ती लोकांचें देऊळ.
**गिरदा**–पु. गोल तक्या, घेरा, गोल तबक, गोल वडी, एक पक्वान्न, धूळ, ढाल, मिठाई ठेवण्याचें हलवायाचें ताट.
**गिरदान**–पु. सरडा.
**गिरदाब**–पु. पाण्यांतील भोंवरा.
**गिरदावर**–पु. सर्कल इन्स्पेक्टर.
**गिरना**–क्रि. अ. पडणें, उभें राहूं न शकणें, दुर्दशा होणें, नदी समुद्राला मिळणें, शक्ति किंवा किंमत कमी होणें, झडणें, एकदम उपस्थित होणें, लढाईंत मरणें.
**गिर पड़ना**–क्रि. अ. निसटून पडणें, आपटणें.
**गिरफ़्त**–स्त्री. कैद, दोष शोधून काढण्याची [ तऱ्हा.
**गिरफ़्तार**–वि. कैदी, ग्रस्त.
**गिरमिट**–पु. छिद्र पाडण्याचें यंत्र.

**गिरवान**—पु. देव.
**गिरवाना**—पु. पाडविणें. [ लेलें.
**गिरवी, गिरो**—वि. गहाण, गहाण ठेव-
**गिरवीदा**—वि. मुग्ध, आसक्त, मोहित.
**गिरवीदार**—पु. ज्याच्याकडे वस्तु गहाण ठेविली आहे तो.
**गिरह्**—स्त्री. गांठ, खिसा, एका वाराचा सोळावा भाग, कोलांटीउडी.
**गिरहकट**—वि. खिसेकातरू. [ एक कबुतर.
**गिरहबाज्**—पु. उडतांना गिरकी घेणारें
**गिरहिनी**—स्त्री. गृहिणी.
**गिरही**—पु. गृहस्थ.
**गिराँ**—वि. महाग, वजनदार, अप्रिय.
**गिरा**—पु. वाणी, कविता भाषण, भाषा, सरस्वती, स्तुति, श्रवणजन्य ज्ञान.
**गिराना**—क्रि. स. पाडणें, कमी करणें, शक्ति कमी करणें, एकदम हजर करणें, लढाईंत मारणें.
**गिरानी**—स्त्री. महागाई, दुष्काळ, तोटा,
**गिरापति–पितु**—पु. ब्रह्मा. [ पोट-जड होणें.
**गिरावट**—स्त्री. पडण्याची क्रिया.
**गिरि**—पु. चेंडू, पर्वत, विटी, नेत्ररोग, संन्याशाचें सन्मानाचें उपपद, तित्तिर पक्षी. —वि. मान्य.
**गिरिफ्त**—स्त्री. पकड.
**गिरिमल्लिका**—स्त्री. कुडा, रानमोगरी.
**गिरी**—स्त्री. बीच्या आंतील भाग.
**गिरेबाँ, गिरेबान**—पु. कापडाचा गळा.
**गिरो, गिरवी**—वि. गहाण.
**गिर्जाघर**—पु. चर्च, ख्रिस्ती लोकांचें देऊळ.
**गिर्द**—अ. आसपास.
**गिर्दावर**—पु. फिरतीवर राहून काम कर-
**गिल**—स्त्री. माती, गिलावा. [ णारा.
**गिलकार**—पु. प्लॅस्टर करणारा.
**गिलकारी**—स्त्री. गिलाव्याचें काम.
**गिल गिल**—पु. एक जलचर. —वि. पिळ-
**गिलट**—पु. गिलिट. [ पिळीत.
**गिलटी**—स्त्री. सांध्यांतील गांठ, प्लेगची गांठ.
**गिलना**—क्रि. स. गिळणें, मनांत ठेवणें.
**गिलबिलाना**—क्रि. अ. पुटपुटणें. [ कोमल.
**गिलम**—स्त्री. नरम बिछाना. —वि. नरम,
**गिलहरा**—पु. पानाचा वाटोळा डबा.
**गिलहरी**—स्त्री. खार (प्राणी).
**गिला**—पु. निंदा, तक्रार.
**गिलाज़त**—स्त्री. घाण, विष्ठा.
**गिलाफ़**—पु. कव्हर, म्यान, लेप.
**गिलाव–वा**—पु. गिलावा, लिंपण.
**गिलास**—पु. ग्लास, एक झाड.
**गिली**—स्त्री. विटी.
**गिलोय**—स्त्री. गुळवेल.
**गिलोला**—पु. गोफणीचा गुंडा.
**गिलौरी**—स्त्री. पानाचा विडा.
**गिलौरीदान**—पु. पानाचें तबक.
**गिल्ली**—स्त्री. विटी.
**गींजना**—क्रि. स. हळुवारपणानें चोळणें.
**गीत**—पु. गायन, यश.
**गीता**—स्त्री. उपदेश, भगवद्गीता, सव्वीस
**गीति**—स्त्री. गाणें. [ मात्रांचा एक छंद, कथा.
**गीती**—स्त्री. गायन, आर्याछंदाचा एक भेद.
**गीदड़**—पु. कोल्हा. —वि. भित्रा.
**गीदी**—वि. भित्रा.
**गीध**—पु. गिधाड.
**गीधना**—क्रि. अ. लुब्ध होणें.
**गीला**—वि. ओला.
**ग़ीबत**—स्त्री. गैरहजेरी, चहाडी.
**गुंग—गा**—वि. मुका. —पु. मुकेपणा.

**अई**–स्त्री. जवाच्या जातीचें एक धान्य,
**अईफ़**–वि. वृद्ध. [ अंकुर.–वि. विजयी.
**जक**–पु. धनरक्षक भूत, कंजूस मनुष्य. –स्त्री. हट्ट, ध्यास, नाद, छंद.
**जक**–स्त्री. पराजय, हानि, लाज.
**जकड़ना**–क्रि. स. जखडणें.–क्रि. अ. जखडल्यामुळें शरीराची हालचाल बंद होणें.
**जकड़बंद करना**–पूर्णपणें ताब्यांत घेणें.
**जकना**–क्रि.अ. बुचकळ्यांत पडणें, बडबडणें.
**जकात**–स्त्री. कर, दानधर्म.
**जकावत**–स्त्री. बुद्धिमत्ता, नेकी, पवित्रता.
**जकित**–वि. चकित, विस्मित.
**जकी**–वि. पवित्र, बुद्धिमान.
**जख़म**–पु.जखम, मानसिक दुःखाचा आघात.
**जख़ामत**–स्त्री. स्थूलता, पुस्तकाची जाडी.
**जख़ीम**–वि. स्थूल, मोठा.
**जख़ीरा**–पु. संग्रह, खजीना, झाडाचें बी व रोपें विकण्याचें ठिकाण.
**जग**–पु. जग, लोक, यज्ञ.
**जगजगा**–वि. प्रकाशित.
**जगजगाहट**–स्त्री. चमक, प्रकाश. [पृथ्वी.
**जगजोनी**–पु. ब्रम्हा, शिव, विष्णु, परमेश्वर,
**जगत**–स्त्री. विहिरीच्या भोंवतालची भिंत. –पु. वायु, महादेव, जग, देह.–वि. जंगम,
**जगतसेठ**–पु. फार मोठा सावकार. [चर.
**जगती**–पु. पृथ्वी, लोक, गाय, जमीन.
**जगदंबा**–स्त्री. जगन्माता, दुर्गा.
**जगदाधार**–पु. शेष, ईश्वर, काल, वायु.
**जगदीश**–पु. ईश्वर, विष्णु, जगन्नाथ.
**जगदीश्वर**–पु. परमेश्वर.
**जगना**–क्रि. अ. जागणें, सावध होणें, जळणें, उत्तेजित होणें, चमकणें.
**जगमग–गा**–वि. प्रकाशित, चमकदार.
**जगमगाना**–क्रि.अ. चमकणें, लखलखणें.
**जगमगाहट**–स्त्री. चमक, लखलखाट.
**जगवाना**–क्रि.स. जागे करविणें, उठविणें.
**जगह**–स्त्री. जागा, हुद्दा, संधि.
**जगात**–पु. दान, कर. [कर वसूलीचें काम.
**जगाती**–पु. कर वसूल करणारा मनुष्य,
**जगाना**–क्रि. स. जागविणें, बोध करविणें, पेटविणें, मंत्र साधन करणें, चांगल्या स्थितींत आणणें, शुद्धीवर आणणें.
**जगार**–स्त्री. जागरण. [झोपेस आलेला.
**जगीला**–वि. जागरणामुळें आळसावलेला,
**जग्य**–पु. यज्ञ, होम. [ शूद्र, नीच जात.
**जघन्य**–वि. अंतिम, त्याज्य, नीच. –पु.
**जचना**–क्रि. अ. पाहा 'जँाचना'.
**जच्चा**–स्त्री. बाळंतीण. [ खोली.
**जच्चाख़ाना**–पु. सूतिकागृह, बाळंतिणीची
**जच्छ**–पु. यक्ष, किन्नर, गंधर्व, देवता.
**जज**–पु. न्यायाधीश.
**जजमान**–पु. यजमान.
**जजा**–स्त्री. प्रतिकार, परिणाम.
**जजाति**–पु. ययाति राजा.
**जजिया**–पु. मुसलमानी राज्यांत परधर्मी-
**जज़ीरा**–पु. बेट. [यांवर बसविलेला कर.
**जज़ीरानुमा**–पु. द्वीपकल्प.
**जज़्ब**–पु. आकर्षण, शोषण.
**जज़्बा**–पु. आवेश, प्रबळ इच्छा.
**जटना**–क्रि. स. फसवून एकादी वस्तु उपटणें, जोडणें. [ षधि).
**जटामासी**–स्त्री. सुगंधित पदार्थ (काष्ठौ-
**जटा**–स्त्री. जटा (केसांच्या), मुळाचे बारीक दोरे, फांद्या, एक सुगंधित वनस्पति, ज्यूट, वेदपाठाचा एक प्रकार, एक फळभाजी.

**जटाजूट**—पु. शंकराच्या जटा, लांब जटा.
**जटाना**—क्रि. अ. ठकविलें जाणें.
**जटना**—क्रि. स. ठकविणें, लुबाडणें.
**जटिल**—वि. गुंतागुंतीचा, बिकट, क्रूर, जटाधारी, दाट.—पु. सिंह, बोकड, तपस्वी, ब्रह्मचारी, पिंपरी.
**जठर**—पु. शरीर, पोट, पोटाचा एक रोग, गर्भाशय.—वि. वृद्ध, कठिण, बांधलेलें.
**जठराग्नि**—स्त्री. पोटांतील अन्न पचविणारी उष्णता.
**जठेरी**—स्त्री. म्हातारी.
**जड़**—वि. अचेतन, स्तब्ध, मूर्ख, गारठलेला, अरसिक, थंड, मुका, मोहाधीन झालेला. —स्त्री. पाया, हेतु, आधार. —पु. पाणी, शिसें.
**जड़ उखाड़ना या खोदना**—अहित करणें, समूळ नष्ट करणें.
**जड़ जमना, जड़ पकड़ना**—स्थायी होणें.
**जड़जंतु**—पु. पशुपक्षी, मूर्ख प्राणी.
**जड़ना**—क्रि. स. जडविणें. बसविणें, मारणें, चुगली सांगणें.
**जड़हन**—पु. शाळू (धान्य).
**जड़ाई**—स्त्री. जडविण्याचें काम, जडविण्याची मजूरी.
**जड़ाऊ**—वि. ज्यावर रत्नें वगैरे जडलीं आहेत असा, जडविण्यास योग्य.
**जड़ाना, जड़वाना**—क्रि.स. जडवून घेणें.-क्रि.अ. सर्दी होणें.
**जड़ावर**—पु. गरम कपडे.
**जड़िया**—पु. जडावाचें काम करणारा.
**जड़ी**—स्त्री. औषधी वनस्पति, जडीबुट्टी.
**जत**—वि. जितका.
**जतन**—पु. प्रयत्न, रक्षण, उपाय.
**जतनी**—वि. उद्योगी, हुशार. प्रयत्नशील, तरतरीत.
**जतलाना, जताना**—क्रि. स. आगाऊ सूचना देणें, दाखविणें.
**जति, जती**—पु. यति, संन्यासी.
**जतु**—डिंक, लाख, शिलाजीत.
**जतुगृह**—पु. कुटि, झोपडी, लाक्षागृह.
**जतेक**—अ. जितका.
**जत्था**—पु. झुंड, जथा, तुकडी.
**जथा**—अ. जसें, ज्याप्रमाणें. —पु. झुंड. धन.
**जथोचित**—अ. यथायोग्य.
**जद**—स्त्री. आघात, हानि, लक्ष्य.
**जद**—अ. जेव्हां, जर. —पु. आजोबा, सौभाग्य, सम्पन्नता.
**जदपि**—अ. जरी.
**जदल**—पु. युद्ध.
**जदीद**—वि. नवीन.
**जद्द**—पु. प्रयत्न.
**जद्दी**—वि. वडिलोपार्जित.
**जन**—पु. मनुष्याची सेवा करणारा, दास, भक्त, लोक, प्रजा, खेडवळ, समूह, घर, मजुरी.
**जन**—स्त्री. पत्नी, स्त्री.
**जनक**—पु. बाप, जनकराजा, जन्मदाता.
**जनकौर**—पु. जनकपूर, जनकराजाचे भाऊबंद.
**जनख**—पु. हनुवटी.
**जनखा**—वि. नपुंसक, बायकी हावभाव करणारा.
**जनता**—स्त्री. जनसमूह, समाज.
**जनना**—क्रि. स. प्रसूत करणें, जन्म देणें.
**जननि**—स्त्री. माता, उत्पन्न करणारी, अळीता, दया, जनी नांवाचा सुगंधी पदार्थ, एक औषधी वनस्पति. वस्ती.
**जनपद**—पु. भरभराटीला आलेला देश,
**जनम**—पु. जन्म. पाजावयाचें औषध.
**जनमघूंटी**—स्त्री. लहान मुलांना उगाळून
**(किसी बालका) जनमघूंटीमें पड़ना**—जन्मापासून संवय होणें.
**जनमना**—क्रि. अ. जन्म घेणें.
**जनमसंघाती**—पु. जन्माचा सोबती.
**जनमांतर**—पु. दुसरा जन्म.
**जनमाना**—क्रि. स. जन्म देणें.

**जनमुरीद**–वि. बाईलवेडा, पत्नीभक्त.
**जनयिता**–पु. पिता, ब्रह्मदेव.
**जनयित्री**–स्त्री. माता.
**जनवाना**–क्रि. स. प्रसूत करणें, समाचार देवविणें. [ दिलेली जागा.
**जनवास**–पु. सभा, वरपक्षास राहण्यासाठीं
**जनवासा**–पु. सर्व साधारण लोकांना उतरण्याकरितां असलेली जागा..
**जनश्रुति**–स्त्री. अफवा.
**जनाई**–स्त्री. दाई, प्रसूत करण्याची मजुरी.
**जनाज़ा**–पु. तिरडी, प्रेत. [ दाखविणें.
**जनाना**–क्रि. स. प्रसूत करणें. सूचना देणें,
**ज़नाना**–वि. स्त्रियांचें, नपुंसक, भित्रा. –पु. अंतःपुर, पत्नी, हिजडा.
**ज़नानापन**–पु. स्त्रीत्व.
**जनाब**–पु. महाशय, महाराज.
**जनाबेमन**– वि. महोदय.
**जनाव**–पु. सूचना, इशारा.
**जनि**–स्त्री. जन्म, स्त्री, आई, पत्नी, जन्मभूमि.
**जनित**–वि. जन्मलेला. [–अ. नाहीं, नको, न.
**जनियाँ**–स्त्री. प्रियतमा.
**जनी**–स्त्री. दासी, आई, स्त्री, मुलगी. –वि.
**जनु**–अ. जणूं काय, जसें. [ जन्मलेली.
**जनूब**–स्त्री. दक्षिण दिशा.
**जनेऊ, जनेव**.–पु जानवें, मुंज.
**जनेत**–स्त्री. वरात (लग्नाची).
**जनेसु, जनेस**–पु. राजा.
**जनैया**–वि. माहितगार, जाणणारा.
**जन्न**–पु. विचार, भ्रम, अनुभव.
**जन्नत**–स्त्री. स्वर्ग.
**जन्म**–पु. जन्म, उत्पत्ति, अस्तित्वांत येणें, जीवन, आयुष्य, जन्मभूमि, पिता, प्राणी,
**जन्मपत्री**–स्त्री. जन्मपत्रिका. [लोक, जाति.
**जन्मभूमि**–स्त्री. एकाद्याचा जन्म झालेलें ठिकाण किंवा देश.
**जन्मान्तर**–पु. पुनर्जन्म, दुसरा जन्म.
**जन्य**–पु. साधारण मनुष्य, अफवा, पुत्र, लढाई, पिता, जन्म, राष्ट्र, वरपक्षीय, वधूपक्षीय, टपका, उत्पत्ति, प्राणी, देह, बाजार, लढाई, निंदा. –वि. राष्ट्रीय, उत्पन्न झालेला, जन संबंधीं. –स्त्री. आईची मैत्रीण, करवली, प्रेम, सुख.
**जप**–पु. एकादा मंत्र किंवा वाक्य वारंवार म्हणणें, पूजेमध्यें जपाचा मंत्र म्हणणें.
**जपना**–क्रि. स. जप करणें, खाऊन टाकणें.
**जपनी**–स्त्री. जपमाळ, गोमुखी.
**ज़फ़र**–पु. जीत, लाभ.
**जफ़ा**–स्त्री. कठोरता, जुलूम, कष्ट, संकट.
**ज़फ़ील, ज़फ़ीरी**–स्त्री. शिटीसारखा आवाज,
**जब**–अ. जेव्हां. [ शिटी.
**जबड़ा**–पु. जबडा.
**ज़बर**–वि. बलवान, मजबूत, श्रेष्ठ.
**ज़बरदस्त**–वि. पाहा 'ज़बर'.
**जबरन्**–अ. बलपूर्वक.
**जबरा**–वि. बलवान. –पु. झेब्रा.
**जबह**–पु. हिंसा (गळ्यावर सुरी चालवून केलेली), हत्या. [ ण्याची पद्धत.
**ज़बान**–स्त्री. जीभ, भाषा, प्रतिज्ञा, बोल-
**ज़बान खींचना**–कठोर शासन करणें.
**ज़बान खुलना**–अमर्याद बोलणें.
**ज़बान खोलना**–तोंड उघडणें. [बोलूं न देणें.
**ज़बान पकड़ना, ज़बान पर ताला लगाना**–
**(दबी) ज़बानसे कहना**–चांचरत बोलणें,
**ज़बानज़द**–वि. प्रसिद्ध. [ हळू बोलणें.
**ज़बानदराज़**–वि. अनुचित बोलणारा.
**ज़बानबंदी**–स्त्री. लेखी उत्तर.

**जबानी**–वि. तोंडी.

**जबून**–वि. वाईट.

**जब्त**–पु. जप्त केलेली वस्तु, स्वीकारलेलें.

**जब्बार**–वि. जुलमी. –पु. ईश्वराचें एक [ नांव.

**जब्र**–पु. जबरदस्ती, जुलूम.

**जब्रन्**–अ. बलपूर्वक.

**जब्र व मुकाबला**–पु. बीजगणित.

**जभौंना**–क्रि. अ. आळसावणें, जांभई देणें.

**जम**–पु. यम, योगाचा एक भाग.

**जमकात, जमकातर**–पु. पाण्यांतील भोंवरा. –स्त्री. यमाचें शस्त्र, खांडा.

**जमघट**–पु. जमाव, गर्दी.

**जमज, यमज**–पु. जुळें.

**ज़मज़म**–पु. मक्केंतील पवित्र विहीर.

**ज़मज़मी**–स्त्री. जमजम विहिरींतील पवित्र पाणी आणण्याचें भांडें.

**जमदाढ़**–स्त्री. कट्यारीप्रमाणें एक हत्यार.

**जमदुतिया**–स्त्री. भाऊबीज.

**जमधर**–पु. दुधारी तलवार.

**जमना**–क्रि. अ. गोठणें, जम बसणें, संवय होणें, रंगणें, एकत्र होणें, कामावर हात बसणें. काम चांगलें होणें, उगणें.– [स्त्री. यमुना नदी.

**जमनिका**–स्त्री. पडदा.

**जमवट**–स्त्री. गोठण्याची क्रिया, गोल साचा.

**जमहूर**–पु. जनसमूह, राष्ट्र.

**जमहूरी**–वि. राष्ट्रीय.

**जमा**–वि. एकत्र, सर्व मिळून. –स्त्री. पुंजी, मूळधन, पैसा, जमिनीवरील कर, बेरीज.

**जमाई**–पु. जांवई.–स्त्री. जमण्याची किंवा जमविण्याची क्रिया.

**जमात**–स्त्री. इयत्ता, माणसांचा समूह.

**जमाद**–पु. पाऊस न पडणारा प्रदेश, कंजूष, निर्जीव व न वाढणारा पदार्थ.

**जमादात**–स्त्री. दगड व खनिज पदार्थ [ वगैरे.

**ज़मानत**–स्त्री. जामीनकी.

**ज़मानतन्**–अ. जामिनकीकरितां. [ वेळ.

**ज़माना**–पु. वेळ, कालावधी, जग, भाग्याची

**जमाना**–क्रि. स. गोठविणें, जमविणें, विर- [ जण लावणें.

**ज़मानासाज़**–वि. कार्यदक्ष.

**जमाबंदी**–स्त्री. कुळाच्या जमिनीचा सारा लिहिलेला एक कागद.

**जमामार**–वि. दुसऱ्याच्या पैशाचें अपहरण [ करणारा.

**जमाल**–पु. सौंदर्य, रूप.

**जमाव**–पु. जमविण्याची क्रिया, गर्दी.

**जमावड़ा**–पु. गर्दी.

**ज़मीं**–स्त्री. जमीन, पृथ्वी.

**ज़मींकंद**–पु. सुरण.

**ज़मींदार**–पु. जमीनदार. [ दारी पद्धत.

**ज़मींदारतंत्रवाद**–पु. सरंजामशाही, जमीन-

**ज़मींदारशाही**–स्त्री. सरंजामशाही.

**ज़मींदारी**–स्त्री. जमीनदाराची जमीन, जमीनदाराचा अधिकार.

**ज़मींदोज़**–वि. जमीनदोस्त, जमीनीवर पडलेला, जमीनीच्या खालचा. –पु. [ एक प्रकारचा तंबू.

**जमी**–वि. संयमी.

**ज़मीन**–स्त्री. जमीन, भूमिका. [ करणें.

**ज़मीन आसमान एक करना**–फार प्रयत्न

**ज़मीन आसामनके कुलाबे मिलाना**–भगीरथ प्रयत्न करणें, मोठमोठ्या कल्पना करणें.

**(पैरोंतलेसे) ज़मीन खिसकना**-आश्चर्य किंवा भय वाटणें.

**ज़मीन देखना**–पडणें, आपटणें.

**(अभी) ज़मीनसे उठना**–थोडें वय असणें, [ अल्पवयस्क.

**ज़मीमा**–पु. परिशिष्ट.

**ज़मीर**–पु. मन, विवेक, सर्वनाम.

**जमुन, जमुना**–स्त्री. यमुना नदी.
**जमुर्रद**–पु. पन्ना (रत्न).
**जमुहाना**–क्रि. अ. जांभई देणें.
**जमूरक, जमूरा**–पु. लहान तोफ.
**जमैयत**–स्त्री. जमात, समूह, शांति, फौज.
**जमोगना**–क्रि स. हिशेब तपासणें, दुसऱ्यावर सोपविणें, खऱ्या खोट्याची परीक्षा घेणें, खरें असल्याबद्दल सांगणें.
**जम्म**–वि. पुष्कळ, सर्व.
**जयंत**–पु. इंद्रपुत्र, शंकर, भीमसेन, चंद्र. –वि. बहुरूपी, विजयी.
**जयंती**–स्त्री. एका वृत्ताचें नांव, उत्सवाचा दिवस, जन्मदिवस, विजयिनी, हळद, दुर्गा, पार्वती, पताका, नरवेल, गोकुळाष्टमी, दासी.
**जय**–पु. विजय, इंद्रियनिग्रह, वीररस, जयजयकार, जयंत, विष्णूचा द्वारपाल, युधिष्ठिर, अर्जुन, ग्रंथ, भारतादि पवित्र ग्रंथ.
**जयजीव**–पु. नमस्काराचा प्रकार (याचा अर्थ जगा व विजयी व्हा).
**जयना**–क्रि. अ. जय होणें, जिंकणें.
**जयमाल**–स्त्री. विजय मिळाल्यानंतर गळ्यांत घालावयाचा हार, स्वयंवराच्या वेळीं वराच्या गळ्यांत घालावयाचा हार.
**जया**–स्त्री. दुर्गासखी, (३,८,१२) तिथि, भांग, हिरडा, दुर्गा, पार्वती, ध्वज.–वि.
**जयी**–वि. विजयी, चित्ताकर्षक. [जय देणारी.
**जर**–पु. म्हातारपण, ओढ, जीर्ण, नाश.
**ज़र**–पु. पैसा, सोनें.
**जरक**–पु. लांडगा.
**जरकटी**–पु. एक शिकारी पक्षी.
**जरकस, ज़रकसी**–वि. जरीचा.
**ज़रकोब**–पु. वर्ख, बेगड इत्यादि बनविणारा.
**ज़रख़रीद**–वि. विकत घेतलेलें.
**ज़रख़ेज़**–वि. फलद्रुप, सुपीक.
**ज़रगर**–पु. सोनार.
**जरगा**–पु. गर्दी, पठाणांची जमात, या जमातीची सार्वजनिक सभा.
**जरछार**–वि. भस्मीभूत, नष्ट.
**जरजर**–वि. जुना, वृद्ध, फाटकेंतुटकें.
**जरठ**–वि. म्हातारा, जीर्ण, कठीण, घट्ट, लुळा, वाकलेला, पक्व, पांढरा, फिक्कट, निर्दय.
**जरतु(दु)श्त**–पु. फारशी धर्मसंस्थापक, [झरतुष्ट.
**ज़र्द**–वि. पिवळा.
**ज़रदा**–पु. खाण्याचा तंबाकू, साखर भातासारखें पक्वान्न, पिवळ्या रंगाचा घोडा.
**ज़रदालू**–पु. जरदाळू. [पिवळेपणा.
**ज़रदी**–स्त्री. अंड्यांतील पिवळा बलक,
**ज़रदोज़**–पु. जरीचें भरत काम करणारा.
**जरदोजी**–स्त्री. जरीचें काम.
**जरन, जरनि**–स्त्री. दाह.
**ज़रब**–स्त्री. आघात, गुणाकार. [करणें.
**ज़रब देना**–ठोकणें, बडबडणें, गुणाकार
**ज़रब ख़फ़ीफ़**–हलका घाव.
**ज़रब शदीद**–जबर घाव. [कापड.
**ज़रबफ़्त**–पु. जरीचें काम केलेलें रेशमी
**ज़रबाफ़**–पु. जरीचें काम करणारा मनुष्य.
**जरबीला**–वि. सुंदर, भडक.
**ज़रर**–पु. हानि, आघात, मार, इजा.
**ज़रा**–वि. थोडे.–अ. कमी.
**जरा**–स्त्री, म्हातारपण, पंगुपणा.
**ज़राअत**–स्त्री. शेतांचें उत्पन्न, शेती, जिराईत जमीन.
**ज़राअतपेशा**–पु. शेतकरी. [ईत जमीन.
**ज़राफ़त**–स्त्री. थट्टा, बुद्धिमत्ता, विनोद.
**ज़राफ़तन्**–अ. थट्टेनें.

**जराब**—वि. जडाऊ.
**जरायम**—पु. पट, अनेक प्रकारचे अपराध.
**जरिया, जरीया**—पु. कारण, संबंध, उपाय.
**जरिये**—अ. मार्फत, द्वारा.
**जरी**—वि. वीर.
**जरी**—स्त्री. जर, जरीचें काम.
**जरीफ़**—पु. थट्टेखोर, बुद्धिमान.
**जरीब**—स्त्री. जमीन मापण्याची साखळी.
**जरीबाना**—पु. दंड.
**जरूर**—वि.आवश्यक, अनिवार्य.—अ. अवश्य.
**जरूरत**—स्त्री. आवश्यकता. [पाहिजे.
**जरूरी**—वि. आवश्यक, जें अवश्य झालें
**जर्क़बर्क़**—वि. चमकदार, झगझगीत.
**जर्द**—वि. पिवळा.
**जर्दी**—स्त्री. पिवळेपणा. [ ऐकलेली गोष्ट.
**जर्फ़**—पु. बुद्धिमत्ता, क्रियाविशेषण, भांडें,
**जर्बउल्मिसाल**—स्त्री. म्हण.—वि. प्रसिद्ध.
**जर्रा**—पु. कण, अणु.
**जर्रार**—वि. वीर, विशाल.
**जर्राह**—पु. शस्त्रवैद्य.
**जलंधर**—पु. एक राक्षस, जलोदर रोग.
**जल**—पु. पाणी, पूर्वाषाढा नक्षत्र, वाळा.
**जल खाना**—पु. न्याहारी.
**जलघड़ी**—स्त्री. घटिकापात्र.
**जलचादर**—स्त्री. पाण्याचा शांत पृष्ट भाग, पाण्याचा उथळ प्रवाह.
**जलजला**—पु. धरणीकंप.
**जलडमरूमध्य**—पु. सामुद्रधुनी.
**जलन**—स्त्री. दाह, ईर्षा.
**जलना**—क्रि. अ. जळणें, द्वेष करणें, कुढणें, पोळणें, जळून कोळसा किंवा वाफ होणें.
**जलकर खाक होना, जलकर लाल होना, जला भुना होना**—रागानें लाल होणें.
**जलेको जलाना, जलेपर नमक छिड़कना, जले पर माहूर देना**—दु:खावर डागण्या [देणें.
**जलपना**—क्रि. अ. फुशारकी मारणें.
**जलप्रपात**—पु. धबधबा.
**जलप्लावन**—पु. महापूर, प्रलय.
**जलपान**—पु. न्याहारी, फराळ. [ वेत.
**जलबेंत**—पु.जलाशयाजवळ उत्पन्न होणारा
**जलभँवरा**—पु. पाण्यावर अत्यंत जलद चालणारा काळा किडा.
**जलवाना**—क्रि. स. जाळविणें.
**जलवायु**—पु. हवापाणी.
**जलसा**—पु. जलसा, अधिवेशन, उत्सव.
**जलहरी**—स्त्री. शिवलिंग ठेवण्याची बैठक, अभिषेक पात्र.
**जलाजल**—पु. झिळमिळया, नक्षीदार काठ.
**जलातन**—वि. रागीट, मत्सरी.
**जलाना**—क्रि. स. जाळणें, पेटविणें, सतावणें, जाळून राख करणें,ईर्षा उत्पन्न
**जलापा**—पु. ईर्षा, मत्सर. [ करणें.
**जलाल**—पु. तेज, प्रभाव.
**जलावतन्**—वि. निर्वासित.
**जलावन**—पु. सरपण, जळण.
**जलाशय**—पु. नदी, विहीर, पाण्याचा सांठा.
**जलाहल**—वि. जलमय.
**जलिका**—पु. जळू.
**जलिया**—पु. नाविक, कोळी.
**जली**—वि. स्पष्ट.—स्त्री. मोठ्या व स्पष्ट अक्षरांत लिहिलेली लिपी.
**जली कटी या जली भुनी बात**—मर्मभेदक बोलणें.
**जलील**—वि. तुच्छ, अपमानित.
**जलील**—वि. श्रेष्ठ, वाडवडील.
**जलुक, जलुका**—स्त्री. जळू.

**जलूस**–पु. मिरवणूक, वरात.
**जलेबी**–स्त्री. जिलबी, वेटोळें.
**जलोका,जलौका**–स्त्री. जळू.
**जल्दबाज**–वि. झटपट काम करणारा.
**जल्दी**–स्त्री. घाई.–अ. लवकर.
**जल्प**–क्रि. अ. बडबड, कथन. [मिरविणें.
**जल्पना**–क्रि. अ. मिजास दाखविणें, शेखी
**जल्द**–अ. लवकर.
**जल्लाद**–पु. मारेकरी, क्रूर व्यक्ति.
**जल्वा**–पु. शोभा, रूपाची शोभा, वधूचें आपल्या पतीला पहिल्या प्रथम तोंड दाखविणें (मुसलमान लोकांत).
**जव, जवा**–स्त्री. यव, लसणाची कांडी.
**जवनिका**–स्त्री. पडदा.
**जवाँमर्द**–वि. बहादूर.
**जवान**–वि. तरुण, वीर.–पु. पुरुष, शिपाई.
**जवानी**–स्त्री. ओवा, तारुण्य.
**जवानी उतरना या ढलना**–वृद्धत्व येणें.
**जवानी चढ़ना**–वयांत येणें.
**जवाब**–पु. उत्तर, प्रतिक्रिया, बरोबरीची वस्तु, नोकरी सुटल्याचा हुकूम.
**जवाबदावा**–पु. वादीच्या कैफीयतीवर प्रतिवादीचें उत्तर.
**जवाबदेह**–वि. जवाबदार. [अ. वचन.)
**जवाबित**–पु. नियम, कायदे (जाब्ताचें
**जवाबी**–वि. जोड (कार्ड), रिप्लायपेड (तार), उत्तराचें.
**जवार**–पु. ओहोटी, संकट, अवनति.
**जवारा**–पु. यवाचें अंकुर.
**जवाल**–पु. अवनति, संकट.
**जवाला**–पु. सातू. [ळघांत सुकणारें झाड.)
**जवास–सा**–पु.–तांबडा धमासा (पावसा-
**जवाहर, जवाहिर**–पु. रत्न.
**जवाहरात**–पु. रत्नें, रत्नसमूह.
**ज्वर**–पु. ताप.
**जशन**–पु. उत्सव, आनंद.
**जस**–पु. यश, कीर्ति. –अ. जसा.
**जसामत**–स्त्री. लठ्ठपणा, शारीराचा आकार
**जसीम**–वि. लठ्ठ.
**जसुदा, जसुधा**–स्त्री. यशोदा.
**जसुमति, जसोमती**–स्त्री. यशोदा.
**जस्त**–स्त्री. उडी. –क्रि. अ. मरणें.
**जस्ता**–पु. जस्त (धातु).
**जहँ**–अ. जेथें.
**जहँड़ना**–क्रि. अ. नुकसानींत येणें, फसणें.
**जहतिया**–पु. जकात किंवा सारा वसूल
**जहद**–स्त्री. प्रयत्न, मेहनत. [करणारा.
**जहदना**–क्रि. अ. चिखल होणें, थकणें.
**जहदा**–पु. दलदल.
**ज़हन**–पु. मेंदू, बुद्धि.
**ज़हननशीन करना**–आठवण ठेवणें.
**जहन्नम,जहन्नुम**–पु. नरक.
**जहन्नुममें जाय**–चुलींत जाओ.
**जहना**–क्रि. स. टाकणें, नाश करणें.
**ज़हमत**–स्त्री. संकट, बखेडा.
**ज़हर**–स्त्री. विष, अप्रिय बोल किंवा काम. –वि. घातकी, अत्यंत हानिकारक.
**ज़हर उगलना**–मर्मभेदक बोलणें.
**ज़हर करना**–असह्य करणें.
**ज़हरका घूँट पीना**–अपमान गिळणें.
**जहर मोहरा**–सर्प विषाचा खडा (यानें सापाचें विष उतरतें).
**जहरबाद**–पु. काळपुळी.
**जहरीला**–वि. विषारी.
**जहल**–पु. अज्ञान.
**जहाँ**–पु. जग. –अ. जेथें, ज्याठिकाणीं.

**जहांका तहां**–जेथल्या तेथें.
**जहां तहां**–इतस्ततः, इकडेतिकड.
**जहांदीदा**–पु. अनुभवी माणूस. [ संबोधन.
**जहांपनाह**–पु. पृथ्वीनाथ, बादशहाचें
**जहाज़**–पु. जहाज. [ ठेवणारा.
**जहाज़ी**–पु. खलाशी.–वि. जहाजाशीं संबंध
**जहाज़ी कौवा**–पु. एकच एक आधार
**जहान**–पु. जग. [ असलेला, एक निष्ठ.
**जहानक**–पु. जगाचा प्रलय.
**जहानत**–स्त्री. बुद्धिमत्ता.
**जहालत**–स्त्री. अज्ञान.
**जहिया**–अ. जेव्हां, ज्यावेळीं.
**जहीं**–अ. कोठेंहि.
**जहीन**–वि. बुद्धिमान.
**जहीर**–पु. मदतनीस, सहायक.
**जहूर**–पु. प्रकाशन, उत्पन्न होणें, आरंभ.
**जहूरमें आना**–प्रगट होणें.
**जहेज**–पु. हुंडा.
**जांकनी**–स्त्री. यातना.
**जांगड़ा**–पु. भाट, चारण.
**जांगर**–पु. हातापायाची शक्ति.
**जांगलू**–वि. खेडवळ.
**जांघ**–स्त्री. मांडी.
**जांघिया**–पु. चड्डी.
**जांच**–स्त्री. तपास, परीक्षा.
**जांचक**–पु. याचक, भिकारी.
**जांचना**–क्रि. स. तपासणें, मागणें.
**जांत,जांता**–पु. जातें (धान्य दळण्याचें).
**जांफिशानी**–स्त्री. खूप मेहनत.
**जांब**–पु. जांभूळ.
**जांवर**–पु. गमन, प्रस्थान.
**जा**–वि. उत्पन्न, उचित.–स्त्री. माता, जागा, जाऊ (धाकटी).–सर्व. ज्या.
**जाबजा**– स्थळोस्थळीं.
**जाबेजा**– बरें वाईट सांगणें.
**जाई**–स्त्री. पुत्री.
**जाउर,जाउरी**–स्त्री. खीर.
**जाकड़**–पु. जांगडमाल.
**जाके**–सर्व. ज्याचा.–अ. जाऊन.
**जाको**–सर्व. ज्याला.
**जाग़**–पु. कावळा.
**जाग**–पु. यज्ञ. –स्त्री. जागा, जागरण.
**जागना**–क्रि. अ. जागणें, जागृत असणें, उदय
**जागवलिक**–पु. याज्ञवल्क्य मुनि. [ पावणें.
**जागरन**–पु. जागरण, दक्षता.
**जागीर**–स्त्री. जाहगीर. [ वस्था.
**जाग्रत,जाग्रति**–वि. जागणारा.–पु. जागृता-
**जाचक**–पु. याचक, भिकारी.
**जाचना**–क्रि. स. याचना करणें, मागणें.
**जाजरा**–वि. जर्जर, खिळखिळा.
**जाज़रूर**–पु. संडास, शौचकूप.
**जाज़िब**–वि. शोषक, आकर्षक.
**जाजिम, जाजम**–स्त्री. सतरंजी, गालिचा.
**जाट**–पु. एक जाति, मूर्ख मनुष्य.
**जाठ**–पु. तलावाच्यामध्यें रोवलेली काठी, घाण्याचा मधला दांडा.
**जाड़ा**–पु. हिवाळा, थंडी.
**जात**–स्त्री. जात, मुलगी. –पु. जन्म, पुत्र, जीव, वर्ग, समूह, विशिष्ट स्वभाव. –वि. जन्मलेला, प्रगट, प्रशस्त, कार- [ णीभूत
**ज़ात**–स्त्री. जात, शरीर.
**जातकर्म**–पु. हिंदूंच्या दहा संस्कारां पैकीं
**जातना**–स्त्री. पीडा, कष्ट. [ चौथा संस्कार.
**जातपांत**–स्त्री. जातपात.
**जातसपति**–पु. वरुण.
**जाति**–स्त्री. जात, जन्म, जन्मकाळ, कुळ,

वर्ण, वर्ग, विशिष्ट लक्षण, स्वभावोक्ति, गाण्याचे सात सूर, जाई, आंवळी, चूल,
**जाती**–वि. स्वतःचें, वैयक्तिक. [ जायफळ.
**जातुधान**–पु. राक्षस.
**जात्रा**–स्त्री. तीर्थयात्रा.
**जादराह**–पु. रस्त्याचा खर्च.
**जादा**–वि. उत्पन्न झालेला.
**जादू**–स्त्री. जादू, जादूटोणा, मोहिनी.
**जादूगर**–पु. जादूगार.
**जादूगरी**–स्त्री. जादुगिरी.
**जान**–स्त्री. ज्ञान, अनुमान, प्राण.
**जानके लाले पड़ना**–जिवावर बेतणें.
**जानको जान न समझना**–कठिण परिश्रम
**जानका गाहक**–प्राणनाशक. [ करणें.
**जान जोखों**–प्राणाचें भय असून.
**जान छुड़ाना या बचाना**–प्राण वाचविणें, संकट टाळणें.
**जान देना**–जीव टाकणें, अतिश्रम करणें.
**जान निकलना**–जीव जाणें.
**जान पर खेलना**–तळहाती शिर घेणें.
**जान पहचान**–ओळख पाळख.
**जानसे जाना**–जिवानिशी जाणें.
**जान आना**–शोभा वाढणें.
**जानकार**–वि. जाणता, तज्ञ.
**जानकारी**–स्त्री. निपुणता, माहिती, जाणीव.
**जानकी जानि**–पु. रामचंद्र.
**जानदार**–वि. सजीव.
**जाननहार**–वि. जाणणारा.
**जानना**–क्रि. स. समजणें, अनुमान करणें,
**जानपना**–पु. चातुर्य. [ बातमी असणें.
**जानमन**–वि. अतिप्रिय.
**जानमनि**–पु. ज्ञानी पुरुष.
**जानमाज**–स्त्री. नमाज पढण्याचें आसन.
**जानशीन**–वि. वारस.
**जानवर**–पु. जनावर, जीव, प्राणी.
**जानहु**–अ. समजा, गृहीत धरा.
**जाना**–क्रि. अ. जाणें, वेगळें होणें, नुकसान होणें, हरवणें, गुजरणें, नष्ट होणें,
**जाने दो**–क्षमा करा, जाऊं द्या. [ वहाणें.
**गया घर**–दुर्दशा झालेलें घर.
**गया बीता**–दुर्दशा झालेला, निकृष्ट.
**जानि**–स्त्री. पत्नी. –अ. समजून. –वि.
**जानिब**–स्त्री. दिशा, बाजू. [ जाणणारा.
**जानी**–स्त्री. प्राणप्रिया. –वि. प्राणाशीं संबंध
**जानी दोस्त**–जिवाचा मित्र. [ असलेला.
**जानी दुष्मन**–प्राण घेऊं इच्छिणारा वैरी.
**जानु**–पु. मांडी, गुडघा.
**जानुपाणि–पानि**–अ. हात व गुडघे टेकून (रांगत्या मुलाप्रमाणें).
**जापक**–वि. जप करणारा.
**जापा**–पु. प्रसूतिगृह.
**जाफ़**–पु. मूर्च्छा, फेफरें, थकवा.
**जाफत**–स्त्री. मेजवानी.
**जाफ़रान**–पु. स्त्री. केशर.
**जाफ़रानी**–वि. केशरी, केशराचा.
**जाफ़री**–स्त्री. कामटयांचा तट्टया, झेंडूचें
**जाबजा**–वि. ठायींठायीं. [ फूल.
**जाबाली**–पु. एका ऋषीचें नांव.
**जाबिर**–वि. अत्याचारी.
**जाब्ता**–पु. कायदा, बंदोबस्त.
**जाब्ता दीवानी**–पु. दिवाणी कायदा.
**जाब्ता फ़ौजदारी**–पु. फौजदारी कायदा.
**जाम**–पु. प्रहर, जांभूळ, पेला. [ पलीता.
**जामगी**–पु. बंदूक किंवा तोफ डागण्याचा
**जामदानी**–स्त्री. बुट्टीदार कापड.
**जामन**–पु. विरजण.

**जामवंत**–पु. जांबुवंत.
**जामा**–पु. कपडा, पोशाख.
**जामेसे बाहर होना**–फार रागावणें.
**जामाता**–पु. जांवई.
**जामिक**–पु. पहारेकरी.
**जामिन**–पु. जामीन.
**जामिनी**–स्त्री. रात्र, जबाबदार.
**जामुन**–पु. जांभूळ.
**जामुनी**–वि. जांभळ्या रंगाचा.
**जामें**–अ. ज्यांत, तर, यासाठीं कीं.
**जामेवार**–पु. बुट्टेदार शालू किंवा चीट.
**जाय**–अ. व्यर्थ.–वि. उचित.
**जायका**–पु. रुचि.
**जायचा**–पु. जन्मपत्रिका.
**जायज़**–वि. उचित.
**जायज़ा**–पु. तपास, हजेरी. [ वाढलेला.
**जायद**–वि. निकामी, जास्त असलेला,
**जायदाद**–स्त्री. मिळकत, जमीनजुमला.
**जायदाद मनक़ूला**–चर संपत्ति.
**जायदाद ग़ैर मनक़ूला**–स्थावर सम्पत्ति.
**जायनमाज़**–स्त्री. नमाज पढतांना जमिनीवर अंथरावयाची लहानशी चटई.
**जायल**–वि. नाशवंत.
**जाया**–वि. नष्ट.
**जाया**–स्त्री. पत्नी.
**जाये**–वि. उत्पन्न केलेले (मुलगे).
**ज़ार**–पु. रशियाचा झार, जागा, ती जागा जेथें एकादी वस्तु फार होते.–वि. फार
**(गुल)ज़ार**–बाग. [ फार.
**ज़ारज़ार रोना**–फार रडणें.
**ज़ार व क़तार**–सतत.
**जार**–पु. परस्त्रीवर प्रेम करणारा पुरुष, विभक्ति. –वि. मारणारा किंवा नाश करणारा.
**जारा**–वि. जाळलेलें.
**जारी**–वि. प्रवाहित, चालू.-स्त्री. व्यभिचार.
**जारूब**–पु. झाडू.
**जाल**–पु. जाळें, समूह, एक प्रकारची तोफ, कोळ्याचें जाळें, युक्ति, कपट, चिलखत, जाळीदार वस्त्र, खिडकी, जादू, आभास, गर्व, कळी, बोटें सांधणारें कातडें, नेत्ररोग.–वि. जलमय.
**जालदार**–वि. जाळीदार.
**जालसाज़**–पु. दगाबाज, कपटी.
**जाला**–पु. डोळ्यांतील मोतीबिंदु, रांजण, कोळ्याचें जाळें.
**जालिक**–पु. ठक, पारधी, धीवर, गारुडी.
**जालिका**–स्त्री. जाळी, चिलखत, कोळी, (किडा), लोखंड, खिडकी, जळू, केळें, तोंडावरील बुरखा, विधवा स्त्री.
**ज़ालिम**–वि. जुलमी.
**जालिया**–वि. कपटी, धोकेबाज.
**जाली**–वि. कपटी, नकली, खोटा.–स्त्री. जाळी, एक प्रकारचा कशीदा, जाळीदार
**जावक**–पु. आळत्याचा रंग. [ कापड.
**जावन**–पु. विरजण.
**जावित्री**–स्त्री. जायपत्री.
**ज़ाविया**–पु. कोपरा.
**जावेद**–वि. स्थायी.
*जासु–वि. ज्याचा.*
**जासूस**–पु. हेर.
**जाह**–पु. उच्चपद, प्रतिष्ठा.
**जाहि**–वि. ज्याला.
**ज़ाहिद**–पु. धर्मनिष्ठ, त्यागी.
**ज़ाहिर**–वि. उघड, समजलेलें.
**ज़ाहिरदार**–वि. दिखाऊ, बनावट. [ काम.
**ज़ाहिरदारी**–स्त्री. देखाव्या करितां केलेलें

**जाहिरा**–अ. उघडपणें.
**जाहिल**–वि. मूर्ख, अशिक्षित.
**जाही**–स्त्री. जाई.–स. जिला, ज्याला.
**जिंदगी, जिंदगानी**–स्त्री. जीवन, आयुष्य.
**जिंदाँ**–पु. तुरुंग.
**जिंदा**–वि. जिवंत. [ रसिक.
**जिंदा दिल**–वि. आनंदी, साहसी, हंसतमुख,
**जिंस, जिनिस**–स्त्री. प्रकार, वस्तु, सामान, धान्य. [–वि. क्रमवार, जिन्नसवार.
**जिंसवार**–पु. पीकपट्टी (तलाठ्याची).
**जिअत**–अ. जिवंत असतांना.
**जिआउ, जिआव**–क्रि. स. जगूं दे.
**जिउ**–पु. जीव.
**जिक्र**–पु. चर्चा, उल्लेख.
**जिक्रे खैर**–शुभचर्चा, ईश्वराचें गुणगान.
**जिगर**–पु. जीव, काळीज, साहस, सत्व.
**जिगजिगिया**–वि. तोंडपुज्या.
**जिगजिगी**–स्त्री. विनंति, खुशामत, झिग.
**जिगरा**–पु. साहस. [ करणांतली (गोष्ट).
**जिगरी**–वि. जिवलग, अभिन्न हृदय, अंतः-
**जिच, जिच्च**–वि. लाचार.–स्त्री. निरुपाय, बुद्धिबळाच्या खेळांतील पेच प्रसंग.
**जिठाई**–स्त्री. मोठेपणा. [ पु. विजय.
**जित**–अ. कोठें, जिकडे, जेथें.-वि. जिंकलेलें.-
**जितना**–वि. जेवढा.–अ. ज्या प्रमाणांत.
**जितवना**–क्रि. स. पाहा 'जताना'.
**जितवाना**–क्रि. स. जिंकविणें.
**जितवार**–वि. विजयी.
**जिता**–पु. शेतकऱ्यांचें पेरणींत परस्पर
**जिताना**–क्रि. स. जिंकविणें. [ साहाय्य.
**जिताष्टमी**–स्त्री. जिवतीचें व्रत.
**जिते**–वि. जितकें.
**जितै**–अ. जिकडे.
**जितो–तौ**–वि. जेवढें, जितका.
**जिद, जिद्द**–स्त्री. हट्ट, दुराग्रह, वैर.
**जिद्दी**–वि. हट्टी.
**जिधर**–अ. ज्या बाजूला, जिकडे.
**जिन**–पु. मुसलमान भूत, विष्णु, सूर्य, बुद्ध, जैनांचे तीर्थंकर.-स. जे, ज्यांनीं, ज्यांचा.
**जिना**–पु. व्यभिचार.
**जिनाकार**–वि. व्यभिचारी.
**जिना बिल जब्र**–पु. स्त्रीवर तिच्या इच्छेविरुद्ध केलेला बलात्कार.
**जिनि**–अ. नाहीं, नको.
**जिंदगी**–स्त्री. जीवन, आयुष्य.
**जिन्दा**–वि. जिवंत.
**जिन्ह**–सर्व. ज्यानें, ज्यांनीं. [ घेण्याची क्रिया.
**जिबह**–पु. पशुपक्ष्यांचा गळा कापून प्राण
**जिमन**–पु. कायद्याचें कलम, आंतील भाग.
**जिमाना**–क्रि. स. जेवविणें, खावविणें.
**जिमि**–अ. जसें.
**जिमीकंद**–पु. रण.
**जिम्मा**–पु. जबाबदारी, रक्षण, देखरेख.
**जिम्मेवार, जिम्मेदार**–पु. जबाबदार.
**जिय–या, जियरा**–पु. मन, जीव.
**जियन**–पु. जीवन.
**जियबधा**–पु. प्राणदंड देणारा.
**जियाँ, जियान**–पु. तोटा, हानि.
**जियादा**–वि. जास्त. [ पोषण करणें.
**जियाना**–क्रि. स. जिवंत ठेंवणें, पालन
**जियाफत**–स्त्री. अतिथिसत्कार, मेजवानी.
**जियारत**–स्त्री. दर्शन, तीर्थयात्रा.
**जियारत लगना**–रीघ लागणें.
**जियारती**–वि. दर्शनार्थ जाणारा, यात्री.
**जियारी**–स्त्री. जीवन, साहस, उपजीविकेचें साधन.

झिगरा–पु. थवा, दल, पठाणांच्या जमातीची सभा.
जिरह–स्त्री. वादविवाद, उलटतपासणी, तकार, सत्य समजण्याकरितां केलेली [ चौकशी.
जिरह–स्त्री. कवच, चिलखत.
जिरही–वि. चिलखत घातलेला,कवचधारी.
जिराअ(य)त–स्त्री. पाहा 'ज़राअत'.
जिर्म–पु. शरीर, निर्जीव पदार्थाचा पिंड.
जिला–स्त्री. चमक. [ चमकदार करणें.
जिला देना–घासून किंवा रोगण लावून
ज़िला–पु. प्रांत, जिल्हा.
जिलाकार–साज़–पु. हत्यारांना धार लावणारा, झिलई देणारा. [ कारी.
ज़िला(ले)दार–पु. जिल्ह्यावरील अधि-
ज़िलाधीश–पु. कलेक्टर. [ रक्षण करणें.
जिलाना–क्रि.स. जगविणें, पालन करणें,
जिल्द–स्त्री. कातडी, पुस्तकाचें वेष्टण, पुस्तकाची एक प्रत, पुस्तकाचा एक भाग.
जिल्दबंद,जिल्दसाज़–पुस्तक बांधणीचें काम [ करणारा.
ज़िल्लत–स्त्री. अपमान.
ज़िल्लत उठाना–अपमानित होणें तुच्छ, [ ठरणें.
जिव–पु. जीव.
जिवनमूरी–स्त्री. संजीवनी.
जिस–सर्व. ज्या.
जिसू–स. ज्याचा.
जिस्ता–पु. जस्त, मूठ, शिपायांची लहानशी [ तुकडी, कागदांचा दस्ता.
जिस्म–पु. देह.
जिस्मानी–वि. शारीरिक.
जिह–स्त्री. धनुष्याची दोरी.
जिहन–पु. बुद्धि, अक्कल, समजूत.
जिहन खुलना–बुद्धीचा विकास होणें.
जिहननशीन होना–लक्षांत येणें.
ज़िहन लड़ाना–खूप विचार करणें.
जिहाद–पु. धर्मयुद्ध.
जिहालत–स्त्री. अज्ञान.
जी–पु. जीव, मन, संकल्प, साहस, धैर्य, तब्येत. –अ. सन्मानसूचक शब्द (हा नामाचें शेवटीं येतो) जसें–गाँधीजी.
जी अच्छा होना–निरोगी असणें.
(किसी पर)जी आना–प्रेम होणें.
जी उचटना, जी उड़ जाना–मन उडणें.
जी करना–हिम्मत करणें, इच्छा करणें.
जीका बुख़ार निकालना–रडून, बोलून मनांतील क्रोध व दुःख शांत करणें.
जी खट्टा होना–मन उतरणें.
जी खोलकर–मोकळया मनानें.
(जितना)जी चाहे–यथेष्ट.
जी चलना–इच्छा होणें.
जी चुराना–काम चुकविणें. [ करणें.
जी छोटा करना–उदास होणें, चिक्कूपणा
जी टंगा रहना या होना–चिंतित असणें.
जी डूबना–मन अस्थिर होणें.
जी पर आ बनना–जिवावर बेतणें.
जी पर खेलना–जीव संकटांत घालणें.
जी मचलाना या मतलाना–मळमळणें.
जीसे उतर जाना–मन उतरणें.
जीसे जाना–मरणें.
जी होना–प्रेम असणें, जीव असणें.
जीअ–उ–पु. जीव.
जीअन–पु. जीवन.
जीजा–पु. वडील बहिणीचा नवरा.
जीजी–स्त्री. वडील बहीण.
जीत–स्त्री. जय, फायदा.
जीतना–क्रि. स. जिंकणें, सफल होणें.
जीता–वि. जिवंत, मापांत किंवा वजनांत जास्त भरलेला. [ अन्याय करणें.
जीती मक्खी निगलना–जाणून बुजून

जीन–पु. घोड्यावर घालण्याचें जीन, एक [ जाड कापड.
जीनत–स्त्री. शोभा.
जीनसवारी–स्त्री. खोगीर घालून घोड्या- [ वर बसणें.
जीनहार–अ. कदापि.
जीना–पु. जिना, शिडी.
जीना–क्रि. अ. जगणें, इच्छित वस्तु मिळल्यामुळें खुष होणें.
जीफहम–वि. हुषार, बुद्धिमान. [ वस्तु.
जीभ–स्त्री. जीभ, जिभेच्या आकाराची
जीभ चलना–खावखाव होणें.
जीभ पकड़ना, जीभ बंद करना–बोलूं न देणें.
जीमना–क्रि. स. जेवणें.
जीय–पु. जीव.
जीयति–स्त्री. जीवन.
जीर–पु. फुलांचें केसर, जिरें, कवच, [ तलवार.
जीरन–वि. जीर्ण.
जीरा–पु. जिरें, फूल, केशर.
जीव–पु. जीव, आत्मा, प्राणी, प्राण, व्यवसाय, कर्ण, पुष्य नक्षत्र.
जीवजंतु–सर्व जनावर व प्राणी, कीड मुंगी.
जीवट–पु. हिंमत, धाडस.
जीवन–पु. सजीवता, आयुष्य, जिवंत ठेवणारी वस्तु (हवा, पाणी वगैरे).
जीवनमूरि–स्त्री. संजीवनी.
जीवनी–स्त्री. जीवनचरित्र, आयुष्य.–वि. जीवनासंबंधीं, जीवन देणारी.
जीवरा–पु. जीव.
जीवसू–स्त्री. जिवंत संतति असलेली स्त्री.
जीवाजून–पु. जीवजंतु.
जीवाणु–प. रोगजंतु.
जीविका–स्त्री. निर्वाहाचें साधन.
जीस्त–स्त्री. आयुष्य, जीवन.
जीह, जीहा, जीही–स्त्री. जीभ.

जुंबिश–स्त्री. चाल. गति.
जुआँ–स्त्री. ऊ.
जु–वि. जो.
जुआ–पु. जुगार, जूं.
जुआचोर–पु. ठग, फसव्या.
जुआर–स्त्री. ज्वारी.
जुआरभाटा–पु. भरती ओहोटी.
जुआरी–पु. जुगारी.
जुंई–स्त्री. लहान ऊ.
जुकाम–पु. सर्दी, पडसें.
(मेंढकी को) जुकाम होना–अशक्य गोष्ट होणें, साधारण माणसानें केलेलें मोठें [ काम.
जुग–वि. दोन, दोन्ही, जोडी, युग.
जुगजुगाना–क्रि. अ. लुकलुकणें, उन्नति होणें, वर येणें. [ चातुर्य.
जुगत–स्त्री. युक्ति, हातचलाखी, व्यवहार
जुगनी, जुगनू–स्त्री. काजवा.
जुगराफिया–पु. भूगोल.
जुगल, जुगुल–वि. दोन्ही, जुळलेलें.
जुगवना, जुगाना–क्रि. स. संभाळणें, सांच- [ वून ठेवणें.
जुगाड़–पु. व्यवस्था.
जुगालना–क्रि. अ. रवंथ करणें.
जुगाली–स्त्री. रवंथ.
जुगुति–स्त्री. युक्ति.
जुज–पु. भाग, पूर्ण कागद.–अ. शिवाय.
जुजदान–पु. पुस्तक बांधण्याचें कापड.
जुजबंदी–स्त्री. पुस्तकाची बांधणी.
जुजबी–वि. कांहींसा, सामान्य.
जुझ, जूझ–स्त्री. लढाई.
जुझाऊ–वि. युद्धसंबंधी, युद्धोपयोगी, लढाईंत कामास येणारा.
जुझार–पु. वीर, मुलगा, लढाई.
जुट–स्त्री. जोडी, दल.

**जुटना**–क्रि.अ. एकत्र येणें, गुंडाळणें, संभोग करणें, कार्याला लागणें, मिळणें, भेटणें.
**जुटली**–वि. केसांच्या लांब जटा असलेला.
**जुटाना**–क्रि. स. जमविणें, कार्याला लावणें,
**जुटी**–स्त्री. गट्टी. [ भेटविणें.
**जुट्टी**–स्त्री. लहान पेंढी, जुडी.
**जुठारना**–क्रि. स. उष्टें करणें.
**जुठिहारा जुठैंवा**–वि. उष्टें खाणारा.
**जुड़ना**–क्रि. अ. जुळणें, एकत्र होणें, प्राप्त होणें, थंड होणें, नांगरणें, कामाला लागणें. [ नायटा.
**जुड़पित्ती**–स्त्री. अंगावर पित्त उठणें,
**जुड़वाँ**–वि. जुळें.–पु. जुळीं मुलें.
**जुड़वाना**–क्रि. स. शांत करणें, थंड करणें. जोडविणें, एकत्र करविणें.
**जुड़ाई, जोड़ाई**–स्त्री. जोडण्याचें काम, गवंडीकाम किंवा त्याची मजुरी.
**जुड़ाना**–क्रि. अ. थंड होणें, तृप्त होणें, शांत होणें.–क्रि. स. थंड करणें, शांत
**जुत**–वि. युक्त. [ करणें, संतुष्ट करणें.
**जुतना**–क्रि. अ. जोडणें, एकाद्या कामाला लागणें. [ कामाला लावणें.
**जुतवाना**–क्रि. स. दुसऱ्याकडून जुंपून घेणें,
**जुत्थ**–पु. झुंड, समूह.
**जुताई, जोताई**–स्त्री. जोडण्याची क्रिया, नांगरण्याचें काम, नांगरण्याची मजूरी.
**जुतियाना**–क्रि. स. जोडे मारणें, फार
**जुदा**–वि. वेगळें, भिन्न. [ अपमान करणें.
**जुदाई**–स्त्री. वियोग.
**जुध्द**–पु. युद्ध.
**जुनूँ, जुनून**–पु. वेडेपणा. [ जानवें, जानवें.
**जुन्नार**–पु. पारशांचें कमरेस बांधावयाचें
**जुन्हई, जुन्हाई, जुन्हैया**–स्त्री. चांदणें, चंद्र.

**जुन्हरी, जुन्हारी**–स्त्री. जोंधळा.
**जुपै**–अ. जर.
**जुफ़्त**–पु. जोडी, युग्म.
**जुबराज**–पु. युवराज.
**जुब्बा**–पु. फकीराचा झगा.
**जुमरा**–पु. गर्दी, जमाव, फौज.
**जुमला**–पु. वाक्य, एकूण बेरीज.–वि. एकूण.
**जुमा**–पु. शुक्रवार.
**जुमेरात**–स्त्री. गुरुवार.
**जुरअत**–स्त्री. साहस. [ कसकस, थंडी.
**जुरझरी, जुरझुरी**–स्त्री. ताप येण्यापूर्वीची
**जुरना**–क्रि. अ. पाहा 'जुड़ना.'
**जुरमाना**–पु. दंड.
**जुराफ़ा**–पु. जिराफ.
**जुरूफ़**–पु. भांडें.
**जुरूर**–अ. खात्रीनें.
**जुर्म**–पु. अपराध.
**जुर्माना**–पु. दंड.
**जुर्रत**–स्त्री. साहस.
**जुर्रा**–पु. ससाणा (नर).
**जुर्राब**–स्त्री. पायमोजा.
**जुल**–पु. कपट, फसवणूक.
**जुलाब, जुल्लाब**–पु. जुलाब, रेचक औषध.
**जुलाल**–वि. स्वच्छ, शुद्ध (पाणी).
**जुलाहा**–पु. विणकर, कोष्टी, एक किडा.
**जुलूस**–पु. मिरवणूक, राज्यारोहण, एकाद्या उत्सवाचा समारोप.
**जुलोक**–पु. देवलोक. [ दुसरा प्रियकर.
**जुल्फ़, जुल्फ़ी**–स्त्री. केसांची बट, प्रेमिकेचा
**जुल्म**–पु. जुलुम, अन्याय.
**जुल्म टूटना**–संकट येणें. [ करणें.
**जुल्म ढाना**–जुलुम करणें, अद्भुत काम
**जुल्मत**–स्त्री. काळोख.

**जुल्मात**–स्त्री. विशिष्ट अंधारी जागा.
**(बहरे) जुल्मात**–अटलांटिक महासागर.
**जुवती**–स्त्री. युवती.
**जुवराज**–पु. युवराज.
**जुवा**–पु. जुगार. [ धडपड.
**जुस्तजू**–स्त्री. तपास, शोधून काढण्याची
**जुहाना**–क्रि. स. जोडणें, संचित करणें.
**जुहार**–स्त्री. जोहार (नमन). [ घेणें.
**जुहारना**–क्रि. स. मदत मागणें, उपकार
**जुहावना**–क्रि.स. जोडविणें, संचित करविणें.
**जुही**–स्त्री. जुई, दारूकाम.
**जूँ**–स्त्री. ऊ. [ जाणीव होणें.
**(कानों पर) जूँ रेंगना**–परिस्थितीची
**जूँ तक न रेंगना**–दुर्लक्ष करणें. [ जलाशय.
**जू**–अ. युक्त, जलद.–स्त्री. नदी, कालवा,
**जूआ**–पु. बैलाच्या मानेवरचें जूं, खुंटा,
**जूजू**–पु. बाऊ, बागुलबोवा. [ जुगार.
**जूझना**–क्रि. स. झगडणें, लढून प्राण देणें.
**जूट**–पु. आंबाडा (स्त्रियांचा), अंबाडी, केसांची बट.
**जूठन**–स्त्री. उष्टी वस्तु, वापरलेली वस्तु.
**जूठा**–वि. उष्टें, वापरलेलें.
**जूड़ा**–पु. आंबाडा, चुंबळ, गवताची पेंढी.
**जूड़ी**–स्त्री. तापापूर्वी वाजणारी थंडी.
**जूता**–पु. जोडा.
**जूता उछलना**–जोडाजोडी होणें.
**जूता उठाना**–दास्य करणें.
**जूताखोर**–वि. निर्लज्ज.
**जूतियाँ चटकाना**–जोडे फाडणें.
**जूती**–स्त्री. स्त्रियांचा जोडा.
**जूती पैजार**–स्त्री. मारपीट, जोड्यानें होणारी मारामारी.
**जूतों दाल बँटना**–मारामारी होणें.
**जूथ**–पु. टोळी, समूह, सैन्य.
**जूथका**–स्त्री. पांढरी जुई.
**जूथप**–पु. सेनापति. [ योनी.
**जून**–पु. वेळ, गवत, जून महिना.–स्त्री.
**जूप**–पु. जुगार, वधुवरानें जुगार खेळण्याची लग्नांतील एक रीत, यज्ञांत बळी देण्याचा पशु बांधण्याचा खांब.
**जूमना**–क्रि. अ. भिडणें, झुलणें.
**जूर**–पु. संचय.
**जूरना**–क्रि. स. पाहा 'जोड़ना'.
**जूरा**–पु. पाहा 'जूड़ा'.
**जूरी**–स्त्री. पेंढी, एक पक्वान्न. [ संख्या.
**जूस**–पु. उकडलेल्या पदार्थाचें पाणी, सम
**जूसताक**–पु. एकीबकीचा खेळ.
**जूसी**–स्त्री. उसाचा रस आटवितांना
**जूह**–पु. पाहा 'जूथ'. [ निघणारी मळी.
**जूहर**–पु. पाहा 'जौहर'.
**जूही**–स्त्री. जुई, एक प्रकारचें दारूकाम.
**जेंवन**–पु. भोजन.
**जेंवना**–क्रि. स. जेवणें.
**जे**–स. 'जो' चें अनेकवचन.
**जेऊ**–स. जे कोणी, जे.
**जेठ, जेठा**–वि. वडील, सगळ्यांत चांगले.
**जेठ, जेठा**–पु. वडील दीर, दादा, जेष्ठ
**जेठानी**–स्त्री. वडील जाऊ. [ महिना.
**जेठीमधु**–स्त्री. जेष्ठीमध.
**जेठौत–ता**–पु. वडील दिराचा मुलगा.
**जेठौती**–स्त्री. वडील दिराची मुलगी.
**जेता**–पु. विजयी, विष्णु.–वि. जितकें.
**जेतिक**–अ. जेवढें, ज्याप्रकारें.
**जेते, जेतो**–वि. जितकें. –अ. ज्याप्रकारें.
**जेब**–स्त्री. खिसा. [ शोभा.
**जेब, जेबा**–वि. शोभिवंत, उपयुक्त. –स्त्री.

**जेबकट**–पु. खिसेकापू.
**जेबघड़ी**–स्त्री. खिशांतील घड्याळ.
**जेबी**–वि. खिशांत ठेवण्याजोगें, लहान.
**जेर**–स्त्री. गर्भाशय. –वि. पराजित, आवळ–अ. खालीं.
**जेर अंदाज**–पु. हुक्का ठेवण्याचें कापड.
**जेरतजवीज**–वि. विचाराधीन.
**जेरवस्त**–वि. अंतर्गत, पराजित, आधीन.
**जेरपाई**–स्त्री. एक प्रकारचा हलका जोडा.
**जेरबार**–वि. दु:खी, हैराण, खर्चानें जेरीस [आलेला.
**जेर व जबर**–पु. काळ परिवर्तन.
**जेरसाया**–अ. आश्रयाखालीं.
**जेल**–पु. तुरुंग, त्रासदायक काम.
**जेलखाना**–पु. तुरुंग.
**जेवना**–क्रि. स. जेवणें.
**जेवनार**–स्त्री. भोजन, जेवणावळ, पंगत.
**जेवर**–पु. दागिने.
**जेवरी**–स्त्री. दोरी.
**जेह**–स्त्री. धनुष्याच्या दोरीचा मध्यभाग, भिंतीच्या खालच्या भागाचा जाड [गिलावा.
**जेहन**–स्त्री. बुद्धि, धारणाशक्ति.
**जेहर, जेहरी**–स्त्री. तोरड्या, दागिना.
**जेहल**–पु. तुरुंग.
**जेहलखाना**–पु. तुरुंग.
**जेहि, जेही**–स. ज्याला, ज्याच्यापासून.
**जैं**–स्त्री. जितकें, ज्याप्रमाणें.
**जैतपत्र**–पु. अजिंक्य पत्र.
**जैतवार**–वि. विजयी.
**जैतून**–पु. एक झाड, आलिव्ह झाड.
**जैन**–पु. भारतांतील एक धर्मसम्प्रदाय.
**जैनी**–पु. जैन धर्माचा मनुष्य.
**जैनु**–पु. भोजन, आहार.
**जैबो**–क्रि. अ. जाणें.
**जैयद**–वि. बलवान, श्रेष्ठ, श्रीमंत, सुपीक, [उत्तम.
**जैल**–पु. खालचा भाग, पदर.
**जैलमें**–खालीं, पुढें.
**जैलदार**–पु. महालकरी.
**जैसा**–वि. जसा, जितका, समान.–अ. जसें, [ज्याप्रकारें.
**जैसी**–व. जशी.
**जैसे**–अ. जसें, ज्याप्रमाणें.
**जैसे का तैसा**–जसेंच्या तसें.
**जैसे को तैसा**–जशास तसें.
**जैसे तैसे**–कसेंबसें.
**जैसो**–वि. जसें.
**जों**–अ. जसें, ज्याप्रकारें.
**जोंक**–स्त्री. जळू.
**जों तों**–अ. कसेंतरी.
**जोंधरी**–जोंधळा, बाजरी (कांहीं ठिकाणीं).
**जोंधैया**–स्त्री. चांदणें.
**जो**–स. संबंधवाचक सर्वनाम जो.-अ. जर.
**जोअना, जोवना**–क्रि. स. वाट पाहणें, आसरा शोधणें, शोधून काढणें, बघणें.
**जोइ, जोई**–स्त्री. पत्नी.–अ.पाहून.-सर्व.-जो.
**जोख**–स्त्री. वजन.
**जोखता, जोखिता**–स्त्री. स्त्री, योषिता.
**जोखना**–क्रि. स. तपासणें, वजन करणें.
**जोख(खि)म**–स्त्री. जबाबदारी, अरिष्ट [येण्याचा संभव.
**जोखा**–पु. हिशेब.
**जोग**–अ. च्याजवळ, च्याकरितां.–पु. पाहा- ['योग'.
**जोगंधर**–पु. शत्रुनाशक मंत्र.
**जोगड़ा**–पु. ढोंगी साधु.
**जोगता**–स्त्री. योग्यता.
**जोगवना**–क्रि. स. रक्षण करणें, जमवणें, आदर करणें, दुर्लक्ष करणें, पूर्ण करणें.
**जोगानल**–स्त्री. योगशक्तीनें उत्पन्न झालेला [अग्नि.
**जोगिंद्र, जोगींद्र**–पु. योगीश्रेष्ठ.

**जोगिन, जोगन, जोगिनी**—स्त्री. योगिनी.
**जोगिया**—वि. भगव्या रंगाचें, योग्याचे.
**जोगी**—पु. योगी, सारंगीवर गात फिरणारे भिक्षुक. [समाज, एक प्रकारचें गाणें.
**जोगीड़ा**—पु. गाणाऱ्यांचा एक लहानसा
**जोजन**—पु. योजन, चार कोस.
**जोट**—पु. जोडी, साथी, झुंड.—वि. बरो-
**जोटा**—पु. जोडा, युग्म. [बरीचा.
**जोटिंग**—पु. महादेव.
**जोटी**—स्त्री. जोडी, समान.
**जोड़**—पु. सांधा, बेरीज, समानता, पूर्ण पोशाख, ठिगळ, जोडीदार, मेळ, कपट.
**जोड़ मिलना**—तोडीस तोड भेटणें.
**जोड़तोड़**—स्त्री. डावपेच.
**जोड़न**—स्त्री. विरजण.
**जोड़ना**—क्रि. स. जोडणें, बेरीज करणें, एकत्र करणे, प्रज्वलित करणें, संबंध स्थापित करणें, वाक्यांची योजना करणें.
**जोड़वाँ**—वि. जुळी (मुलें). [काम.
**जोड़वाई, जोड़ाई**—स्त्री. जोडून घेण्याचें
**जोड़वाना**—क्रि. स. जुळवून घेणें. [मजुरी.
**जोड़ाई**—स्त्री. जोडण्याची क्रिया, किंवा
**जोड़ी**—स्त्री. जोडी, मुग्दल जोडी, दोन घोड्याची किंवा बैलाची गाडी, घुगरू.
**जोत**—स्त्री. बैलाला गाडीला जोडतांना त्याच्या गळ्यांत बांधावयाची दोरी, तराजूच्या पारड्याला बांधावयाची दोरी, ज्योति.
**जोतखी, जोतिखी**—पु. ज्योतिषी.
**जोतना**—क्रि. स. जोडणें, नांगराला जुंपणें, नांगर चालविणें, एकाद्याला जबरदस्तीनें कामाला लावणें.
**जोता**—पु. जोतें, नांगरणारा मनुष्य, फार मोठी लोखंडी कांब. [फाळ.
**जोताई**—स्त्री. नांगरण्याची मजुरी किंवा
**जोत, जोति, जोती**—स्त्री. ज्योत, धान्य पेरण्याजोगी भूमि, दिवा.
**जोतिष—स**—पु. ग्रहांसंबंधीची विद्या.
**जोधा**—पु. योद्धा.
**जोन, जोनि**—स्त्री. योनी.
**जोन्ह, जोन्हाई,**—स्त्री. चांदणें, चंद्र.
**जोपै**—अ. जरी, यद्यपि.
**जोफ़**—पु. वृद्धावस्था, निर्बलता, मूर्च्छा.
**जोबन—ना—नवा**—पु. तारुण्य, कुच, सौंदर्य.
**जोम**—पु. उत्साह, आवेश, अभिमान,
**जोय**—स्त्री. पत्नी. —स. जो, ज्या.
**जोयना**—क्रि. स. जाळणें, पाहणें, शोधणें,
**जोयसी**—पु. ज्योतिषी. [आश्रय पाहाणें.
**जोयाँ**—वि. शोधक.
**जोर**—पु. वेग, जोर, प्रबलता, आधार, अधिकार, आवेश, भरंवसा, मेहनत,
**जोरोंपर होना**—जोरांत असणें. [व्यायाम.
**जोरोंपर**—वेगांत, भरंवशावर, जोरावर.
( **किसीके** ) **जोरपर कूदना**—एकाद्याच्या
**जोरशोर**—पु. धामधूम. [जिवावर उडणें.
**जोरावर**—वि. बलवान.
**जोरी**—स्त्री. जोडी, युग्म, बळजबरी.
**जोरू**—स्त्री. पत्नी.
**जोल**—पु. समूह, झुंड.
**जोला**—पु. कपट, फसवणूक.
**जोलाहल**—स्त्री. ज्वाला.
**जोवना**—क्रि. स. पाहणें, पारखणें.
**जोश**—पु. उकळी, उत्साह, आवेश.
**जोश खाना**—उकळी येणें.
**जोश देना**—उकळणें, उकडणें.
**जोश व खरोश**—खूप जोर.

**जोशन**–पु. बाहूवर बांधण्याचा दागिना,
**जोशांदा**–पु. काढा. [कवच.
**जोशीला**–वि. जोरदार, तेजस्वी, भावना-प्रधान. [सुखानें, मुकाट्यानें.
**जोष**–पु. सुख, प्रीति, आनंद, मौन.–अ.
**जोषित, जोषा**–स्त्री. पत्नी, स्त्री.
**जोसि**–पु. ज्योतिषी. [कृपा दृष्टि.
**जोह, जोहन**–स्त्री. शोध, वाट पाहणें,
**जोहड़**–पु. डबकें. [पाहणें.
**जोहना**–क्रि. स. पाहणें, शोधणें, वाट
**जोहरा**–पु. गुरु (ग्रह).
**जोहार**–पु. प्रणाम, पाहा 'जौहर.'
**जोहारना**–क्रि. अ. लवून नमस्कार करणें.
**जौं**–अ. जसें, जो, जर.
**जौंराभौंरा**–पु. तळघर.
**जौंलों**–अ. जोपर्यंत.
**जौ**–पु. जव, एक लवचिक रोपटें, सहा मोहरीइतकें वजन. –अ. जर, जेव्हां.
**जौक़**–पु. गर्दी, सैन्य. [होणारा आनंद.
**जौक़**–पु. एकादी वस्तु प्राप्त झाल्यामुळें
**जौक़ शौक़**–पु. मजा.
**जौजा**–पु. मिथुन रास.
**जौजा**–स्त्री. पत्नी, बायको.
**जौन**–पु. यवन. –स. जो.
**जौर**–पु. अत्याचार.
**जौहर**–पु. रत्न, तत्व, विशेषता, आत्महत्त्या, पराजयानंतर रजपूत स्त्रियांचें स्वतःला जाळून घेणें, जाळून घेण्यासाठीं पेटविलेली चिता.
**जौहरी**–पु. रत्नपारखी, रत्नविक्रेता.
**ज्ञान-छांटना**–स्वतःचें ज्ञान प्रदर्शित करण्या-
**ज्ञापक**–वि. सूचक. [करितां गप्पा मारणें.
**ज्ञापन**–पु. दाखविण्याचें काम.
**ज्ञापित**–वि. दाखविलेला.
**ज्या**–स्त्री. धनुष्याची दोरी, पृथ्वी, माता, परिघाचे कोणतेही दोन बिंदु सांधणारी सरळ रेषा.
**ज्यादती**–स्त्री. अधिकता, अत्याचार.
**ज्यादा**–वि. जास्त, पुष्कळ.
**ज्याफत**–स्त्री. भोजन, पाहुणचार.
**ज्यामिति**–स्त्री. भूमितिशास्त्र.
**ज्यूं, ज्यों, ज्यौं**–अ. जसें, ज्या रीतीनें.
**ज्यों ज्यों**–जसें जसें.
**ज्यों त्यों**–कसें बसें.
**ज्यों त्यों करके**–कसें तरी करून.
**ज्योंहीं**–इतक्यांत, नाहीं तोंच.
**ज्योति**-स्त्री. ज्योत, द्वार, कुंडलिनी, प्रकाश, अग्नि, सूर्य, नक्षत्र, डोळ्यांतील बाहुली, दृष्टि, विष्णु, ईश्वर.
**ज्योतिरिंगण**–पु. काजवा.
**ज्योनार**–स्त्री. शिजलेलें अन्न, भोजन.
**ज्यौनार**–स्त्री. जेवणावळ, मेजवानी,
**ज्योहत**–पु. आत्मत्याग. [भोजन.
**ज्यौ**–अ. जर.
**ज्वर**–पु. ताप. [ठळक, प्रकाशित.
**ज्वलंत**–वि. अत्यंत स्पष्ट, धडधडीत,
**ज्वार**–स्त्री. भरती, ज्वारी.
**ज्वारभाटा**–पु. भरती ओहोटी.
**ज्वाला**–स्त्री. आगीची लपेट, विषाची आग.
**ज्वालामुखी पर्वत**–वि. ज्याच्या शिखरांतून धूर, राख, व वितळलेला रस बाहेर पडतात असा पर्वत, ज्वालामुखी.

## [ झ ]

**झंक(ख)ना**–क्रि. अ. पश्चात्ताप करणें, दुसऱ्याला दुःख सांगणें. –पु. दुःखाची
**झंकार**–स्त्री. झणत्कार. [हकीगत.

**झंखाड़**–पु. कांटेरी झाड किंवा झुडुप, पानें झडलेलें झाड, टाकाऊ वस्तूंचा [समूह.
**झंगा, झगा**–पु. झगा.
**झंगुली**–स्त्री. झबलें.
**झंझट**–स्त्री. फुकटचें भांडण, त्रास, भानगड, पंचाईत.
**झंझर**–स्त्री. मातीचें भांडें, पाण्याचा खुजा.
**झँझरा**–वि. जाळीदार, बारीक भोकें असलेलें.
**झंझरी**–स्त्री. जाळीदार वस्तु, जाळीची [खिडकी.
**झंझा**–पु. झंझावात, वादळ, जोराचा पाऊस, खणखण शब्द, नष्ट वस्तु.
**झंझी**–स्त्री. फुटकी कौडी.
**झंझोड़ना**–क्रि. स. झटकणें, हिसडा देणें.
**झंडा**–पु. ध्वज.
**झंडा ऊँचा होना**–विजय होणें, धाक बसणें.
**झंडा खड़ा करना**–झेंडा उभारणें, युद्धाची सिद्धता करणें. [सूचना देणें, सत्ता घेणें.
**झंडा गाड़ना, झंडा फहराना**–विजयाची
**झंडी**–स्त्री. लहान ध्वज.
**झँडूला**–वि. जावळ न काढलेलें (मूल). दाट पानें असलेला (वृक्ष), केसाळ.
**झंप**–पु. लांब उडी, घोडयाच्या गळयांतील एक दागिना.
**झंप देना**–उडविणें, उडी मारणें.
**झंपन**–वि. झांकण.
**झँपना**–क्रि. अ. लपणें, झेप टाकणें, उडी मारणें, तुटून पडणें, लाजणें.
**झंपरी**–स्त्री. पालखी झांकण्याची खोळ.
**झंपान**–पु. डोंगरावर माणसें घेऊन जाण्याकरितां केलेली एक प्रकारची डोली.
**झंपित**–वि. आच्छादित.
**झँपोला**–पु. करंडी.
**झंबराना**–क्रि. अ. काळेकुट्ट होणें, कोमेजणें.
**झंबा**–पु. विटकरीचा तुकडा, वत्री.
**झँबाना**–क्रि. अ. सुकणें, काळसर होणें, अग्नि मंद होणें, कोमेजणें. –क्रि. स. काळसर करणें, विस्तव विझविणें.
**झँसना**–क्रि. स. हळू हळू मालिश करणें, फुसलावून दुसऱ्याचें द्रव्य हरण करणें.
**झइँ, झाँई**–स्त्री. पडछाया, प्रतिबिंब, झलक.
**झक**–स्त्री. रडगाणें, ध्वनि, तिडिक, मासा.
**झक(ख)केतु**–पु. कामदेव.
**झकझक**–हुज्जत, बडबड.
**झकझका**–वि. चकचकित, लखलखीत.
**झकझकाहट**–स्त्री. झगझगाट. [झटका देणें.
**झकझेलना-झोरना**–क्रि. स. हिसका देणें,
**झकझोर**–पु. झटका, सोंसाटा. –वि. जलद.
**झकझोरा**–पु. झटका.
**झकना**–क्रि. अ. बडबडणें, रागावून बोलणें.
**झकाझक**–वि. अत्यंत उज्वल, चमकणारें.
**झकुराना**–क्रि. अ. झुलणें.–क्रि. स. झुलविणें.
**झकोर–ल**–पु. झोत, झोका.
**झकोरना**–क्रि. अ. वाऱ्याचा झोत येणें.
**झकोरा**–क्रि. अ. वाऱ्याचा झोत. [बडचा.
**झक्कड़**–पु. वावटळ. –वि. लहरी, बड-
**झक्की**–वि. बडबडया, वाचाल, विक्षिप्त.
**झक्खना**–क्रि. अ. पस्तावणें, चिंता करणें.
**झख–ष**–स्त्री. पश्चाताप, मासा, जलचर, नक्र, उष्णता, मीनरास, अरण्य, ओसाड देश.
**झख मारना**–फुकट वेळ घालविणें, नाक मुठींत धरणें, वाईट काम करणें.
**झगड़ना**–क्रि. अ. भांडणें, वादविवाद करणें.
**झगड़ालू**–त्रि. भांडखोर.
**झगर**–पु. एक पक्षी.
**झगला, झगा**–पु. झबलें.

**झज्झर**–स्त्री. रुंद तोंडाचें पाण्याचें भांडे, [खुजा.
**झज्झी**–स्त्री. फुटकी कौडी.
**झझकन, झझक**–स्त्री. भडक, रागानें बोलण्याची क्रिया, थोड्या थोड्या वेळानें येणारा घाणेरडा वास, राहून राहून येणारी वेडाची लहर, संकोच.
**झझकना**–क्रि. अ. घाबरून चमकणें, गांगरणें, त्रागा करणें, सावध होणें.
**झझकाना**–क्रि. स. भीति दाखवून थोपविणें.
**झझकारना**–क्रि. स. रागानें दम भरणें, तुच्छ समजणें, झिडकारणें.
**झट**–अ. लवकर.
**झटकना**–क्रि. स. झटकणें, लुबाडून घेणें.
**झटका**–पु. लहानसा धक्का, हत्याराच्या एका फटक्यानें पशुवध करण्याची क्रिया, आपत्ति, रोग किंवा शोक इत्यादींचा आघात.
**झटकारना**–क्रि. स. झाडणें, लुबाडून घेणें.
**झटपट**–अ. झटकन.
**झटिति**–अ. झटपट, विचार न करितां.
**झड़**–स्त्री. पाण्याची धार, झड.
**झड़न**–स्त्री. झड, झडलेली वस्तु.
**झड़ना**–क्रि. अ. झडणें, गळून पडणें.
**झड़प**–स्त्री. झडप, लढाई, राग, आवेश.
**झड़पना**–क्रि. अ. आक्रमण करणें, भांडणें, जबरदस्तीनें ओढून घेणें.
**झड़बेरी**–स्त्री. जंगली बोर.
**झड़वाना**–क्रि. स. झाडविणें.
**झड़ाझड़**–क्रि. वि. लागोपाठ, सतत.
**झड़ी**–स्त्री. सरबत्ती, पावसाचा सतत वर्षाव, कुलपाच्या आंतील खटका. [संतापणें.
**झनकना**–क्रि. अ. ठणठण शब्द होणें,
**झनझनाना**–क्रि. अ. झणझण आवाज होणें.
**झनझनी**–स्त्री. झणझण असा आवाज.
**झनिया**–वि. झिरझिरीत, विरळ, अशक्त.
**झन्नफन्नहोना**–आदळ आपट होणें.
**झन्ना**–पु. शेव पाडण्याचा झारा.
**झन्नाहट**–स्त्री. झणत्कार.
**झप**–अ. झटदिशी, तावडतोब.
**झपक**–स्त्री. पळ, झांपड. [घाबरणें, लाजणें.
**झपकना**–क्रि. अ. पापणी लवणें, डुलकी घेणें,
**झपकाना**–क्रि. अ. वारंवार पापण्या [लवविणें.
**झपकी**–स्त्री. डुलकी, फसवणूक.
**झपकौंहा**–वि. तंद्रीत असलेला, मस्त.
**झपट**–स्त्री. आक्रमण, तक्रार.
**झपटना**–क्रि. अ. आक्रमण करणें.
**झपट्टा**–पु. आक्रमण. [झुकणें, डुलकी घेणें.
**झपना**–क्रि. अ. वाकणें, लाजणें, पापण्या
**झपाका**–पु. शीघ्रता.–अ. जलदीनें.
**झप्पान**–पु. पर्वतावर चढण्याकरितां वापरण्यांत येणारें एक वाहन.
**झपित**–वि. झांकलेला.
**झपेट**–स्त्री. झडप.
**झपेटना**–क्रि. स. झडप घालणें. [केसांचा.
**झबरा, झबरीला**–वि. विखरलेल्या लांब
**झबरैला**–वि. झिपऱ्या असलेला.
**झबार**–स्त्री. तंटाबखेडा.
**झब्बा**–पु. गुच्छ, जरीचा गोंडा, जुडगा.
**झमक**–स्त्री. चमक, उजेड, नखरेबाज चाल.
**झमकना**–क्रि. अ. चमचमणें.
**झमकाना**–क्रि. स. चकाकविणें.
**झमकारा**–वि. झमझम शब्द करीत पाऊस पाडणारा (ढग).
**झमझम**–स्त्री. पावसाचा आवाज, घुंगुरांचा [आवाज.
**झमना**–क्रि. अ. वाकणें, दबणें.
**झमाका**–पु. दागिन्यांचा ध्वनि, पाऊस पडतांना होणारा आवाज, नखरा.

**झमाझम**–अ. तेजस्वी, झमझम शब्द करीत असलेला.
**झमाट**–पु. संध्याकाळ, जाळी (झुडपांची).
**झमूरा**–पु. केसाळ पशु, अस्वल.
**झमेला**–पु. बखेडा, गर्दी. [वेग.
**झर**–स्त्री. झरा, पावसाची झड, दाह, समूह,
**झरना**–क्रि. अ. झडणें, प्रवाह उंचावरून पडणें.–पु. झरा, चाळणी, झारा.–वि. प्रवाही.
**झरपना**–क्रि. अ. झोडपणें, झडप घालणें.
**झरमर**–वि. झिमझिम.
**झरसना**–क्रि. अ. होरपळून जाणें, कोमेजणें.
**झरहरना**–क्रि. अ. झरझर शब्द होणें.
**झरा**–पु. एक धान्य, पावसाची सर.
**झराझर**–अ. लागोपाठ, वेगानें.
**झरी**–स्त्री. झरा, बाजारांत वस्तु विकणाऱ्याकडून दररोज वसूल करावयाचे भाडें किंवा कर, पावसाची सर.
**झरोखा**–पु. झरोका, खिडकी.
**झल**–पु. दाह, उग्र कामना, राग, समूह.
**झलक**–स्त्री. चमक, छाया, अल्पदर्शन.
**झलकदार**–वि. चमकदार.
**झलकना**–क्रि. अ. चमकणें, आभास होणें.
**झलकनि**–स्त्री. झळक.
**झलका**–पु. फोड.
**झलकाना**–क्रि. स. चमकविणें, दर्शविणें.
**झलझल**–स्त्री. चमक, चकचकाट.
**झलझलाना**–क्रि. अ. चमकणें.
**झलझलाहट**–स्त्री. चकाकी.
**झलना**–क्रि. स. वारा घेण्याकरितां एकादी वस्तु इकडून तिकडें हालविणें.
**झलमल**–पु. झगझग.
**झलमला**–वि. चमकदार.
**झलमलाना**–क्रि. अ. लुकलुकणें.
**झलरा**–पु. एक प्रकारचें मिष्टान्न.
**झलराना**–क्रि. अ. पसरणें.
**झलवाना, झलाना**–क्रि. स. पंखा चालविणें (दुसऱ्याकडून), भांड्याला डाग लावविणें.
**झलाझल**–वि. लकलकित.
**झलाबोर**–पु. कलाबतूनें भरलेला लुगड्याचा [पदर.
**झल्ल**–स्त्री. वेडेपण.
**झल्ला**–पु. पेटारा, पाऊस, वर्षाव.
**झल्लाना**–क्रि. स. चिडविणें.-क्रि. अ. चिडणें.
**झष**–पु. लहान मासा, मगर, ताप, वन, मीन रास.
**झसना**–क्रि. स. लुबाडणें, ठकविणें.
**झहरना**–क्रि. अ. शिथिल पडणें, झरझर आवाज होणें (पावसाच्या झडीचा आवाज.)
**झहराना**–क्रि. अ. झरझर आवाज करून पडणें, रागावणें, हालविणें.
**झांई**–स्त्री. पडछाया, अंधार, कपट, प्रतिध्वनि, शरीरावर पडलेले काळे डाग.
**झाई बताना**–फसविणें.
**झांई मारना**–झांक मारणें.
**झांक**–स्त्री. डोकावण्याची क्रिया.
**झांकना**–क्रि. अ. डोकावणें.
**झांकर**–पु. कांटेरी कुंपण. [झरोका.
**झांकी**–स्त्री. अवलोकन, दर्शन, दृश्य,
**झांखना**–क्रि. अ. पस्तावणें.
**झांखर**–पु. कांटेरी सुकलेली फांदी.
**झांगला**–पु. सैल अंगरखा.
**झांझ**–स्त्री. झांज, राग, पाजीपणा.
**झांझड़ी**–स्त्री. तोरड्या, चाळ.
**झांझन**–स्त्री. पायांतील एक दागिना.
**झांझर**–स्त्री. पैंजण, चाळणी.–वि. जुनें,

भोंक असलेला. [तोरडी.
**झोंझरी**–स्त्री. खिडकीची जाळी, झांज,
**झोंझा**–पु. झारा, झांज, भांडण.
**झोंझिया**–वि. झांज वाजविणारा.
**झोंप**–स्त्री. झोप, पडदा, झांकण.
**झोंपना**–क्रि. स. झांकणें, लाजणें.
**झोंपो**–स्त्री. जारिणी, धोबीण, पक्षी.
**झोंवना**–क्रि. स. हातपाय घासून धुणें.
**झोंवर**–वि. काळसर, मलिन, कोमेजलेला, आळशी.
**झोंवली**–स्त्री. डोळ्याचा कोपरा, झांक.
**झोंवाँ**–पु. पाय घासण्याचा दगड, वज्री.
**झोंसना**–क्रि. स. दगा देणें, लुबाडणें.
**झोंसा**–पु. धोका, फसवणूक.
**झोंसू**–वि. दगाबाज.
**झाऊ**–पु. एक लहान झाड.
**झागा**–पु. फेस.
**झाड़फानूस**–झुंबर.
**झाड़**–पु. झाड, झुंबर.
**झाड़खंड**–पु. जंगल.
**झाड़झंखाड़**–पु. कांटेरी झाडांचा समूह, निरुपयोगी वस्तु, अडगळ.
**झाड़दार**–वि. दाट पालवीचें.
**झाड़न**–स्त्री. केरकचरा, झटकणी, झाडणी.
**झाड़ना**–क्रि. स. दूर करणें, झाडणें, रागावणें, भूतपिशाच्च काढून टाकणें.
**झाड़फ़ानूस**–पु. काचेचें झुंबर.
**झाड़फूंक**–स्त्री. भूत वगैरे काढण्याकरितां मंत्र म्हणून मारलेली फुंक.
**झाड़ बुहार**–स्त्री. साफ सफाई.
**झाड़ा**–पु. झडती, विष्टा, तपास.
**झाड़ू**–पु. केरसुणी, शेंडे नक्षत्र.
**झाड़ू फिरना**–मागें कांहीं न राहणें.
**झाड़ू मारना**–अपमान करणें, तिरस्कार [करणें.
**झाड़ू लगाना**–केर काढणें.
**झापड़**–पु. थप्पड.
**झाबर**–पु. दलदल.
**झाबा**–पु. टोपली, करंडी, हारा.
**झाम**–पु. गुच्छ, धमकी, धोका.
**झामक**–पु. जाळलेली वीट.
**झायँझायँ**–स्त्री. झणकार, ओसाड जागीं होणारा वाऱ्याचा आवाज.
**झार**–वि. एकच, सर्व, निःशेष, अगदीं. –पु. समूह. –स्त्री. दाह, ईर्षा, आंच.
**झारना**–क्रि. स. केंस विचरणें, वेगळें काढणें, झाडणें.
**झारहीं**–अ. करपल्यामुळें, भाजल्यामुळें.
**झारी**–स्त्री. झारी, तोटीचा गडू.
**झाल**–पु. झांज, डाग लावण्याची क्रिया. –स्त्री. तीक्ष्णता, तरंग, लहर, तिखटपणा, झणझणीतपणा, पाण्याची झड.
**झालना**–क्रि. स. पाणी थंड करणें, डाग लावणें.
**झालर**–स्त्री. मंडप, छत, झगा इत्यादींना लावलेला चीण घातलेला कापडाचा पट्टा, झांज.
**झावँ झावँ**–स्त्री. व्यर्थ बडबड, हुज्जत.
**झिंगवा**–स्त्री. एक लहान मासा.
**झिंगुली**–स्त्री. झगा. [असलेलें मडकें.
**झिंझिया**–स्त्री. नवरात्रांतील दिवा, भोकें
**झिझक**–स्त्री. पाहा 'झझक'.
**झिझकना**–क्रि. अ. चिडणें, भीतीमुळें थबकणें, सावध होणें.
**झिझकारना**–क्रि. स. दटावणें, झिडकारणें.
**झिझोड़ना**–क्रि. स. ओढाताण करणें.
**झिड़कना**–क्रि. स. झटकणें, तिरस्कारानें बोलणें.

**प्ररोहण**–पु. आरोहण, उगवणें.
**प्रलंब**–वि. वेंगट, लांबच लांब, लोंबणारें, उंच, पुढें आलेलें, टांगलेला, निघालेला. –पु. लोंबणें, आलंबन, मोड, लतांकुर, शाखा, स्त्रीस्तन, कंठमाला, कथील, [ कांकडी.
**प्रलंबन**–पु. आधार.
**प्रलय**–वि. प्रलय संबंधी.–पु. नाश, संहार, मूर्छा, जगाचा अंत, मृत्यु, महामारी, दुष्काळ इत्यादिनें राष्ट्रहानि, लय, ऐक्य.
**प्रलाप**–पु. बडबड, निरर्थक बडबड.
**प्रलेप**–पु. लेप, पोटीस, उटी, गिलावा.
**प्रवर्षण**–पु. एका पर्वताचें नांव, पाउस.
**प्रवाद**–पु. वदंता, जनापवाद, बोलणें मिष, [दंतकथा.
**प्रवान**–पु. पाहा 'प्रमाण'.
**प्रवास**–पु. परदेशवास, विदेश.
**प्रवाह**–पु. प्रवाह, ओघ, अखंडपणा.
**प्रविषना**–क्रि. अ. घुसणें.
**प्रविस**–पु. पाहा 'प्रवेश'.
**प्रवीण, प्रवीन**–वि. कुशल, हुशार. [बलिष्ठ.
**प्रवीर**–पु. श्रेष्ठ नर, शूर योद्धा.–वि. श्रेष्ठ,
**प्रवृत्ति**–स्त्री. प्रवाह, उत्पत्ति, आरंभ, कल, वर्तन, कर्तव्य, उद्योग, प्रचार, बातमी, हालचाल, व्यवहार.
**प्रवेश**–पु. घुसणें, गति, एखाद्या विषयाची माहिती, रीघ, दार, मार्ग, वेश्यास्थल, आकलन. [ मिळण्याकरितां दिलेला पैसा.
**प्रवेशिका**–स्त्री. प्रवेश पत्रिका, प्रवेश
**प्रवेस**–पु. पाहा 'प्रवेश'.
**प्रव्रज्या**–स्त्री. संन्यास.
**प्रशंसा**–स्त्री. स्तुति, वर्णन, प्रशंसा.
**प्रशंसक**–पु. खुशामत करणारा, स्तुति पाठक.
**प्रशस्ति**–स्त्री. स्तुति.
**प्रशाखा**–स्त्री. लहान फांदी, डहाळी.

**प्रश्न**–पु. प्रश्न, विचारण्याची गोष्ट, विचारण्याचा विषय, एक उपनिषद.
**प्रसंग**–पु. संबंध, संगति, निष्ठा, अनुराग, आसक्ति, चटक, नाद, विषय (चर्चेचा), निमित्त, अवसर, समय, गोष्ट घडणें, संभव, अनुमान, व्याप्ति, शिरकाव, निवेश, आरंभ, उपक्रम, मन आसक्त करणाऱ्या गोष्टी (गाणें, बजावणें इ.), प्रस्तावना, मुख्य कार्य करीत असतां सहज अन्य कार्य साधणें (होणें), प्राप्ति, आपत्ति, लागू पडणें.
**प्रसंगेन, प्रसंगात्**–अ. मुळें, संबंधानें, सहजीं, जातां जातां. [ कीर्ति.
**प्रसंसा**–स्त्री. स्तुति, गुणवर्णन, वर्णन,
**प्रसन्न**–वि. प्रफुल्ल, अनुकूल, संतुष्ट, स्वच्छ, उघड (अर्थ), बिनचूक.–स्त्री. सुरा, द्राक्षमद्य.
**प्रसव**–पु. जन्म, उत्पत्ति, बाळंत होणें, अपत्य, संतति, जन्मस्थान, उत्पत्ति-कारक, फूल, मोहार, फळ, परिणाम, कुल, सोमरस काढणें, यज्ञ.
**प्रसाद**–पु. प्रसन्नता, कृपा, नैवेद्य, प्रसाद, भोजन, शांति, स्वास्थ्य, निर्मलता, स्पष्टार्थता, सुबोधता, देव किंवा गुरू यांचा भुक्तावशेष, बक्षिस, कल्याण.
**प्रसार, प्रसारण**–पु. विस्तार, संचार, गमन, प्रसरण, शत्रूस वेढणें.
**प्रसिद्ध**–वि. प्रख्यात, विभूषित, उत्तम.
**प्रसिद्धि**–स्त्री. ख्याति, भूषण, सिद्धि, उत्तम [ सिद्धि.
**प्रसीद**–कृपा करा.
**प्रसूत**–वि. उत्पन्न झालेलें, प्रसवणारें.–स्त्री. बाळंतीण.–पु. बाळंतरोग, फूल.
**प्रसूति**–स्त्री. बाळंतपण, जन्म, कारण,

उद्भव, उत्पादितवस्तु, उत्पादक, आई.
**प्रसेक**—पु. प्रोक्षण, गळणें, सिंचन, स्राव, पीळ,
**प्रसेद**—पु. घाम. [कफ रोग, वांति, लाळ.
**प्रस्तर**—पु. दगड, थर, बिछाना, विस्तार, शय्या(पल्लव, पुष्प इ.नीं रचित), सपाट जागा, दर्भमुष्टि, दर्भशय्या, प्रकरण, भाग.
**प्रस्ताव**—पु. प्रकरण, अवसर, ठराव, चर्चा, प्रसंग, विषय, परिचय, आरंभ, प्रस्तावना, उल्लेख. [वना.
**प्रस्तावना**—स्त्री. आरंभ, उपोद्घात, प्रस्ता-
**प्रस्तुत**—वि. स्तुत्य, उपस्थित, सांगितलेला, तयार, सज्ज, घडलेलें, चालू, आतांचें, अपेक्षित, प्रकरण प्राप्त, संपादित, प्रसिद्ध केलेला.—पु. विषय (बोलण्याचा, चर्चेचा), वर्ण्यवस्तु, उपमेय, अंगीकृत-कार्य, प्रसंग, समय.
**प्रस्थान**—पु. पाठविणें, सैन्याचे कूच, यात्रा, रवानगी, मार्ग, धर्मपंथ, संन्यास धर्म,
**प्रहरी**—पु. पहारेकरी, घड्याळजी. [मृत्यु.
**प्रह्लाद**—पु. प्रह्लाद. [चेतना, कामोद्दीपन.
**प्रहर्ष**—पु. आनंद, अत्यानंद, शिस्नाची
**प्रहार**—पु. आघात, मारणें, ताडन करणें, तडाखा, युद्ध.
**प्राकृत**—वि. अडाणी, क्षुल्लक, मूळचा, स्वभावसिद्ध, सामान्य, नेहमींचा, भौतिक, मायेपासून झालेलें, माया प्रवर्तक.—पु. नीच मनुष्य, संस्कृतोत्पन्न एक प्राचीन भारतीय भाषा, यज्ञ विशेष.
**प्राकृतिक**—वि. स्वाभाविक, स्वभावसिद्ध, मायावी. [यांमधील प्रदेश.
**प्राची**—स्त्री. पूर्वदिशा, पूज्य व पूजक
**प्राचीन**—वि. जुने, पूर्वेकडील, पूर्वकालचा, पूर्वेचा, वृद्ध.—पु. तट, कुंपण, पूर्वेकडचा प्रदेश.—स्त्री. पहाडमूळ.
**प्राचीर**—पु. तट, कुंपण.
**प्राण**—पु. जीव, प्राणवायु, शक्ति, श्वास, वायु, अत्यंत आवडता, ब्रह्मा, विष्णु, अग्नि, बल, जीवात्मा, परमात्मा, इन्द्रिय, घ्राणेंद्रिय, अन्न, कवित्वशक्ति, काव्यरस, रक्त्याबोळ, जगणें.
**प्राण उड़ जाना**—घाबरणें, व्याकुळ होणें.
**प्राणका गाहक, प्राणका प्यासा**—जीव घ्यावयास उठलेला.
**प्राणोंका मुंहको आना**—प्राण कंठाशीं येणें.
**(किसीपर) प्राण देना**—दुसऱ्यासाठीं जीव
**प्राण पखेरू उड़ जाना**—प्राण जाणें. [टाकणें.
**प्राण फूंकना**—नवीन उत्साह उत्पन्न करणें.
**प्रात**—अ. सकाळीं.—पु. सकाळ.
**प्रान्त**—पु. प्रांत, भाग, सीमा, किनारा,
**प्रान्तीय**—वि. प्रांताचा. [दिशा, शेवट, अग्र.
**प्रान**—पु. पाहा 'प्राण.'
**प्रामाणिक**—वि. प्रमाणपूर्ण, शास्त्रसिद्ध, माननीय.—पु. सत्य, तर्कशास्त्री, व्यापारादि उद्योगांत मुख्य पंडित.
**प्रायद्वीप**—पु. द्वीपकल्प.
**प्रायः**—वि. गमन, संन्यासपूर्वक आमरणान्त भोजन त्याग, वैपुल्य, वयोवस्था (बाल, युवा इ.), मृत्यु.
**प्रारंभ**—पु. आरंभलेलें कार्य, आरंभ, आदि.
**प्रार्थना**—स्त्री. विनंति, इच्छा, याचना. —क्रि. स. विनंति करणें.
**प्रार्थनापत्र**—पु. विनंतिपत्र, अर्ज.
**प्रार्थी**—वि. प्रार्थना करणारा, याचक.
**प्रावृट**—पु. वर्षाऋतु. [प्रिय असणारा.
**प्रियतम**—पु. पति, स्वामी.—वि. प्राणापेक्षां
**प्रियवादिनि**—स्त्री. मधुर वचन बोलणारी.

**प्रीत**–वि. संतुष्ट, आनंदित, कृपाळु, प्रीति-
**प्रीतम**–पु. अतिप्रिय, प्रियतम, पति. [युक्त.
**प्रीति**–स्त्री. कृपा, प्रसन्नता, प्रेमसुख, आनंद,
संतोष, आवड, उत्कंठा, मदनाची एक
**प्रीतिभोज**–पु. मेजवानी, जेवणावळ. [स्त्री.
**प्रेत**–वि. मृत.–पु. भूत, पिशाच्च, नरकवास
भोगणारा प्राणी, पितर.
**प्रेमी**–पु. प्रेम करणारा, आसक्त.
**प्रेरक**–पु. प्रेरणा करणारा, पाठविणारा.
**प्रेरणा**–स्त्री. फेकणें, प्रयत्न, उत्तेजन, जोर,
**प्रेरना**–स्त्री. पाहा 'प्रेरणा'. [आवेश.
**प्रेरित**–वि. पाठविलेला.–पु. दूत.
**प्रेषक**–पु. पाठविणारा.
**प्रेक्षा**–स्त्री. पाहणें, दृष्टि, देखावा, शोभा,
खेळ, तमाशा, मागला पुढला विचार,
फांदी, बुद्धि, ज्ञान, मनन, नृत्य.
**प्रेक्षागृह, प्रेक्षागार**–पु. नाटकगृह, सभा-
**प्रोक्त**–वि. प्रसिद्ध. [स्थान.
**प्रोत**–वि. शिवलेलें, टाका मारलेलें,
ओंवलेलें, शिरकवलेलें.–पु. कापड,
उभें भरलेलें (सूत), गुंफलेलें, वेधलेला,
**प्रोपोगेंडा**–पु. प्रचारकार्य. [कोंदण केलेला.
**प्रौढ**–वि. प्रफुल्लित, पूर्ण वाढलेलें, पोक्त,
वयोवृद्ध, दाट, घन, धीट, गर्विष्ट,
जोराचा, दांडगा, विवाहित, पूर्ण, व्याप्त,
वादग्रस्त, व्यग्र, वर उचललेलें.
**प्रौढा**–स्त्री. निर्भीड स्त्री, नायिकाभेद,
३० ते ५० वर्षांची स्त्री.
**प्लव**–वि. तरंगणारा.–पु. पोहणें, पूर, उडी,
बुडी, ताफा (पोहून जाण्याचा), नौका,
होडी, बेडूक, वानर, मेंढा, पाण्यावर
तरणारा पक्षी (हंस, सारस, पाणकोंबडा
इ.) गति, उतरण, शत्रु, मत्स्य धरण्याचें
बांबूच्या कांबीचें जाळें, चांडाल,
उत्तम शिल्पी, प्लुत स्वर, पाठविणें,
प्रेषण, सुवासिक तृण, नागरमोथा.
**प्लवग, प्लवंग, प्लवंगम**–पु. वानर, बेडूक.
**प्लाव**–पु. उडी, गाळून घेणें, कांठोकांठ
भरणें, बुडवणें. [दीर्घ, मोठा (स्वर).
**प्लावित**–वि. भिजवलेलें, व्याप्त, पूर्ण,
**प्लुत**–वि. पूर्ण, व्याप्त.–पु. तीन मात्रेचा
स्वर, उडी, स्नान, घोड्याची चौकी, चाल.

## [फ]

**फंक**–स्त्री. फोड (फळाची).
**फंका**–पु. फक्की, तुकडा.
**फंकी**–स्त्री. फांकण्याचें औषध, फक्की.
**फंग, फग**–पु. फांस, बंधन, अनुराग. [दुःख.
**फंद**–पु. बंधन, फांस, जाळें, कपट, रहस्य,
**फंदवार**–वि. जाळें पसरणारा, पारधी.
**फँदना**–क्रि. अ. उल्लंघिणें, जाळ्यांत
**फंदा**–पु. जाळें, पाश, बंध, दुःख. [अडकणें.
**फंदा लगाना**–जाळें पसरणें. [विणें, गुंतविणें.
**फँदाना**–क्रि. स. जाळ्यांत अडकविणें, फस-
**फँफाना**–क्रि. अ. चांचरणें.
**फँसना**–क्रि. अ. अडकणें, गुंतणें, जाळ्यांत
फसणें, सांपडणें. [पकडणें, फसविणें.
**फँसाना**–क्रि. स. अडकविणें, जाळ्यांत
**फँसिहारा**–वि. जाळ्यांत पकडणारा.
**फक**–वि. पांढरा, स्वच्छ, फिकट.
**(रंग) फ़क पड़ना या हो जाना**–घाबरणें,
चेहरा फटफटीत पडणें.
**फ़क़त**–अ. फक्त, केवळ, मात्र.
**फ़क़ीर**–पु. भिक्षुक, साधु, निर्धन मनुष्य.
**फ़क़ीरी**–स्त्री. साधुत्व, कंगाली.
**फक्कड़**–वि. बेपर्वा, मस्त, भिकारी. [गिरी.
**फक्किका**–स्त्री. कूट प्रश्न, कोडें, फसवे-

**फ़क्र**–पु. दैन्य, दारिद्र, साधुत्व, अल्प- [संतोषीपणा.
**फ़ख़र–फ़ख़्र**–पु. गर्व, मान.
**फगुआ**–पु. होळी, शिमगा, फाल्गुन महिन्यांतील लोकांचा उल्हास, फाल्गुन महिन्यांत गाइलें जाणारें अश्लील गीत.
**फगुआ खेलना अथवा मनाना**–होळीच्या उत्सवांत रंग व गुलाल उधळणें.
**फगुनहट**–स्त्री. फाल्गुनांत वाहणारा सोसाटयाचा वारा.
**फचफचाना**–क्रि. अ. उमाळा येणें.
**फ़जर**–स्त्री. सकाळ, पहाट.
**फ़जल फ़ज़्ल**–पु. अनुग्रह, आधिक्य, वैपुल्य.
**फ़ज़ा**–स्त्री. खुलें मैदान, शोभा.
**फ़ज़ीलत**–स्त्री. श्रेष्ठत्व, मोठेपणा, चांगुलपणा, सद्वर्तन. [श्रेष्ठता संपादन करणें.
**फ़ज़ीलतकी पगड़ी बांधना**–विद्वत्ता किंवा
**फ़ज़ीहत**–स्त्री. फजिती, बदनामी, दुर्दशा.
**फ़ज़ूल**–वि. निरर्थक, जरुरीपेक्षां अधिक.
**फ़ज़ूल खर्च**–वि. उधळया, अपव्ययी.
**फटक**–पु. स्फटिक.–अ. झटकन, ताबडतोब.
**फटकन**–स्त्री. धान्य पाखडल्यावर बाहेर पडणारा भुसा, कोंडा.
**फटकना**–क्रि.स. आपटणें, झटकणें, हातपाय आपटणें, धान्य पाखडणें.–क्रि. अ. जाणें, पोहोंचणें, दूर होणें, तडफडणें, हातपाय आपटणें, श्रम करणें.
**फटका**–पु. पिंजण, नीरस कविता, फाटक.
**फटकार**–स्त्री. धिक्कार, झिडकार, धुडकावणी.
**फटकारना**–क्रि. स. धिक्कारणें, दरडावणें, फटकारणें, कपडे जोरानें आपटून [धुणें, लाभ घेणें.
**फटन**–स्त्री. चीर.
**फटना**–क्रि. अ. फाटणें, दुभंगणें, पृथक होणें, वेगळें होणें, नासणें.
**(छाती) फटना**–अत्यंत दुःख होणें.
**(दिल) फटना**–विरक्ति होणें.
**फट पड़ना**–अचानक समोर येणें.
**फटफटाना**–क्रि. स. व्यर्थ बडबड करणें, हातपाय आपटणें, फटफट शब्द करणें, इकडे तिकडे टक्कर मारणें. [फाटका.
**फटा**–पु. भेग, फट. –वि. फाटलेला, जीर्ण,
**फटिक**–पु. स्फटिक, संगमरवरी दगड.
**फटेहाल**–वि. गरीब, दरिद्री. [केलेली काठी.
**फट्टा**–पु. भेग, चीर, फट, बांबू चिरून
**फड़**–पु. जुगारांत लावलेला डाव, जुगाराचा अड्डा, पक्ष, दल, दुकानाची खरेदी विक्रीची जागा.
**फड़क, फड़कन**–स्त्री. फुरफुरणें. [फुरफुरणें.
**फड़कना**–क्रि. अ. फडकणें, उडणें, स्फुरणें,
**(बोटीबोटी) फड़कना, (रगरग) फड़कना**–अत्यंत उत्सुक होणें, उतावळें होणें.
**फड़काना**–क्रि. स. फडकविणें, हलविणें.
**फड़फड़ाना**–क्रि. स. फडफडविणें, व्यर्थ बडबड करणें, हातपाय आपटणें.
**फड़बाज**–पु. जुगार खेळविणारा, दुसऱ्यांना जुगार खेळावयास लावणारा.
**फतवा**–पु. मुसलमानी धर्मशास्त्राप्रमाणें एकाद्या कृत्याबद्दल मौलवीनें दिलेला निर्णय, धर्माज्ञा.
**फत(ते)ह**–स्त्री. विजय, सफलता.
**फतहनामा**–पु. विजयपत्र.
**फतिंगा**–पु. पतंग (किडा).
**फ़तील सोज़**–पलिता, दीपमाळ.
**फ़तूर**–पु. विकार, बिघाड, नुकसान, बाधा,
**फ़तूरिया**–वि. उपद्रवी, विघ्नसंतोषी. [विघ्न.
**फ़तूह**–स्त्री. विजय, लढाई किंवा लूट

यांमध्यें मिळालेलें धन.
फ़तूही–स्त्री. बिन बाह्यांचा सदरा, लढाईंत किंवा लुटींत मिळालेलें धन.
फ़दफ़ना–क्रि. अ. फदफद आवाज करणें, टुण टुण उडया मारणें.
फ़न–पु. हुन्नर, हस्तकौशल्य, गुण, वैशिष्टय, विद्या.
फ़नकार–पु. फूत्कार.
फ़नगा–पु. पतंग (किडा).
फ़ना–स्त्री. नायनाट, निःपात. [वस्था.
फ़ना फी अल्लाह–पु. फकिराची ध्यानाफ़नि-नी, फ़निग-ब–पु. फणींद्र, नाग.
फ़नीस–पु. सर्पराज.
फ़नून–पु. 'फ़न' चें बहुवचन.
फ़नूस–पु. कंदील, झुंबर.
फ़न्नी–स्त्री. पाचर.
फ़फूँदी–स्त्री. बुरशी, नाडी (बंद).
फ़फोला–पु. फोड.
(दिलके) फफोले फोड़ना–राग काढणें.
फबकना–क्रि. अ. फुगणें, जाड होणें.
फबती–स्त्री. उपहास, समयानुकूलता, टोमणा, शोभा.
फबती उड़ाना–हंसें करणें, उपहास करणें.
फबती कहना–टोंचून बोलणें.
फबतीयाँ कसना–टोमणे मारणें.
फबना–क्रि. अ. शोभा देणें, खुलणें.
फबाना–क्रि. स. शोभिवंत करणें, सजविणें.
फबि–स्त्री. शोभा, सौंदर्य.
फबीला–वि. सुंदर, शोभायमान.
फर–पु. सामना, कुस्तींतील डावपेंच, युद्धक्षेत्र, सामन्याची जागा, बिछाना, पात (हत्याराची).
फ़र–पु. शोभा, चमक. [कमतरता.
फ़रक़–पु. अंतर, भिन्नता, भेद, परकेपणा, फ़रक़ होना–धांवपळ होणें, गोंधळ माजणें.
फ़रकन–स्त्री. स्फुरण. [पावणें.
फरकना–क्रि. अ. उचंबळून येणें, स्फुरण
फरका–पु. गवताचे छप्पर, बांबूच्या कामटयाची तट्टी.
फरकाना–क्रि. स. फडकविणें, हालविणें.
फ़रखा–वि. पवित्र, शुद्ध, ठाकठीक.
फ़रजंद, फ़र्ज़ंद–पु. चिरंजीव, पुत्र, संतान.
फ़रज़ी, फ़र्ज़ी–पु. वजीर.-वि. नकली, बनावटी.
फ़रज़ीन–पु. बुद्धिमान, बुद्धिबळांतील वजीर. [कडून शह देऊन केलेली मात.
फ़रज़ीनबंद–पु. बुद्धीबळामध्यें वजिराफ़रद–स्त्री. पाहा 'फ़र्द'. [दिवस.
फ़रदा–अ. उद्यां.–स्त्री. प्रलय कालचा
फरना–क्रि. अ. फळ येणें. [हावभाव.
फरफंद–पु. डावपेंच, फसवेगिरी, नखरा,
फरफुंदा–पु. पतंग (किडा).
फ़रबा–वि. लठ्ठ.
फ़रमा–पु. जोडा बनविण्याचा लांकडी सांचा, छापलेला फॉर्म.
फ़रमाइश–स्त्री. मागणी, हुकूम.
फ़रमाइशी–वि. सांगून तयार करविलेली किंवा मागविलेली वस्तु.
फ़रमाँबरदार–वि. आज्ञाधारक.
फ़रमान–पु. राजकीय आज्ञापत्र.
फ़रमाना–क्रि. स. आज्ञा देणें, हुकूम करणें,
फ़रमाखा–पु. शासक, राजा. [म्हणणें, सांगणें.
फ़रवरी–पु. फेब्रुवारी महिना.
फ़रवी–स्त्री. चुरमुरे, लाह्या.
फ़रश–पु. बैठक, बिछाइत, सपाट जमीन,
फ़रशबंद–पु. पाहा 'फ़रश'. [फरशी.
फ़रशी–स्त्री. गुडगुडी, हुक्का.
फ़रस–पु. फरशी, कुऱ्हाड, घोडा.

**फ़रसा**–पु. कुऱ्हाड, कुदळ.
**फ़रसूदा**–वि. फार जुना व निरुपयोगी, थकलेला, दुर्दशाग्रस्त.
**फ़रहंग**–स्त्री. बुद्धिमत्ता, शब्दकोश.
**फ़रह, फ़रहत**–स्त्री. आनंद. –वि. प्रसन्न.
**फर हरना**–क्रि. अ. फडफडणें, फडकणें.
**फरहरा**–पु. झेंडा, पताकाचें कापड, सुकत चाललेली जखम.–वि. शुद्ध, वेगवेगळे,
**फरहाँ**–वि. प्रसन्न. [प्रसन्न, विकसित.
**फ़रहाद**–पु. शिरीं नामक राजकन्येवर प्रेम करणारा इराणचा एक प्रसिद्ध शिल्पकार, शिल्पकार.
**फ़राख़**–वि. विस्तृत, लांबरुंद.
**फ़राख़ी**–स्त्री. लांबीरुंदी, विस्तार, संपन्नता.
**फ़रागत**–स्त्री. सुटका, बेफिकिरी, स्वस्थता, मलत्याग.
**फ़रामोश**–वि. विसरलेला, विस्तृत.
**फ़रामोश करना**–क्रि. स. विसरणें.
**फ़रार**–पु. पळ काढणें.–वि. पळालेला.
**फ़रारी**–वि. पळून जाणारा, पळालेला.
**फ़रासीस**–पु. फ्रांस देश, फ्रेंच माणूस.
**फ़रासीसी**–वि. फ्रांस देशाचा रहिवासी,
**फ़राहम**–अ. एकत्र. [फ्रेंच.
**फ़राहमी**–स्त्री. संग्रह.
**फ़रियाद**–स्त्री. फिर्याद, तक्रार, गाऱ्हाणें, मदतीकरितां हांक, विनंती, प्रार्थना.
**फ़रियादी**–वि. तक्रार करणारा, फिर्याद करणारा, मदतीकरितां प्रार्थना करणारा.
**फ़रियाना**–क्रि. स. निवडणें, नीट करणें (धान्य), निकाल करणें, निवाडा देणें. –क्रि. अ. ठरणें, वेगळें होणें.
**फ़रिश्ता**–पु. देवदूत. [नांगराचा फाळ.
**फ़री**–स्त्री. लहान ढाल, गाडीचा आंस,
**फ़रीक़**–पु. विवेकी, विचारी, समूह, झुंड, वादी किंवा प्रतिवादी पक्ष, प्रतिपक्षी,
**फ़रीक़सानी**–पु. प्रतिवादी. [विरोधी.
**फ़रुही**–स्त्री. चुरमुरे, लहान फावडें, रवी.
**फ़रेफ्ता**–वि. आसक्त, मोहित, फसणारा, फसवणूक झालेला. [धूर्तता.
**फ़रेब**–पु. कपट, लबाडी, फसवणूक,
**फ़रेबी**–वि. कपटी, अप्रामाणिक, लुच्चा.
**फ़रो**–अ. खालीं.–वि. नीच, शांत, ताब्यांत
**फ़रोख़्त**–स्त्री. विक्री. [आलेला.
**फ़रोग़**–पु. ज्योति, प्रकाश, आभा, कांति, उत्कर्ष, उन्नति. [टाळ, चूक, कमतरता.
**फ़रो गुज़ाश्त**–स्त्री. उपेक्षा, दुर्लक्ष, टाळा-
**फ़रोद**–अ. खालीं.–पु. मुक्काम.
**फ़रोश**–पु. विक्रेता, विक्री करणारा.
**फ़रोशी**–स्त्री. विक्री.
**फ़र्क़**–पु. फरक. [गृहीत, मानलेलें.
**फ़र्ज**–स्त्री. संधि, योनि. –पु. कर्तव्य. –वि.
**फ़र्ज करना**–क्रि. स. गृहात धरणें, कर्तव्य
**फ़र्ज़ंद**–पु. संतति, पुत्र. [करणें.
**फ़र्ज़ंदी**–स्त्री. पुत्रत्व. [करणें.
**फ़र्ज़ंदीमें लेना**–क्रि. स. दत्तक घेणें, जांवई
**फ़र्ज़ी**–वि. कल्पित, नाममात्र, बनावटी, नकली, सत्ताहीन.
**फ़र्द**–स्त्री. धोतर किंवा वस्त्राचें एक पान, पदर, कागद किंवा कपड्याचा तुकडा, सूची, कवितेंतील एक पद, एक व्यक्ति, एक प्रकारचा पक्षी.–वि. एकटा, एक.
**फ़र्राटा**–पु. वेग, चपलता.
**फ़र्रार**–वि. फार जलद पळणारा.
**फ़र्राश**–पु. तंबू ठोकणारा, बैठक साफ करणारा व घालणारा नोकर, नोकर.
**फ़र्राशख़ाना**–पु. फरासखाना, बड्या माण-

साथे तंबु इत्यादि सामान ठेवण्याची
**फ़रुख**–वि. सुंदर, शुभ. [जागा.
**फ़र्श**–पु. बिछाना, फरशी, चांदणें.
**फ़र्शी**–स्त्री. पाहा 'फ़रशी'. [नमस्कार.
**फ़र्शी सलाम**–जमिनीपर्यंत वाकून केलेला
**फलंक**–पु. उडी.
**फल**–पु. फळ, परिणाम, निकाल, गुण, प्रभाव, नांगराचा फाळ.
**फलक**–पु. फळा, चादर, पान, पृष्ठ,
**फ़लक**–पु. आकाश. [तळहात.
**फलकना**–क्रि. अ. फडफडणें, फडकणें.
**फलका**–पु. फोड.
**फलतः**–अ. यासाठीं, तात्पर्य. [निश्चय.
**फलदान**–पु. साखरपुडयाचा विधि, वाङ्-
**फलना**–क्रि. अ. सफल होणें, फळ येणें, फळफळणें. [वंशवृद्धी होणें, पुटकुळया येणें.
**फलना फूलना**–सुखी आणि संपन्न होणें,
**फलाँ, फलाना**–वि. फलाणा, अमका.
**फलाँगना**–क्रि. अ. उडी मारणें.
**फलाकत**–स्त्री. गरीबी, कष्ट.
**फ़लातूँ**–पु. ग्रीक तत्त्ववेत्ता प्लेटो.
**फलाली(ले)न**–पु. लोंकरीचें कापड, फ्लॅनेल.
**फलासिफ़ा**–पु. फिलासफी, विज्ञान, दर्शनशास्त्र. [उत्तमता.
**फ़लाह**–स्त्री. सफलता, सुख, परोपकार,
**फ़लाहत**–स्त्री. शेतकी, शेतीवाडी.
**फलाहार**–पु. फराळ, फळें खाणें.
**फलित**–वि. संपन्न, परिपूर्ण, पिकलेला.
**फली**–स्त्री. शेंग.
**फलीता**–पु. पलिता, दिवा.
**फलेंदा**–पु. एक प्रकारचें जांभूळ. [णारा.
**फसकड़ा**–पु. मांडी.–वि. लवकर फिसकट-
**फसकना**–क्रि.अ. घसरणें, फिसकटणें, फुटणें.
**फसड्डी, फिसड्डी**–वि. हलका, मागा-
**फ़सल**–स्त्री. ऋतु, हंगाम, पीक. [सलेला.
**फ़सली**–वि. हंगामी. –पु. अकबरानें सुरू केलेली कालगणना, मुल्की, महामारी, वर्षमान. [एक शक.
**फ़सलीसन**–पु. अकबरानें सुरू केलेला
**फ़साद**–पु. बिघाड, दंगा, बखेडा, उपद्रव,
**फ़सादी**–वि. उपद्रवी, भांडखोर. [बंड.
**फ़साना**–पु. कल्पित गोष्ट, विवरण.
**फ़साहत**–स्त्री. विषयाचें सुंदर वर्णन, वक्तृत्वशक्ति.
**फ़सील**–स्त्री. शहरा भोंवतालचा कोट.
**फ़सीह**–वि. वक्तृत्वशक्ति असलेला, चांगला
**फ़सूँ**–पु. जादूटोणा, मंत्र. [वक्ता.
**फ़सूँगर**–वि. मांत्रिक.
**फ़स्द**–स्त्री. दूषित रक्त काढून टाकण्यासाठीं रक्त वाहिनी कापण्याची क्रिया.
**फ़स्ल**–स्त्री. ऋतु, समय, पीक, ग्रंथाचा अध्याय किंवा प्रकरण, वेगळेपणा, दोन वस्तूंतील अंतर दाखविणारी गोष्ट, कपट.
**फ़स्ली**–वि. पिकासंबंधीं.–पु. महामारी रोग.
**फ़स्साद**–पु. शीर तोडणारा (दूषित रक्त
**फ़हमाइश**–स्त्री. सूचना. [काढण्याकरितां).
**फ़हम**–स्त्री. ग्रहणशक्ति, बुद्धि, समजूत.
**फ़हमीद**–स्त्री. समज, अक्कल.
**फहरना**–क्रि. अ. फडकणें, फडफडणें.
**फहराना**–फडकविणें.
**फ़हरिस्त**–स्त्री. सूचि.
**फ़हश**–वि. अश्लील.
**फ़हीम**–वि. समजूतदार.
**फाँक**–स्त्री. फाक, फोड, तुकडा.
**फाँकना**–क्रि. स. फांकणें, फक्की मारून
**(धूल) फाँकना**–विपत्ति भोगणें. [खाणें.

**फांद**–पु. फांस, जाळें, हत्ती धरण्याचें जाळें.–स्त्री. उडी.

**फांदना**–क्रि. स. जाळ्यांत अडकविणें, उडी मारून ओलांडणें.–क्रि. अ. उडी मारणें.

**फांद पड़ना**–एकदम उडी मारणें, सहसा कामांत पडणें. [ फसविणें.

**फांद मारना**–जाळें पसरविणें, दगा देणें,

**फांफी**-स्त्री. पापुद्रा, साय, डोळ्याचा एक रोग.

**फांस**–स्त्री. पाश, बंधन, जाळें, कुसळ, धनुष्यासारखी वाकविलेली बांबूची पातळ कामटी.

**फांस चुभना**–कष्ट होणें, कुसळ बोंचणें.

**फांसना**–क्रि. स. जाळ्यांत अडकविणें, फशीं पाडणें, फसवून आपली हुकमत चालविणें. [ दूर करणें.

**फांस निकाल देना**–कांटा काढणें, दुःख

**फांस रखना**–कैदेंत ठेवणें, आसक्त करणें.

**फांस लाना**–पकडून आणणें, फसवून पकडून आणणें, फसवून बरोबर आणणें.

**फांसी**–स्त्री. फांशी, जाळें, फांस.

**फांसी चढ़ना**–फांशीं जाणें.

**फ़ाक़ा**–पु. उपास.

**फ़ाक़ाकश**–वि. निर्धन, उपासमार होत असलेला. [ बेपर्वा असणारा, मस्त.

**फ़ाक़ामस्त**–वि. उपाशी असून देखील

**फ़ाख़्ता-ता**–स्त्री. पारवा, होला.

**फाग**–पु. होळीचा सण, शिमगा.

**फाग(गु)न**–पु. फाल्गुन महिना.

**फ़ाज़िल**–वि. विद्वान, पंडित, जरुरीपेक्षां

**फाट**–पु. भाग, हिस्सा, रुंदी. [अधिक, फाजील.

**फाटक**–पु. वेस, कोंडवाडा, भुसा.

**फाटका**–पु. सट्टा.

**फाड़ना**–क्रि. स. फाडणें, कापणें, नासविणें.

**फ़ातिहा**–पु. मुसलमानांची प्रार्थना, मृत माणसाचे नांवानें दिलेलें दान.

**फ़ानी**–वि. नाश पावणारा, नश्वर.

**फ़ानूस**–पु. कंदील, झुंबर.

**फाब**–स्त्री. शोभा.

**फाबना**–क्रि. अ. शोभणें, सुंदर दिसणें.

**फ़ाम**–पु. वर्ण, रंग.

**फ़ायदेमंद**–वि. फायदेशीर, लाभदायक.

**फ़ायल**–वि. काम करणारा.–पु. व्याकरणांतील कर्ता.

**फ़ाया**–पु. पाहा 'फाहा'. [रणांतील कर्ता.

**फ़ारख़ती**–स्त्री. कर्जमुक्त झाल्याबद्दलची पावती.

**फ़ारस**–पु. इराण देश. [ पावती.

**फ़ारसी**–स्त्री. इराण देशची भाषा.–वि. इराण देशचा. [ मुक्त, स्वतंत्र.

**फ़ारिग़**–वि. काम करून मोकळा झालेला,

**फ़ारिग़ुलबाल**–वि. सुखी व निश्चिंत.

**फ़ारूक़**–वि. विवेकी, दुसरे खलिफा हज़रत उमर यांची पदवी.

**फ़ाल**–स्त्री. शकुनविद्या, ज्योतिष.

**फाल**–पु. नांगराचा फाळ, शंकर, बळराम, महाळुंग, भाग, नांगरलेलें शेत, कापसाचें वस्त्र, उडी.–स्त्री. कातरलेली सुपारी,

**फालबांधना**–उडी मारणें. [ ढलपा.

**फ़ालतू**–वि. निरर्थक, जरुरीपेक्षां अधिक.

**फ़ालसई**–वि. निळसर तांबड्या रंगाचा.

**फ़ालसा**–पु. पिंपरीच्या फळासारखें आंबट

**फ़ालिज**–पु. पक्षघात, अर्धांग वायु. [ फळ.

**फ़ालीज़**–स्त्री. शेत, उपवन.

**फ़ालूदा**–पु. शेवयाची खीर, एक पेय.

**फावड़ा**–पु. फावडें.

**फ़ाश**–वि. स्पष्ट, उघड झालेला.

**फ़ासला**–पु. अंतर, लांबी. [ पाजी.

**फ़ासिद**–वि. भांडखोर, चिडलेला, दुष्ट,

फ़ासिल–वि. विभक्त करणारा.
फ़ासिला–पु. पाहा 'फासला'. [दिचा बोळा.
फाहा–पु. औषध, अत्तर किंवा तेल इत्या-
फ़ाहिश–वि. दुराचारी, शिव्या देणारा, लज्जाजनक. [आचरणाची स्त्री.
फ़ाहिशा–स्त्री. छिनाल, कुलटा, वाईट
फ़िकरा–पु. वाक्य, व्यंग, व्याजोक्ति, थाप.
फ़िकरेबाज़–वि. थापेबाज, व्यंग बोलणारा.
फिकैत–पु. फरीगदगा खेळणारा.
फ़िक्का–स्त्री. कुराण.
फ़िक्र–स्त्री. काळजी, लक्ष, उपाय. [लेला.
फ़िक्रमंद–वि. चिंताग्रस्त, काळजींत अस-
फ़िगार–वि. जखमी.
फिचकुर–पु. मूर्च्छा आली असतां तोंडांतून येणारा फेस.
फिट–अ. छि: धिक. [धिक्कार.
फिटकार–स्त्री. तिरस्कार, शिव्याशाप,
फिटकिरी–स्त्री. तुरटी.
फिटन–स्त्री. व्हिक्टोरिया, चार चाकांची
फिट्टा–वि.अपमानित,तिरस्कृत.[खुली गाडी.
फ़ितना–पु. तंटा, दंगा, पाप, अत्तर. –वि. दुष्ट, उपद्रवी.
फ़ितर–पु. दिवसभर उपवास करून संध्याकाळीं उपवास सोडणें. [बुद्धिमत्ता.
फ़ितरत–स्त्री. प्रकृति, स्वभाव, हुशारी,
फ़ितरती–वि. प्राकृतिक, धूर्त, स्वाभाविक.
फ़ितूर–पु. पाहा 'फतूर'.[–पु. सेवक, दास.
फ़िदवी–वि. स्वामीभक्त, आज्ञाधारक.
फ़िदा–वि. आसक्त, अनुरक्त, एखाद्यासाठीं प्राण देण्यास तयार असलेला.
फ़िदाई–पु. आसक्त झालेला माणूस.
फिनिया–स्त्री. कानांतील दागिना.
फ़िन्नार–अ. नरकाच्या अग्नींत.
फिरंग–पु. युरोपांतील एक देश,गरमी(रोग).
फिरंगी–वि. युरोपियन,युरोपमध्यें रहाणारा, युरोप खंडाचा.–स्त्री. विलायती तलवार.
फिरंट–वि. फितुर झालेला, उलटलेला.
फिर–अ. पुन्हां, पुढें केव्हांतरी, त्यावेळीं.
फिर फिर–वारंवार, फिरून फिरून.
फिर भी–तरीहि, तरीदेखील.
फिर क्या है–मग काय पाहिजे.
फ़िरका–पु. जात, टोळी, पंथ, संप्रदाय.
फिरकी–स्त्री. भिंगरी, फिरकी. [विलेला.
फिरता–पु. अस्वीकार. –वि. परत पाठ-
फिरदौस–पु. बाग, स्वर्ग.
फिरना–क्रि. अ. हिंडणें, फिरावयास जाणें, परतणें, वळणें, विपरीत होणें, फिरणें, वांकडे होणें, लिंपणें.
(जी) फिरना–विरक्त होणें. [होणें.
(सिर) फिरना–डोकें फिरणें, मतिभ्रष्ट
फिरनी–स्त्री. तांदुळाची खीर.
फिरवाना–क्रि. स. फिरविण्याचें काम दुसऱ्याकडून करविणें.
फ़िराक़–पु. वियोग, चिंता, काळजी, शोध.
फ़िराग़–पु. मुक्ति, सुटका, सवड, फुरसत, आनंद, खुशी, संतोष, अधिकता.
फिराना–क्रि. स. फिरविणें, चालविणें, परतविणें, वळविणें.
फ़िरासत–स्त्री. बुद्धिमत्ता, बुद्धीची तीव्रता.
फ़िरिश्ता-फ़िरिस्ता–पु. देवदूत.
फ़िलफिल–स्त्री. मिरें.
फ़िलफौर–अ. तत्काळ. [वस्तुत:
फ़िलवाक़ा, फ़िल हक़ीक़त–अ. खरोखर,
फ़िल जुमला–अ. तात्पर्य, थोडक्यांत,
फ़िल हाल–अ. यावेळीं, सध्यां. [असेंच.
फ़िल्ली–स्त्री. पिंढरी, पोटरी.

**फिस**–वि. ओंफस.
**(टायँ टायँ) फिस**–ओंफस. [णारा.
**फिसड्डी**–वि. कामांत नेहमीं मागें पड-
**फिसलन**–स्त्री. घसरडें, घसरण्याची क्रिया.
**फिसलना**–क्रि. अ. घसरणें, प्रवृत्त होणें,
**फिसाना**–पु. गोष्ट. [वळणें.
**फिहरिस्त**–स्त्री. सूचि, यादी.
**फींचना**–क्रि. स. चुबकणें.
**फ़ी**–अ. प्रत्येक, दरेक, फी. [निस्तेज.
**फ़ीका**–वि. नीरस, बेचव, फिक्कट, मळलेला,
**फ़ीता**–पु. कपड्याची पट्टी, फीत.
**फ़ीरनी**–स्त्री. एक प्रकारची खीर.
**फ़ीरोज़ा**–पु. नीलमणी.
**फ़ीरोज़ी**–वि. हिरवी झांक असलेला,
**फील**–पु. हत्ती. [निळा, निळसर, हिरवा.
**फ़ीलखाना**–पु. हत्तीशाळा.
**फ़ीलपा**–पु. हत्तीरोग.
**फ़ीलपाया**–पु. खांब, स्तंभ.
**फ़ीलवान**–पु. माहूत. [मोहरा.
**फ़ीला**–पु. पांढरा हत्ती, बुद्धिबळांतील एक
**फीली**–स्त्री. पिंढरी, पोटरी.
**फ़ीस**–स्त्री. फी, कर, महेनताना.
**फ़ी सदी**–अ. दरशेंकडा. [जळणें, नष्ट होणें.
**फुंकना, फुकना**–क्रि. अ. फुंकलें जाणें,
**फुँकनी**–स्त्री. फुंकणी, लोहाराचा भाता.
**फुँकरना**–क्रि. अ. फू फू करणें, फूत्कार
**फुँकवाना, फुँकाना**–क्रि.स.फुंकविणें.[सोडणें.
**फुँदना**–पु. गोंडा.
**फुँदिया**–स्त्री. गोंडा.
**फुंबी**–स्त्री. गांठ, तिलक.
**फुंसी**–स्त्री. पुटकुळी, लहानसा फोड.
**फुकन**–पु. फुगा. [तून बाहेर निघालेले तंतू.
**फुचड़ा**–पु. कपड्याच्या बनविलेल्या वस्तूं-
**फुज़ला**–पु.'फाजिल'चें अ. वचन, शिल्लक,
उष्टें, शरीरांतून निघणारा मळ, मळ.
**फुज़ूल**–वि. पाहा 'फ़ज़ूल' [माप.
**फुट**–वि. एकटा, वेगळा.–पु. बारा इंचांचें
**फुटकर**–वि. एकटा, वेगळा, थोडा थोडा,
**फुटका**–पु. फोड. [फुटकळ, किरकोळ.
**फुटकी**–स्त्री. एकाद्या वस्तूचे घट्ट झालेले
कण, रक्त, पू वगैरेचा डाग.
**फुटेल, फुट्टेल**–वि. एकटा, जोडी नसलेला,
**फुटेहरा**–पु. फुटाणा. [भाग्यहीन.
**फुतूर**–पु. पाहा 'फ़तूर'.
**फुतूह**–स्त्री. पाहा 'फ़तूह'. [बागडणें.
**फुदकना**–क्रि. अ. उडी मारणें, नाचणें,
**फुदकी**–स्त्री. लहान चिमणी.
**फुनगी**–स्त्री. अंकुर, कोंब.
**फुनून**–पु. 'फन'चें अ. वचन.
**फुफंदी**–स्त्री. विजार किंवा परकराची
**फुफकाना**–क्रि. अ. फूत्कार टाकणें. [नाडी.
**फुफकार**–पु. फूत्कार.
**फुफू**–स्त्री. आत्या.
**फुफेरा**–वि. आते (भाऊ, बहीण इ.).
**फुर**–वि. सत्य, खरें.–स्त्री. फडफड.
**फु़रकत**–स्त्री. वियोग.
**फुरती**–स्त्री. जलदपणा, शीघ्रता.
**फुरतीला**–वि. चपळ, चलाख.
**फुरना**–क्रि. अ. निघणें, प्रकाशित होणें,
फडकणें, उच्चार होणें, खरें ठरणें,
प्रभाव उत्पन्न करणें. [होणें.
**फुरफुरना**–क्रि. अ. फुर फुर असा आवाज
**फुरफुरी**–स्त्री. फडफड आवाज करणें,
कानांत कापसाचा फाया फिरवणें.[होणें.
**फुर हरना**–क्रि. अ. स्फुरण पावणें, उत्पन्न
**फुरहरी, फुरेरी**–स्त्री. कांपरे, कंप, रोमांच,

फडफड, अत्तराचा किंवा औषधाचा बोळा, फाया. [सुटका.
**फुरसत**—स्त्री. समय, सुट्टी, रोगापासून
**फुरी**—क्रि. सुचली, लक्षांत आली, उत्पन्न झाली. [लहान कढई.
**फुलका**—पु. फोड, लहान पातळ चपाती,
**फुलझड़ी**—स्त्री. फुलबाजी, फुसकली.
**फुलवर**—पु. रेशमी वेलबुट्टीदार कापड.
**फुलवाई**—स्त्री. बागबगीचा, उद्यान, कागदाची बाग (वरातीचे वेळीं).
**फुलवार**—वि. प्रसन्न, प्रफुल्लित.
**फुलवारी**—स्त्री. पाहा 'फुलवाई'
**फुलहारा**—पु. माळी. [फुलांनीं सजविणें.
**फुलाना**—क्रि. स. फुगविणें, आनंदित करणें,
**(मुँह) फुलाना**—रुसणें, तोंड फुगविणें.
**फुलायल**—पु. अत्तर, सुगंधित तेल.
**फुलाव**—पु. सूज.
**फुलिंग**—पु. ठिणगी, स्फुल्लिंग.
**फुलिया**—स्त्री. चमकी, खिळा, चूक.
**फुलेल**—पु. सुगंधी तेल, फुलेल.
**फुलेहरा**—पु. रेशमी किंवा सुती तोरण.
**फुलौरी**—स्त्री. भजें, बोंड, बेसनवडी.
**फुल्ली**—स्त्री. सारा, फूल, चमकी, फुलासारखा एक दागिना. [हासरा.—पु. फूल.
**फुल्ल**—वि. विकसित, फुललेला, आनंदी,
**फुवार**—स्त्री. पावसाची झिम झिम, थेंब.
**फुसफुसा**—वि. भुसभुशीत, ठिसूळ, पोंचट.
**फुस फुसाना**—क्रि. स. हलक्या किंवा दबलेल्या आवाजांत बोलणें.
**फुसलाना**—क्रि. स. फूस लावणें, भुरळ
**फुहश**—वि. अश्लील. [पाडणें, बहकावणें.
**फुहार, फुही**—स्त्री. पावसाची झिम झिम, थेंब.
**फुहारा, फौआरा**—पु. कारंजें, फवारा.
**फूँक निकल जाना**—प्राण निघून जाणें, मरणें.
**(झाड़) फूँक**—मंत्रतंत्राचा उपचार. [होणें.
**फूँक सरकना**—जोर मंदावणें, घाबरगुंडी
**फूँक फूँक कर पैर रखना या चलना**—अत्यंत सावधगिरीनें एकादें काम करणें.
**फूँकना**—क्रि. स. फुंकणें, फुंकर मारणें तोंडानें वाजविणें (वाद्य), आग प्रज्वलित करणें, उधळपट्टी करणें, मंत्र घालणें.
**फूँका**—पु. दूध काढण्यासाठीं गाईच्या जननेंद्रियास घालावयाची फुंकणी, फोड.
**फूँटा**—पु. गोंडा, नाडी. [मोठी काकडी.
**फूट**—स्त्री. मतभेद, विरोध, भिन्नत्व, एक
**फूटना**—क्रि. अ. फुटणें, अलग होणें, तुटणें, अंकुर व शाखा फुटणें, फुटून निघणें, उमलणें, विकसणें, तोंडांतून शब्द बाहेर निघणें, सांधे दुखणें.
**फूट फूट कर रोना**—ओक्साबोक्शी रडणें.
**फूफा**—पु. आतेचा नवरा.
**फूफी**—स्त्री. आत्या.
**फूल खिलना**—फूल उमलणें, लग्न ठरणें.
**फूल**—पु. पुष्प, फूल. —स्त्री. आनंद, उत्साह.
**फूल जाना**—नाखुष होणें, लठ्ठ होणें, फुगणें.
**(मुँहसे) फूल झड़ना**—मधुर वाणीनें बोलणें.
**फूल पड़ना**— विस्तवाची ठिणगी पडणें, पांढरे डाग पडणें. [जेवल्याशिवाय राहणें.
**फूल सूँघकर रहना**—फार थोडें जेवणें,
**फूलगोभी**—स्त्री. फूल कोबी.
**फूल बैठना**—रुसून बसणें, रागावणें.
**फूलदान**—पु. फूलदाणी.
**फूलना**—क्रि. अ. फुलणें, विकसणें, गर्वानें फुगणें, सुजणें, लठ्ठ, स्थूल होणें, आनंदित होणें, रुसणें, रागावणें.
**फूलना फलना**—सुख संपन्न होणें, प्रगति होणें.

(शुभचिंतन), उल्हासित होणें.
**फूला फूला फिरना**–अत्यंत हर्षित होणें.
**फूले अंग न समाना**–आनंद गगनांत न मावणें.
**फूली**–स्त्री. मोतीबिंदु, डोळ्यांतील फूल.
**फूलोंमें तुलना**–फार कोमलांग होणें.
**फूस**–पु. वाळलेलें गवत, फार म्हातारा
**फूहड़**–वि. मूर्ख, अडाणी, बेढब. [मनुष्य.
**फूहड़पन**–पु. अडाणीपणा, मूर्खपणा.
**फूही**–स्त्री. पाहा 'फुहार'.
**फेंकना**–क्रि. स. फेंकणें, टाकणें, विसरणें, अव्यवस्थित खर्च करणें.
**फेंकरना**–क्रि. अ. ओकसा बोकशीं रडणें.
**फेंट**–स्त्री. कंबरेचा घेर, धोतराचा कंबरे-भोंवतीं गुंडाळलेला सोगा, लहान पागोटें.
**फेंट कसना अथवा बांधना**–कंबर बांधणें.
**फेंटना**–क्रि. स. फेंसणें, घोटणें, पिसणें (पत्ते). [पट्टा, कमरेचें वर्तुळ.
**फेंटा**–पु. लहान पागोटें, फेटा, कमर-
**फसफण**–पु. फेस, समुद्र फेस.–स्त्री. शिके-
**फेनी**–स्त्री. फेणी. [काई, गुळाचा राव.
**फेफड़ा**–पु. फुप्फुस. [णारा पापुद्रा.
**फेफड़ी, फेंफरी**–स्त्री. ओंठ सुकल्यामुळें जम-
**फेर**–पु. फेरा, परिवर्तन, गोंधळ, बुचकळा, संशय, अंतर, फरक, भानगड, हानि, भुताचा प्रभाव.–अ. पुन्हां, कडे.
**(दिनोंका) फेर**–भाग्यपरिवर्तन.
**(हेर) फेर**–देवघेव, परिवर्तन.
**फेरमें पड़ना**–घोटाळ्यांत पडणें.
**फेर रचना**–भटकणें.
**फेर देना**–परतविणें. [लोभ.
**(निन्यानवेका) फेर**–पैसे जमविण्याचा
**फेर बांधना या लगाना**–देण्याघेण्याची
**फेरमें पड़ना**-संशयांत पडणें. [पद्धति ठरविणें.

**फेरना**–क्रि. स. फिरविणें, परत करणें, परत घेणें, वांकविणें, पिळणें, लिंपणें,
**(पानी) फेरना**–नष्ट करणें. [प्रचार करणें.
**फेरफार**–पु. परिवर्तन, अंतर.
**फेरवट**–स्त्री. चक्कर, पेंच. [परतून येणें.
**फेरा**–पु. चक्कर, फेरा, वारंवार येणें जाणें,
**फेरि**–अ. पुन्हां, फिरवून. [णांत क्रिया.
**फेल**–पु. कार्य, कर्म, दुष्कर्म, संभोग, व्याकर-
**फेल जामिनी**–स्त्री. चांगल्या वर्तणुकीचा
**फेलन्**–अ. कार्यरूपांत. [जामीन.
**फेली**–वि. धूर्त, चलाख, दुराचारी.
**फेहरिश्त**–स्त्री. सूची.
**फ़ैज़**–पु. परोपकार, लाभ, कृपा, दया.
**फ़ैयाज़**–वि. दाता, उदार, थोर, कृपाळु.
**फ़ैयाज़ी**–स्त्री. उदारपणा, श्रेष्ठत्व.
**फैर**–स्त्री. बंदुकीचा बार.
**फैरना**–क्रि. स. बंदुकीचा बार करणें.
**फैलना**–क्रि. अ. पसरणें, स्थूल होणें, वाढणें, विखुरणें, मशहूर होणें, प्रसिद्धि पावणें, आग्रह धरणें, संख्या वाढणें.
**फैलसूफ़**–पु. विद्वान, धूर्त, लबाड, उधळ्या.
**फैलसूफ़ी**–स्त्री. उधळेपणा, चलाखी.
**फैलाना**–क्रि. स. पसरणें, विस्तृत करणें, वाढविणें, विखुरणें, प्रचलित करणें, प्रसिद्धि करणें.
**(हाथ) फैलाना**–हात पसरणें (भिक्षेसाठीं).
**फैलाव**–पु. विस्तार.
**फैसला**–पु. निर्णय, निकाल.
**फोंक**–पु. बाणाच्या मागची बाजू (ज्यांत पंख लावतात.) [चोथा.
**फोक**–पु. गाळ, नीरस व बेचव पदार्थ,
**फोकट**–वि. फुकट, निःसार, व्यर्थ.
**फोकटमें**–फुकटांत.

**फोकला**–पु. साल, सालपट.
**फोड़ (र) ना**–क्रि. स. फोडणें, तोडणें, फूट पाडणें, तोडणें, दुसऱ्या पक्षांतून आपल्या पक्षांत आणणें.
**फोड़ा**–पु. फोड, व्रण.
**फोड़िया**–स्त्री. लहान फोड.
**फ़ोता**–पु. पिशवी, थैली, अंडकोष, सारा.
**फ़ोतेदार**–पु. खजीनदार, कोशाध्यक्ष.
**फोश**–वि. अश्लील.
**फ़ौक़**–वि. उच्च, श्रेष्ठ.–पु. श्रेष्ठता, उच्चता, मोठेपणा, उंची.
**फ़ौक़ियत**–स्त्री. श्रेष्ठता, मोठेपणा.
**फ़ौज**–स्त्री. सैन्य, झुंड.
**फ़ौजकशी**–स्त्री. सेनेचें आक्रमण, चढाई.
**फ़ौजदार**–पु. सेनापति, फौजदार, अंमलदार.
**फौजदारी**–स्त्री. भांडण, मारामारी, फौजदारी कोर्ट.
**फ़ौजी**–वि. फौजेसंबंधीं, सैनिक.
**फ़ौत**–स्त्री. नाश, मृत्यु.–वि. मृत, मेलेला.
**फ़ौती**–स्त्री. मृत्यु.–वि. मृत.
**फ़ौरन**–अ. झटपट, ताबडतोब.
**फ़ौलाद**–पु. पोलाद.
**फ़ौलादी**–वि. पोलादपासून बनलेलें. –स्त्री. भाल्याचें लाकूड.
**फ़रान्सीसी**–वि. फ्रान्सचा.

## [ ब ]

**बंक**–वि. वांकडा, तिरपा, वक्र, पुरुषार्थी, कठिण.–पु. बँक.
**बंकट**–वि. वांकडातिकडा.
**बंकाई, बंकुरता**–स्त्री. वक्रता, वांकडेपणा.
**बंकनाल**–स्त्री. सोनाराची नळी.
**बंका**–वि. तिरपा, वक्र, पुरुषार्थी.
**बँगला**–वि. बंगालचा, बंगालसंबंधीं. –पु. बंगाल देश, बंगला.–स्त्री. बंगाली भाषा.
**बंगली**–स्त्री. बांगडी, छोटा बंगला.
**बंगा**–वि. मूर्ख, उद्धट, वांकडा. –पु. बंगाल.
**बंचना**–क्रि. स. ठकविणें, वाचणें. –स्त्री. फसवणूक, कपट, भ्रम, अडथळा.
**बंचक**–पु. धूर्त, ठग.
**बंचकता, बंचकताई**–स्त्री. धूर्तता.
**बंचना, बंचना**–क्रि. स. फसविणें, ठकविणें. –स्त्री. फसवणूक, कपट, अडथळा.
**बंचाना, बंचावना, बंचवाना**–क्रि. स. वांचवून घेणें.
**बंछना**–क्रि. स. अभिलाषा धरणें, इच्छा करणें.
**बंज**–पु. व्यापार, एक वृक्ष.
**बंजर**–वि. ओसाड, नापीक. –पु. माळरान.
**बंजारा**–पु. वंजारी, लमाणी.
**बंझा**–स्त्री. वंध्या, वांझ.
**बँटना**–क्रि. अ. विभागलें जाणें, हिस्से पडणें, वांटणी होणें.
**बँटवाना**–क्रि. स. दुसऱ्याकडून वांटणी करविणें.
**बँटवारा**–पु. बटवडा, वांटणी, वांटप.
**बंटा**–पु. वाटोळा किंवा चौकोनी डबा.
**बँटाई**–स्त्री. वांटणी, विभागणी, बटवडा, बटाई.
**बंटा ढार करना**–क्रि. स. नाश करणें.
**बंडा**–पु. अळूची मुळी.
**बँडेरी**–स्त्री. आढें (कौलाराचें).
**बंद**–पु. बांध, सांधा, नाडी, कागदाची पट्टी, कैद. –वि. बंद, कुलुप लावलेला, थांबलेला.
**बंद करना**–कोंडणें.
**बंदगी**–स्त्री. प्रणाम, सेवा, भक्तिपूर्वक ईश्वराची वंदना.
**बंदगोभी**–स्त्री. कोबी.
**बंदनवार**–पु तोरण.
**बंदना**–क्रि. स. नमस्कार करणें. –स्त्री. वंदन, स्तुति.
**बंदर**–पु. माकड, वानर, बंदर.
**बंदर भबकी, बंदर घुड़की**–पोकळ धमकी.
**बंदरगाह**–पु. जहाजें नांगरावयाचें समुद्रकांठचें स्थळ.

**बंदवान**–पु. जेलर, तुरुंगाचा ऊपरी.
**बंदा**–पु. सेवक, दास, कैदी.
**बंदारु**–वि. वंदनीय, पूजनीय.
**बंदिया**–स्त्री. बिंदी. [दोषारोप.
**बंदिश**–स्त्री. गांठ, उपाय, व्यवस्था, षडयंत्र,
**बंदी**–पु. चिना, शिडी, भाट, चारण, कैदी. –स्त्री. एक आभूषण.
**बंदीगृह, बंदीखाना, बंदीघर**–पु. कैदखाना.
**बंदीछोर**–पु. बंधमुक्त करणारा.
**बंदुकची**–पु. बंदुकवाला शिपाई.
**बंदोबस्त**–पु. व्यवस्था.
**बंद्य, वंद्य**–वि. मानार्ह, पूज्य, स्तुत्य.
**बंध**–पु. बांधण्याचे साधन (बेडी, दोरी, सुतळी इ.) व्यवस्था, बंधन, गाठ, कैद, बांध, निबंध रचना, बंद, शरीर, लावणें (मन), संबंध, जोड, व्रणाची पट्टी, ऐक्य, संसारपाश, परिणाम, अंगस्थिति, स्नायु, ठेव, गहाण, धरण, वृत्तांतील शब्द रचना विशेष, गृहादिवेष्टन सूत्र.
**बंधक**–पु. गहाण, ठेव, बांधणारा, दोरी, बांध, धरण, अदलाबदल, बलात्कार करणारा, शहर, पवित्र, आसन.
**बंधकी**-स्त्री. व्यभिचारिणी, वेश्या, वांझ स्त्री, हत्तीण, पांच पुरुषानीं भोगलेली स्त्री.
**बंधना**–क्रि. अ. बांधलें जाणें, कैद होणें, शब्दानें किंवा वचनानें बांधलें जाणें, क्रमबद्ध होणें, चालू होणें, दुरुस्त होणें, प्रेमपाशांत सांपडणें.
**बंधनि**–स्त्री. बंधन, बांधण्याचें साधन.
**बंधवाना**–क्रि. स. बांधवून घेणें.
**बंधान**–पु. देवघेवीचा व्यवहार, परिपाठ, बंधारा, सम (तालांत).
**बंधाना**–क्रि. स. धारण करविणें, बांधविणें.
**बंधी**–पु. बंदी. –स्त्री. उकाडा, रतीब, बंधी.
**बंधु**–वि. नियमन करणारा. –पु. भाऊ, मदतनीस, मित्र, एक वर्णवृत्त, एक फूल, नातलग, गोत्रज, भाऊबंद, सगोत्रा नंतरचा वारस (आतेभाऊ, मावसभाऊ, मामेभाऊ या पैकीं प्रत्येक), जीवलग माणूस (नवरा, बायको, आई, बाप इ.), बंधनस्थान.
**बंधुआ**–पु. कैदी, बंदी.
**बंधुक**–पु. दुपारीचें फूल, दुपारी, असणा.
**बंधुर**–वि. उंचसखल, नम्र, वांकलेलें, सुंदर, बहिरा, दुष्ट. –पु. हंस, बगळा, पेंड, बंधन, दोरी, मुगुट, दुपारी, वावडिंग.
**बंधेज**–पु. रतीब, प्रतिबंध, आळा.
**बंध्या**–वि. बंध्या, वांझ. [संडास.
**बंपुलिस**–स्त्री. नगरपालिकेचे सार्वजनिक
**बंब**–स्त्री. रणभेरी, रणनाद, नगारा, डंका.
**बंब बजाना**–युद्धाचें आव्हान देणें.
**बंबा**–पु. नळ, प्रवाह. [हंबरणें.
**बंबाना**–क्रि. अ. जनावरांचें ओरडणें,
**बंस**–पु. बांबू, नाकाच्या वरचें हाड, मुरली, बाहूंतील लांब हाडें, पाठीचें हाड.
**बंसकार**–पु. मुरली. [ण्याचा गळ.
**बंसी**–स्त्री. बासरी, मुरली, मासे धर-
**बंसीधर**–पु. श्रीकृष्ण. [वगैरे बनविणारा.
**बंसोर**–पु. बांबूच्या कामट्यांच्या टोपल्या
**बेंहगी**–स्त्री. कावड.
**बऊर**–पु. आंब्याचा मोहोर.
**बऊरा**–वि. बावरलेला, गोंधळलेला.
**बऊराना, बौराना**–क्रि. अ. बावरणें, गोंधळणें.
**बक**–पु. बगळा, अगस्ति (झाड), कुबेर, बकासुर. –वि. पांढरा शुभ्र.. –स्त्री. [प्रलाप.
**बकचा**–पु. गांठोडें.

**बकची**–स्त्री. लहान गांठोडें, एक रोपटें.
**बकतर, बख्तर**–पु. चिलखत.
**बकता, बक्ता**–वि. वक्ता, भाषण करणारा.
**बकना**–क्रि. स. बडबड करणें, उगीचच [जास्त बोलणें.
**बकबक**–स्त्री. बडबड.
**बकमौन**–पु. बकध्यान.–वि. कावेबाज.
**बकर**–पु. गाय. बैल.
**बकरईद**–स्त्री. बकरी ईद.
**बकर बकर**– अ. टकमक, आश्चर्यचकित.
**बकर कसाब**–पु. बकऱ्याचे मांस विकणारा खाटिक. [सांगणें.
**बकरना**–क्रि. स. पुटपुटणें, स्वतः दोष
**बकरा**–पु. बोकड.
**बकलस**–पु. बक्कल.
**बकला**–पु. वृक्षाची साल, फळाचें टरफल.
**बकवाद**–स्त्री. बडबड, वटवट.
**बकवादी**–वि. बडबड्या.
**बकवास**–स्त्री. बडबड.
**बकस**–पु. पेटी, डबा.
**बकसना**–क्रि. स. प्रदान करणें, क्षमा करणें.
**बकसाना**–क्रि. स. क्षमा किंवा माफी
**बकसी**–पु. कारकून. [करविणें.
**बकसीस**–स्त्री. बक्षिस, इनाम, पारितो-
**बकसुआ-वा**–पु. बक्कल. [षिक, दान.
**बकाना**–क्रि. स. बडबड करण्यास प्रवृत्त करणें, पाठ करविणें. [झाड.
**बकायन**–पु. कडूलिंबाच्या जातीचें एक
**बकाया**–पु. अवशिष्ट, शिल्लक, बाकी.
**बकिया**–वि. शिल्लक राहिलेला, परिशिष्ट.
**बकुचना**–क्रि. अ. आक्रसणें, संकोच पावणें.
**बकुचा**–पु. पिशवी, पोटली.
**बकुची**–स्त्री. पिशवी, एक औषधी वन-
**बकुल**–पु. बकुळीचें फूल. [स्पती.
**बकुला**–पु. बगळा.
**बकेन, बकेना**–स्त्री. पारडी, गाय किंवा म्हैस.
**बकैयाँ**–पु. रांगणें.
**बकोट**–स्त्री. ओरखडा, बोचकारा.
**बकोटना**–क्रि. स. ओरखडणें.
**बक़ौल**–अ. सांगण्याप्रमाणें.
**बक्कम**–पु. एक कांटेरी झाड.
**बक्कल**–पु. टरफल, साल.
**बक्काल**–पु. वाणी. [एक प्रकारचें धान्य.
**बक्की**–वि. बडबड्या, वाचाळ.–स्त्री.
**बक्खर**–पु. बखर, साखरेचा पाक.
**बक्स**–पु. पेटी.
**बख़्तर**–पु. चिलखत.
**बखरा**–पु. भाग, अंश.
**बखराबाँट**–पु. हिस्सेरशी.
**बखरी**–स्त्री. माती, विटा इत्यादिकांनीं बनविलेलें घर. [करणें, शिव्या देणें.
**बखानना**–क्रि. स. वर्णन करणें, प्रशंसा
**बखार**–पु. वखार. [शिलाई.
**बखिया**–पु. टीप (शिवण), मजबूत
**बखियाना**–क्रि. स. टीप घालणें, मजबूत
**बखीर**–स्त्री. साखर भात. [शिलाई करणें.
**बख़ील**–पु. कृपण, कंजूष.
**बख़ीली**–स्त्री. कंजूषपणा, कृपणता.[पूर्णपणें.
**बख़ूबी**–अ. चांगल्या तऱ्हेनें, योग्य प्रकारें,
**बखेड़ा**–पु. बखेड़ा, पेंच, अवडंबर, व्यर्थ
**बखेड़िया**– वि. भांडखोर. [विस्तार.
**बखेरना**–क्रि. स. विखुरणें, फैलावणें.
**बख़ैर**–अ. चांगल्या रीतीनें.
**बखोरना**–क्रि. स. टोचून बोलणें, छेडणें.
**बख़्त**–पु. भाग्य, नशीब.
**बख़्तावर**– वि. भाग्यवान्, भाग्य शाली.
**बख़्तावरी**–स्त्री. सुदैव, भाग्य.

**बख्शना**–क्रि. स. क्षमा करणें, दान करणें,
**बख्शवाना**–क्रि. स. क्षमा करविणें. [ सोडणें
**बख्शिश**–स्त्री. बक्षिस, उदारता, दान, क्षमा.
**बगई**–स्त्री. गोमाशी, एक प्रकारचें गवत.
**बगछुट, बगटुट**–अ. बेलगाम, चौखूर.
**बगदना**–क्रि. अ. बिघडणें, भ्रमांत पडणें,
**बगना**–क्रि. अ. भटकणें, फिरणें. [लवंडणें.
**बगमेल**–पु. बरोबरी, स्पर्धा.
**बगर**–पु. राजवाडा, वाडा, खोली, आंगण, गाईचा गोठा. –स्त्री. बगल.
**बगरना**–क्रि. अ. विखुरणें, पसरणें.
**बगराना**–क्रि. स. फैलावणें, पसरविणें,–क्रि.
**बगल**–स्त्री. बगल, काख, बाजू. [अ. पसरणें.
**बगलमें दबाना या धरना**–हस्तगत करणें.
**बगलें झांकना**–अंग काढून घेणें, निसटण्याचा प्रयत्न करणें.
**बगलें बजाना**–हर्षानें नाचू लागणें.
**बगलगंध**–पु. काखेंत होणारा फोड, काखेंत दुर्गंधयुक्त घाम येणारा एक रोग.
**बगलबंदी**–स्त्री. बाराबंदी.
**बगला, बगुला**–पु. बगळा.
**बगलाभगत**–ढोंगी, कपटी.
**बगलियाना**–क्रि. अ. बगल देऊन जाणें. –क्रि. स. दूर करणें, बाजूला आणणें.
**बगली**–वि. बाजूचा.–स्त्री. (शिंप्याची सुई, दोरा, कात्री वगैरे ठेवण्याची) पिशवी, बगलेच्या ठिकाणीं लावावयाचा कापडाचा तुकडा. [केलेला वार.
**बगली घूंसा**–आडून केलेला वार, कपटानें
**बगलौंहा**–वि. तिरपा, झुकलेला.
**बगसना**–क्रि. स. पाहा 'बख्शना'.
**बगा**–पु. अंगरखा, बगळा. [ थांबणें.
**बगाना**–क्रि. स. फिरविणें. क्रि. अ. पळणें,

**बगार**–पु. गव्हाण, गाई बांधण्याची जागा.
**बगारना**–क्रि. स. फैलावणें, विखुरणें.
**बगावत**–स्त्री. बंड, राजद्रोह, दंगा, उपद्रव.
**बगिया**–स्त्री. बगीचा, बाग.
**बगीचा**–पु. बाग.
**बगुला**–पु. बगळा.
**बगूला**–पु. वावटळ.
**बगेरी**–स्त्री. टिटवी.
**बग़ैर**–अ. शिवाय, खेरीज.
**बग्गी, बग्घी**–स्त्री. चार चाकी गाडी, बग्गी.
**बघंबर**–पु. व्याघ्रचर्म.
**बघनहाँ**–पु. वाघनख, वाघाचीं नखें सोन्याचांदीनें मढवून केलेला दागिना.
**बघार**–पु. फोडणी. [मारणें.
**बघारना**–क्रि. स. फोडणी देणें, बढाई
**बघेल, बाघेला**–पु. वाघाचा बच्चा, एक रजपूत जाति. [ वनस्पती.
**बच**–पु. वचन, बोल.–स्त्री. एक औषधी
**बचका**–पु. एक पक्वान्न. [मुलांच्या योग्य.
**बचकाना**–वि. ओबडधोबड, मुलांप्रमाणें,
**बचत**–स्त्री. बाकी, लाभ, सुटका, रक्षण.
**बचन**–पु. वाणी, वचन.
**बचन डालना**–सवाल टाकणें, मागणें.
**बचन निभाना**–वचन पाळणें.
**बचन मानना**–आज्ञा पाळणें.
**बचन लेना**–प्रतिज्ञा करविणें. [बसणें.
**बचन हारना**–प्रतिज्ञाबद्ध होणें, बोलून
**बचना**–क्रि. अ. कष्ट किंवा विपत्तीपासून वांचणें, अलिप्त राहणें, दूर किंवा अलग
**बचपन**–पु. बालपण. [ राहणें.
**बचवैया**–पु. संरक्षक.
**बचाना**–क्रि. स. वांचविणें, रक्षण करणें, खर्च होऊं न देणें, लपविणें, दूर ठेवणें,

परिणाम होऊं न देणें, अलिप्त ठेवणें.
**बच्चा**—पु. कोणत्याहि प्राण्याचा नुकताच जन्मलेला बच्चा, अर्भक, बालक, मुलगा.—वि. अजाण. [बोलणें.
**बच्चोंसा बोलना**—बोबडें बोलणें, पोरकट
**बच्चोंका खेल**—सोपें काम.
**बच्चादानी**—स्त्री. गर्भाशय. [मुलगा.
**बच्छ, बछ, बछरू**—पु. वासरूं, बालक,
**बच्छल**—वि. वात्सल्यपूर्ण, प्रेमळ.
**बच्छस**—पु.वक्षस्थल, छाती.
**बच्छा, बछड़ा**—पु. गोऱ्हा.
**बछड़ा, बछिया**—स्त्री. कालवड, वासरी.
**बछवा**—पु. गोऱ्हा, शिंगरू.
**बछेड़ा**—पु. शिंगरूं.
**बजंत्री**—पु. वाजंत्री वाजविणारा.
**बजड़ा**—पु. मोठी नाव.
**बजना**—क्रि. अ. वाजणें, आवाज होणें, हत्यार चालणें, गाजणें, हट्ट करणें, प्रसिद्धि पावणें. [मनुष्य.
**बजनियाँ,बजवैया**—पु. वाजंत्री वाजविणारा
**बजनी**—वि. वाजविणारा.
**बजमारा**—वि. वज्रामुळें मारला गेलेला.
**बजर,बज्जर**—पु. वज्र.
**बजरा**—पु. मोठी नाव, बजरा.
**बजरी**—स्त्री. खडा, किल्ल्याचा कंगोरा, गार (पावसाची), बाजरी.
**बजवाना**—क्रि. स. वाजवावयास लावणें.
**बजा**—वि. उचित, ठीक. [करणें.
**बजा लाना**—पूर्ण करणें, पालन करणें,
**बजा आवरी**—स्त्री. कर्तव्य पालन, आज्ञा
**बजागि**—स्त्री. विद्युत, वीज. [पालन.
**बजाज़**—पु. कापडाचा व्यापारी.
**बजाज़ा**—पु. कापड बाजार.

**बजाज़ी**—स्त्री. कापडाचा व्यापार.
**बजाना**—क्रि. स. वाजविणें, आवाज काढणें, एखाद्या वस्तूनें मारणें, पूर्ण करणें.
**(ठोकना)बजाना**—तावून सुलाखून पाहाणें.
**बजाय**—अ. ऐवजीं, बद्दल.
**बजारू, बजारी**—वि. बाजारी, सामान्य.
**बजिंस**—अ. जशाचा तसा, हुबेहूब.
**बजुज़**—अ. शिवाय, व्यतिरिक्त.
**बजूरवा**—पु. बुजगावणें.
**बज़्म**—स्त्री. सभा, रंगभूमि.
**बज्र, बज्जर**—पु. वज्र. [बंधनांत पडणें.
**बझना**—क्रि. अ. हट्ट करणें, अडकणें, गुंतणें,
**बझाना**—क्रि. स. जाळयांत अडकविणें,
**बझावा**—पु. फसवणूक. [फसविणें.
**बझावना**—क्रि. स. पाहा 'बझाना'.
**बट**—पु. एक पक्वान्न, लहान वरवंटा, वजन, माप, दोरीचा पीळ, मार्ग, वड.
**बटई**—स्त्री. बटेर (पक्षी).
**बटखरा**—पु. वजन (शेर, अच्छेर इ.).
**बटन**—पु. बटन, गुंडी. —स्त्री. पीळ.
**बटना**—पु. उटणें.—क्रि. स. सूत, दोरी, इ. वळणें. —क्रि. अ. पाट्यावर वाटणें.
**बटपरा—पारा—मारा**—पु. वाटमाऱ्या, डाकू,
**बटला**—पु मोठा गुंड, पातेलें. [लुटारू.
**बटलोई**—स्त्री. लहान गुंड, पातेलें.
**बटवार**—पु. पहारेकरी, जकातदार.
**बटवारा**—पु. वांटणी, बटवडा. [वाटसरू.
**बटा**—पु. गोल वस्तु, चेंडू, गोटा, ढेकूळ,
**बटाई**—स्त्री. वाटण्याची मजूरी, वाटणी.
**बटाऊ**—पु. प्रवासी, पथिक, वाटसरू.
**बटाऊ होना**—चालूं लागणें.
**बटाक**—वि. उंच.
**बटाना**—क्रि. अ. बंद होणें.

**बटिया**–स्त्री. लहान वरवंटा, लहान गोळा.
**बटी**–स्त्री. गोळी, वडी, उपवन.
**बटुआ-वा**–पु. बटवा, मोठा गुंड, पाटयावर वाटलेली वस्तु.
**बटुरना**–क्रि. अ. एकत्र होणें, आखडणें.
**बटेर**–स्त्री. होला (पक्षी). [ समूह.
**बटोर**–पु. जमाव, घोळका, वस्तूंचा ढीग,
**बटोरना**–क्रि. स. गोळा करणें, एकत्र करणें, निवडून घेणें, जमा करणें.
**बटोही**–पु. प्रवासी, यात्रेकरू, वाटसरू.
**बट्टा**–पु. तोटा, दलाली, खोटया नाण्यांत किंवा दागिन्यांत आलेली खोट, वरवंटा, लहान डबा, दगडाचा लहान गोल तुकडा.
**बट्टा खाता**–पु. बुडित खातें.
**बट्टाढाल**–वि. सपाट व गुळगुळीत.
**बट्टी**–स्त्री. बत्ता, वरवंटा, वडी.
**बड़**–स्त्री. बडबड. –पु. वडाचें झाड. –वि. मोठा, श्रेष्ठ, महत्त्वाचा, जास्त.
**बड़प्पन**–पु. मोठेपणा. [ तोंडांत बोलणें.
**बड़बड़ाना**–क्रि. अ. बडबडणें, तोंडांतल्या
**बड़बेरी**–स्त्री. जंगली बोर.
**बड़बोल-ला**–वि. बाताडया, गप्पीदास.
**बड़भाग, बड़भागी**–वि. भाग्यशाली.
**बडरा**–वि. विशाल.
**बड़वारी**–स्त्री. महत्त्व, मोठेपणा.
**बड़वानल**–पु. वडवाग्नि, समुद्रांतील अग्नि.
**बड़हल**–पु. सीताफळाप्रमाणें फळें असलेला
**बड़हार**–वि. लग्नाची जेवणावळ. [एक वृक्ष.
**बड़हेला**–पु. रानडुक्कर.
**बड़ा**–वि. मोठा, विशाल, दीर्घ, श्रेष्ठ, वयानें मोठा. –पु. वडा.
**बड़ाई**–स्त्री. मोठेपणा, विपुलता, प्रशंसा,
**बड़ाई देना**–आदर करणें. [ स्तुति.
**बड़ाई मारना**–शेखी मिरविणें.
**बड़ा घर**–पु. कैदखाना, मोठें घर.
**बड़ा दिन**–पु. नाताळ, ख्रिसमस.
**बड़ी**–स्त्री. वडी. –वि. मोठी.
**बड़ी माता**–स्त्री. देवी (आजार).
**बड़े मियाँ**–पु. वृद्ध मनुष्य, घराचा मालक.
**बड़ेरर**–पु. वावटळ
**बड़ेर**–वि. मुख्य, मोठा. –पु. तुळई.
**बड़ौना**–पु. स्तुति.
**बढ़ई**–पु. सुतार.
**बढ़ती**–स्त्री. वृद्धि, उन्नति.
**बढ़ना**–क्रि. अ. वाढणें, विस्तार होणें, मापांत अगर वजनांत अधिक होणें, लाभ होणें, उन्नति होणें, दुकान बंद होणें, दिवा विझणें.
**बढ़कर चलना**–घमेंड करणें.
**बढ़नी**–स्त्री. केरसुणी.
**बढ़ाना**–क्रि. स. वाढविणें, पसरविणें, पुढें चालू करणें, दुकान इ. बंद करणें, दिवा मालविणें. –क्रि. अ. संपणें, समाप्त होणें.
**बढ़ाव**–पु. वाढ, वृद्धि, विस्तार.
**बढ़ावा**–पु. प्रोत्साहन, उत्तेजन.
**बढ़िया**–वि. उत्तम, उत्कृष्ट. [ सुतार.
**बढ़ैया**–वि. वाढणारा, वाढविणारा–पु.
**बढ़ोतरी**–स्त्री. वृद्धि, प्रगति, उन्नति.
**बत**–पु. बोली, गोष्ट, बदक (हंसवजा), दारू ठेवण्याची सुरई, तऱ्हा, पद्धत.
**बतकही**–स्त्री. संभाषण, वार्तालाप, वाद-
**बतख**–स्त्री. बदक. [ विवाद.
**बतचल**–वि. बडबडया, वाचाळ.
**बतबढ़ाव**–पु. बखेडा माजविणें.
**बतरस**–पु. गप्पा गोष्टींतील मजा, खुमारी.
**बतराना**–क्रि. अ. संभाषण करणें. [असलेला.
**बतरौंहाँ**–वि. गप्पागोष्टी करण्याची इच्छा

**बतलाना**–क्रि. स. सांगणें, समजाविणें, दाखविणें, दृष्टोत्पत्तीस आणणें, भाव दाखविणें, ठाकठीक करणें.
**बताना**–क्रि. स. पाहा 'बतलाना.'
**बताव**–पु. दाखव.
**बतावना**–क्रि. स. पाहा 'बतलाना'.
**बतास, बतासा**–पु. बत्तासा, वायु, हवा.
**बताशा-सा**–पु. बत्तासा, एक प्रकारचें दारू-
**बतिया**–स्त्री. कोवळें फळ. [काम, बुडबुडा.
**बतियार**–स्त्री. संभाषण, गोष्टी.
**बतौर**–अ. सारखें, तऱ्हेनें,' रीतीनें.
**बतख, बतक**–स्त्री. बदक.
**बत्ती**–स्त्री. दिव्याची वात, दिवा, दोरी वा नाळी (दारूकाम पेटवण्याची), सुरुंग. अरुंद विणलेलें पागोटें, मेणबत्ती, जखमांत भरण्याची चिंधी, छपरावर घालण्याचें गवत, मशाल, कामटी.
**बत्तीसी**–स्त्री. बत्तिशी.
**बत्स, वत्स**–पु. वांसरु, पिलूं, मुलगा, मूल,
**बथान**–पु. गोठा. [वर्ष, छाती.
**बथुआ**–पु. घोळ (भाजी).
**बद**–स्त्री. बदरोग, एक पशु रोग, नीच मनुष्य, मोबदला.–वि.वाईट,दुष्ट, नीच.
**बदअमली**–स्त्री. अनागोंदी कारभार.
**बदकार**–वि. व्यभिचारी, दुराचारी. [काम.
**बदकारी**–स्त्री. व्यभिचार, दुराचार, वाइट-
**बदकिस्मत, बदनसीब**–वि.दुर्दैवी, भाग्यहीन.
**बदगुमान**–वि. ज्याच्या मनांत दुसऱ्या विषयीं गैरसमज किंवा संशय उत्पन्न झाला आहे असा.
**बदगुमानी**–स्त्री. गैरसमज, दुराग्रह.
**बदचलन**–वि. दुराचारी, व्यभिचारी.
**बदजबान**–वि. शिव्या देणारा, कटुभाषी.
**बदजात**–वि. पाजी, नीच, दुष्ट, अकुलीन.
**बदतर**–वि. अतिशय वाईट.
**बददुआ**–स्त्री. शाप.
**बदन**–पु. शरीर, देह, मुख. [पैज मारणें.
**बदना**–क्रि. स. सांगणें, स्वीकारणें, ठरविणें,
**बदकर (कोई काम करना)**–सांगून सवरून,
**बदा होना**–नशीबीं असणें. [हटवादीपणानें.
**बदनाम**–वि. निंदित, कलंकित.
**बदनामी**–स्त्री. लोकनिंदा, अपयश.
**बदनीयत**–वि. फसव्या, वाईट.
**बदनुमा**–वि. बोजड, कुरूप.
**बदपरहेज़**–वि. अपथ्यकारक.
**बदबख़्त**–वि. अभागी.
**बदबू**–स्त्री. घाण, दुर्गंध. [अरुचिकर.
**बदमज़गी**–स्त्री. बेबनाव, परस्पर विरोध,
**बदमाश, बदमास**–वि. नीच, दुराचारी लुच्चा, खोटा.
**बदमाशी**–स्त्री.नीचता, दुराचार, खोटेपणा.
**बदमिजाज़**–वि. तुसडा, चिडखोर.
**बदरंग**–वि. वाईट रंगाचा, निराळ्या-रंगाचा पत्ता खेळांत टाकणें.
**बदर**–पु. सरकी, देवसर्पण, बोराचें झाड व बोर, आठ माशाचें वजन.–अ. बाहेर.
**बदरा**–पु. मेघ, ढग.–स्त्री. कापूस.
**बदराह**–वि. दुष्ट, कुमार्गी.
**बदरिया**–स्त्री. ढग.
**बदरि, बदरिक, बदरी**–स्त्री. बोर, कपाशी.
**बदरौंह**–वि. कुमार्गी, दुराचारी.–पु. ढगांचा
**बदल**–पु. फरक, बदल, प्रतिकार. [भास.
**बदलगाम**–वि. निरंकुश.
**बदलना**–क्रि. अ. बदलणें, फरक होणें. ऐवजीं येणें किंवा जाणें, बदली होणें. क्रि. स. परिवर्तन करणें, बदलून घेणें.

**बदलवाना**–क्रि. स. बदलविणें, पालटून घेणें.
**बदला**–पु. सूड, परस्पर, व्यवहार, ऐवजीं दिलेली किंवा घेतलेली वस्तु, परिणाम,
**बदला लेना-चुकाना**–सूड उगवणें. [ फळ.
**बदली**–स्त्री. मेघांचा समूह.
**बदलौवल**–स्त्री. अदलाबदल.
**बदसूरत**–वि. कुरूप.
**बदस्त**–अ. मार्फत, हातानें.
**बदस्तूर**–अ. नियमानुसार, जशाचा तसा.
**बदहज़मी**–स्त्री. अपचन, अजीर्ण.
**बदहवास**–वि. बेशुद्ध, उद्विग्न, व्याकुळ,
**बदा**–वि. भाग्यलिखित. [ शिथिल.
**बदाबदी**–स्त्री. दोन पक्षांतील तेढ.
**बदामी**–वि. बदामी, बदामाचा आकाराचा
**बदी**–स्त्री. कृष्णपक्ष, अहित. [किंवा रंगाचा.
**बदौलत**–अ. मुळें, कारणानें.
**बद्दर, बद्दल**–पु. ढग. [रहाणारी एक जात.
**बद्दू**–पु. दुराचारी माणूस, अरबस्तानांत
**बद्ध**–वि. बांधलेला, कबज्यांत असलेला, गोठलेला, परिमित, निर्धारित, बसलेला, पडलेला, जमलेला, थांबलेला.
**बध, व**–पु. वध, हत्या, मृत्यु, नाश, ताडन, आघात, इजा. [वध करणें, हत्या करणें.
**बधना**–पु. मातीचें तोटीदार भांडें.–क्रि. स.
**बधाई**–स्त्री. अभिनंदन, मंगल प्रसंगाचें गाणें, उत्सव, वृद्धि, अभिनंदनपर गीत, वाद्य, नजराणा, अहेर.
**बधावा**–पु. पाहा 'बधाई.'
**बधावना**–क्रि. स. मारविणें, कत्तल करविणें.
**बधिक**–पु. कसाई, खाटीक, फांशीं देणारा, मांग, व्याध.
**बधिया**–पु. खच्ची केलेला बैल किंवा इतर जनावर, एक प्रकारचा ऊस.
**बधिर**–पु. बहिरा.
**बधू, वधू**–स्त्री. सून, वधू, नवरी, पत्नी, आप्त स्त्री, मादी. [ सून.
**बधूटी**–स्त्री. सून, सौभाग्यवती स्त्री, नवी
**बध्य, वध्य**–वि. मारून टाकण्याजोगें.
**बध्यभूमि**–स्त्री. फांशी देण्याची जागा, स्मशान. [ कापसाचें रोप.
**बन, वन**–पु. वन, समूह, पाणी, बाग,
**बनकंडा**–पु. रानशेणी. [ तील निपज.
**बनक**–स्त्री. सजावट, वेष –स्त्री. रानां-
**बनकर**–पु. जंगलांतील उत्पन्न.
**बनचर**–वि. जंगली, रानटी, वानर पाण्यांत राहाणारा. [पदार्थ, शंख, जलजंतु.
**बनज**–पु. कमल, व्यापार, रानांत होणारे
**बनजना**–क्रि.स. व्यापार करणें.
**बनजर**–पु. माळरान.
**बनजारा**–पु. वंजारी, व्यापारी.
**बनजी**–पु. व्यापार, व्यापारी.
**बनत**–स्त्री. रचना, अनुकूलता, रेशमावर भरण्याची एक वेलबुट्टी.
**बनधातु**–स्त्री. गेरू किंवा रंगीत माती.
**बनन**–स्त्री. बनावट, शृंगार.
**बनना**–क्रि.अ. तयार होणें, रचलें जाणें, वसूल होणें, मिळणें, शक्य असणें, मूर्ख बनणें, निभणें, संधि मिळणें, नटणें, यशस्वी होणें, तडीस जाणें, मोठेपणाचा आव आणणें.
**बना रहना**–जिवंत राहणें, अस्तित्व टिकणें.
**बननि**–स्त्री. बनावट, सजावट, शृंगार.
**बन पड़ना**–होणें, निभणें.
**बनप्शा**–पु. कामपुष्प. (औषधी वनस्पति).
**बनबिलाव**–पु. रानमांजर.
**बनमानुस**–पु. अगदी रानटी मनुष्य, एक

जंगली प्राणी जो वानरापेक्षां मोठा असतो
**बनरखा**–पु. वनरक्षक, जंगलाची रखवाली करणारा, पारधी. [ एक गीत.
**बनरा**–पु. नवरा मुलगा, विवाह प्रसंगीचें
**बनरी**–स्त्री. नवरी मुलगी.
**बनरुह्**–पु. कमळ, जंगलांतील झाड.
**बनवाना**–क्रि.स. दुसऱ्या कडून बनवून घेणें.
**बनवारी**–पु. श्रीकृष्ण.
**बनवाहन**–पु. नौका.
**बना**–पु. नवरा मुलगा.
**बनाई, बनाय**–अ. अगदीं चांगल्या रीतीनें.
**बनाना**–क्रि.स. तयार करणें, कमविणें, मिळविणें, दुरुस्ती करणें, थट्टा करणें,
**बनाफर**–पु. एक क्षत्रिय जाति. [ बनविणें.
**बनाबंत**–पु. टिपण जुळविणें.
**बनाम**–अ. नांवानें.
**बनाय**–अ. अगदीं उत्तम प्रकारें.
**बनाव**–पु. रचना, सजावट, युक्ति.
**बनावट**–स्त्री. रचना, वरवरचा देखावा.
**बनावना**–क्रि. स. बनविणें. [ वनस्पति.
**बनासपती**–स्त्री. भाजीपाला, गवत इत्यादि,
**बनि**–वि. संपूर्ण, एकंदर.
**बनिक**–पु. वाणी, व्यापारी.
**बनिज**–पु. व्यापार, विक्रीची वस्तु.
**बनिजना**–क्रि.स. व्यापार करणें, विकत घेणें, विकणें, ताब्यांत घेणें.
**बनिता**–स्त्री. स्त्री, पत्नी.
**बनिया**–पु. व्यापारी, वाणी, वैश्य.
**बनियाइन**–स्त्री. वाण्याची स्त्री, बनियन.
**बनिस्बत**–अ. पेक्षां, तुलनेंत. [ स्त्री.
**बनियानी, बनीनी**–वाणीण, वैश्य जातिची
**बनीर**–पु. बेत.
**बनेठी**–स्त्री. बोथाटी.
**बनै**–सुघरावा, चांगला व्हावा, शक्य असलें,
**बनैला**–वि. जंगली, रानटी. [ वराला.
**बनौटी**–वि. कापशी, कापसाच्या फुला-
**बनौरी**–स्त्री. गार (बर्फाची). [सारखा.
**बपतिस्मा**–पु. ख्रिस्ती धर्माची दीक्षा देणें.
**बपना, वपना**–क्रि.स. बीं पेरणें.
**बपमार**–वि. पितृहत्या करणारा, सर्वांशीं कपट करणारा.
**बपु, वपु, बपुष**–पु. शरीर, आकार, रूप, स्वभाव, मूर्ति, रमणीय आकार, तेज.
**बपुरा**–वि. बिचारा.
**बपौती**–स्त्री. पैतृक संपत्ति.
**बफरना**–क्रि. अ. बिथरणें.
**बफारा**–पु. वाफारा.
**बबर**–पु. विशिष्ट जातीचा वाघ, सिंह.
**बबुआ**–पु.मुलगा किंवा जांवई यांना प्रेमाचें संबोधन, जमीनदार.
**बबूर, बबूल**–पु. बाभूळ, बाभळीचें झाड.
**बबूला**–पु. बावळट, बुडबुडा.–वि. फेंसाळ.
**बभ्र**–वि. पिंगट, रोगानें टक्कल पडलेला. –पु. अग्नि, मुंगूस, मोठें मुंगूस, झाडू,
**बभूत**–स्त्री. विभूति, भस्म. [भंगी, शंकर.
**बम**–पु. बॉम्ब गोळा, शिवोपासकांचा 'बम' 'बम' असा शब्द, टांगा किंवा बग्गी वगैरेची पुढें जुंपावयाची दांडी.
**बम बजना**–शस्त्रांचा खणखणाट होणें.
**बम बोलना, बम बोल जाना**–संपत्तीची वूळधाण होणें, सामग्री खलास होणें.
**बमकना**–क्रि. अ. शेखी मिरविणें, रागावणें.
**बमचख**–स्त्री. बाचाबाची, घोंगाट.
**बमन, वमन**–स्त्री. ओकारी, वांति.
**बमना**–क्रि. अ. ओकणें.
**बमुजिब**–अ. अनुसार, प्रमाणें.

**भूसा**–पु. ब्राह्मण.
**भसुरभसौला**–पु. भुसा ठेवण्याची जागा.
**भृंग**–पु. भुंगा, कुंभारीण माशी, काकाकुवा, जार, सुवर्णपात्र, झारी, अभ्रक,
**भृंगी**–पु. शिवगण, वड.
**भृकुटिटी**–स्त्री. भुकुटी, भिंवई.
**भृगु**–पु. एक ऋषि, शुक्रवार.
**भृगुनाथ, भृगुनंदन**–पु. परशुराम.
**भेंगा**–वि. तिरळा.
**भेंट**–स्त्री. नजराणा, भेट, दर्शन.
**भेंटना**–क्रि. स. भेटणें, अलिंगन देणें.
**भेंवना**–क्रि. स. भिजविणें, ओलें करणें.
**भेई,भेदी**–वि. भेदी, फूट पाडणारा माणूस,
**भेउ, भेव**–पु. रहस्य, गुप्त गोष्टी. [जासूद.
**भेक**–पु. बेडूक, भित्रा, ढग.
**भेख**–पु. वेष,नेपथ्य,वैश्याचें घर. [जल, सुख.
**भेखज,भेषज**–पु. औषध, उपाय, काळेजिरें,
**भेजना**–क्रि. स. पाठविणें, रवाना करणें.
**भेजवाना**–क्रि. स. रवाना करविणें.
**भेजा**–पु. मेंदू, मगज.
**भेड़**–स्त्री. मेंढी, एडका, मेंढा, नौका, ताफा.
**भेड़ा**–पु. मेंढा.
**भेड़िया**–पु. लांडगा.
**भेड़ियाधसान**–अंधानुकरण.
**भेड़ी**–स्त्री. मेंढी.
**भेद**–पु.अडथळा, विघ्न, भाग, मर्म, रहस्य, अंतर, प्रकार, फरक, बदल, विकृति, भिन्नभाव, फाटाफूट, फितूरी, प्रकार, विशेष, नाश, व्यग्रता, द्वैत, मलोत्सर्ग, भेदण्याची क्रिया, शत्रूपक्षाच्या लोकांना फोडून आपल्याकडे बळविण्याची क्रिया.
**भेदड़ी**–स्त्री. बासुंदी. [णारा, घरभेद्या.
**भेदिया,भेदी**–पु. हेर,गुप्तचर, रहस्य जाण-
**भेरी**–स्त्री. नगारा, दुंदुभी, नौबत.
**भेरीकार**–पु. नगारा वाजविणारा.
**भेला**–पु. भेट, मुलाखत, मोठा गोळा.
**भेली**–स्त्री. गुळाची ढेप किंवा थापटी.
**भेव**–पु. रहस्य, गौप्य, भेद.
**भेवना**–क्रि. स. भिवविणें, भिजविणें.
**भेष**–पु. वेष, रूप. [उपाय.
**भेषज**–पु. औषध, जल, सुख, काळेजिरें,
**भेषना**–क्रि. स. सोंग घेणें, वेषांतर करणें,
**भेस, भेष**–पु. वेष. [कपडे घालणें.
**भेस बनाना या रखना**–हुबेहूब नक्कल करणें.
**भैंस**–स्त्री. म्हैस, एक प्रकारचा मासा.
**भैंसा**–पु. रेडा, यमाचें वाहन.
**भै, भय**–पु. भय, भीति. [वि. भिक्षेचें.
**भैक्ष**–पु. भीक, भिक्षावृत्ति, भिक्षान्न.–
**भैचक**–वि. चकित, विस्मित, घाबरलेला.
**भैजन**–वि. भयावह, भीति उत्पन्न कर-
**भैन,भैना, भैनी**– स्त्री. बहीण. [णारा.
**भैने**–पु. भाचा, बहिणीचा मुलगा.
**भैयंस**–पु. संपत्तींतील भावाचा हिस्सा.
**भैया**–पु. भाऊ, नौकेची पट्टी.
**भैयादूज**–स्त्री. भाऊबीज. [भय.
**भैरव**–वि. भयंकर.–पु. शंकर, भयानक रस,
**भोंकना**–क्रि. स. भोसकणें, खुपसणें.
**भोंटी**–वि. धार नसलेली.
**भोंडा**–वि. कुरूप.–पु. एक प्रकारचें गवत.
**भोंडापन**–पु. कुरूपता. [पांढरे असतात.
**भोंडी**–वि. एक मेंढी जिचे पोटावरचे केस
**भोंतरा**–वि. बोथट, धार नसलेला.
**भोंदू**–वि. मूर्ख, बेअकली.
**भोंपू**–पु. तुतारी, भोंगा.
**भोग**–पु. खाणें, उपभोग, वापरणें, विलास, दुःख, विषय, धन,अंमल, राज्य, मालकी,

सोसणें, अनुभव, सुख, रतिसुख, भोग्य, पदार्थ, मेजवानी, अन्न, नैवेद्य, नफा, उत्पन्न, वेश्यावेतन, नागाचा फणा, सर्पाचें शरीर, शरीर, सैन्याची रांग, ग्रहांचें राशींत असणें, पालन, भक्षण, प्रारब्ध.

**भोगना**–क्रि. अ. भोगणें, सहन करणें.

**भोगबंधक**–पु. भोगवटा.

**भोगली**–स्त्री. नाकांतील चमकी.

**भोगवना**–क्रि. अ. उपभोगणें.

**भोगावती, भोगवती**–सर्पांची नगरी, पाताळांतील गंगेची धारा.

**भोज-जू**–पु. भोजन, मेजवानी, जेवणावळ.

**भोजन**–पु. अन्न, भोग, उपयोग, खाण्याची वस्तु.–वि. खाणारा.

**भोजनखाना**– स्त्री. स्वयंपाकघर.

**भोजपत्र**–पु. पाहा 'भूरजतरु'. [दगड.

**भोट**–पु. भूतान देश, एक प्रकारचा मोठा

**भोटियाबादाम**–पु. भुइमुगाची शेंग, अलूबुखारा.

**भोडर-ल**–पु. अभ्रक, अभ्रकाचा चुरा.

**भोथरा**–वि. बोथट. [होणें.

**भोना**–क्रि.अ. भिनणें, भिजणें, आसक्त

**भोपा**–पु. भोंगा (गिरणीचा वगैरे), मूर्ख.

**भोर**–पु. एक मोठा पक्षी, चूक, कपट, पहाट. –वि. स्तिमित, चकित.

**भोरा**–वि. भोळा, सरळ.

**भोराई**–स्त्री. भोळेपणा.

**भोराना**–क्रि. स. फसविणें, धोक्यांत पाडणें. –क्रि. अ. फसणें, धोक्यांत पडणें.

**भोरी**–वि. भोळी.

**भोला**–वि. भोळा, सरळ, मूर्ख. [सरळ.

**भोला भाला**–वि. अगदीं भोळा किंवा

**भौं**–स्त्री. भुवई.

**भौंकना**–क्रि. अ. भुंकणें, बडबडणें.

**भौंडा**–वि. कुरूप, बेढब, बावळा.

**भौंतुवा**–पु. एक काळा किडा (पावसाळी पाण्यावर तरंगणारा), काखमांजरी, घाण्याचा बैल. [घोडा.

**भौंर**–पु. पाण्याचा भोंवरा, भुंगा, काळा

**भौंरा**–पु. भोंवरा, मधमाशी, खेळण्याचा भोंवरा, धनगरानें बाळगलेला कुत्रा.

**भौंरी**–स्त्री. गाकर, वाटी, पाण्यांतील किंवा केसांतील भोंवरा, सप्तपदी.

**भौंहं**–स्त्री. भुवई.

**भौंह चढ़ाना, तरेरना या तानना**–संतापणें, कपाळाला आंठ्या घालणें, रागावणें.

**भौंह जोहना**–खुशामत करणें.

**भौ**–पु. भय, भीति, जग, दुनिया.

**भौचक**–वि. आश्चर्यचकित, स्तंभित.

**भौज, भौजाई**–स्त्री. भावजय.

**भौतिक**–पु. जीव, प्राणी, शंकर. –वि. पंचमहाभूतासंबंधी, पंचमहाभूतापासून बनलेला, भूतयोनीचा, शरीरसंबंधी.

**भौन, भवन**–पु. घर.

**भौना**–क्रि. अ. चकरा मारणें, फिरणें.

**भौम**–वि. मातीचे, इहलोकीचे, भूमीसंबंधी, भूमींतून उत्पन्न झालेला. –पु. मंगळ ग्रह, नरकासुर, पंचमहाभूतात्मक वस्तु, मजला, जमीन (घरांतील), सोरा.

**भौर**–पु. भुंगा, मधमाशी, पाळण्याची दोरी, भोंवरा, घुमसणारा अग्नि, मेंढयांची राखण करणारा कुत्रा, घोडयाची एक जात.

**भौरा**–वि. भोळा, मूर्ख, कपटानें.

**भौलिया**–स्त्री. छपरी नाव, लहान नाव.

**भुजबीहा**–पु. वीस हातांचा रावण.
**भुजमूल**–पु. खांक, खांदा, खवाटा.
**भुजवा**–पु. भडभुंजा. [ रेषा, गुंडाळी.
**भुजा**–स्त्री. हात, सर्पाचें शरीर, बाजू, वक्र
**भुजा उठाना**–प्रतिज्ञा करणें.
**भुजाली**–स्त्री. बरची, कटचार.
**भुजिया**–पु. उकडलेली साळ, कोरडी
**भुजी**–वि. भुजा असलेली.[तळलेली भाजी.
**भुजे(जौ)ना**–पु. भाजकें धान्य, भाज-
**भुट्टा**–पु. कणीस. [ण्याची मजुरी.
**भुतहा**–वि. भुतांचा, अल्लड.
**भुनगा**–पु. भुंगा, पतंग (किडा). [बडबडणें.
**भुनना**–क्रि. अ. भाजलें जाणें, जळफळणें,
**भुनभुनाना**–क्रि. अ. पुटपुटणें, कुटणें.
**भुनवाई**–स्त्री. भाजणावळ.
**भुनाना**–क्रि. भाजविणें, मोड करणें.
**भुबि**–स्त्री. भूमि, जमीन. [नदार.
**भुमिया**–पु. जमीन धारण करणारा, जमी-
**भुरकना**–क्रि. अ. सुकून भुसभुशीत होणें विरणें. [टाकणें, भुलविणें, फूस लावणें,
**भुरकाना**–क्रि. स. भुरभुरणें, विखुरणें,
**भुरकुस**–पु. भुसकट. [चुर होणें.
**भुरकुस निकालना**–कंबरडें मोडणें, चुर-
**भुरता**–पु. कोचा पडलेली वस्तु, भरीत, रायतें. [तिंबणें, खूप बदडणें.
**(किसीका) भुरता करना या बनाना**–कणिक
**भुरभुरा**–वि. फुसका, भुसभुशीत.
**भुरभुराना**–क्रि.अ. पाहा 'भुरकना.'
**भुरवना**–क्रि. स. भुलविणें, फसविणें.
**भुराई**–स्त्री. भोळेपणा.
**भुराना**–क्रि. स. विसरणें, भुलविणें, फस-
**भुलकुकड़**–वि. विसराळू. [विणें.
**भुलसना**–क्रि.अ. करपणें, पोळणें.

**भुलाऊ**–वि. भुलविणारा. [विसरणें.
**भुलाना**–क्रि. स. भुलविणें.–क्रि. अ. भुलणें,
**भुलावा**–पु. दगा, धोका, थापा.
**भुव**–पु. अग्नि, भूलोक. –स्त्री. पृथ्वी, जगत्. –क्रि. अ. झालें.
**भुवन**–पु. जग, तीनलोक, पाणी, लोक, सृष्टि, जन, आकाश.
**भुवपाल, भुवाल**–पु. भूपाल, राजा.
**भुवा**–पु. कापूस.
**भुवि**–स्त्री. पृथ्वी.
**भुशुंडी**–पु. ऋषींच्या शापानें कावळा झालेला एक ब्राह्मण. –स्त्री. एक
**भुस**–पु. भुसा. [प्राचीन अस्त्र.
**भुस तरे जाना, भुसमें डालना, भुसमें मिलाना**–मातीमोल करणें.
**भुसी**–स्त्री. भुसकट, तूस.
**भुसुंडि, भंशुंडि**–स्त्री. एक प्रकारचें शस्त्र, तोफेचें तोंड, मुग्दल विशेष.–पु. एका भक्ताचें नांव.
**भूँकना**–क्रि. अ. भुंकणें, बडबड करणें.
**भूँचाल**–पु. भूकंप.
**भूँजा**–पु. भडभुंज्या, लाह्या, फुटाणें इ.
**भूँडोल**–पु. भूकंप.
**भू**–वि. (समासांत) असणारे, जन्मणारे, होणारे, (जसें–स्वयंभू) पु. यज्ञाग्नि.– स्त्री. पृथ्वी, जमीन, आकृतीचा पाया.
**भूई**–स्त्री. कापसासारखा, मऊ लहान
**भूकंप**–पु. भूकंप. [तुकडा.
**भूख**–स्त्री. भूक, क्षुधा, आवश्यकता, जरुरी, इच्छा, लालसा. [कवि.
**भूखन, भूखण**–पु. दागिना, अलंकार, भूषण
**भूखना**–क्रि. स. सजविणें, शृंगारणें.
**भूखा**–वि. भुकेलेला, गरजू, गरीब, दरिद्री.

**भूगर्भ**–पु. पृथ्वीचा आंतला भाग, विष्णु.
**भूगोल**–पु. पृथ्वी, पृथ्वी संबधींचें शास्त्र.
**भूचाल**–पु. भूकंप.
**भजना**–क्रि. स. भाजणें, भोगणें.
**भूटियाबादाम**–पु. अलूबुखारा.
**भूडोल**–पु. भूकंप. [ यात्रा.
**भूण**–पु. जलभ्रमण, जलविहार, समुद्र-
**भूत**–वि. झालेलें, सिद्धीस गेलेलें, खरें, योग्य, न्याय्य, मिश्रित, तुल्य, घडलेलें, मिळालेलें, अनादि, नित्यसिद्ध. –पु. पुत्र, कुमार, रुद्रानुचर, नागरमोथा, योगींद्र, वस्तु, जीव, पिशाच, स्थूल, पंचमहाभूतें, सत्यगोष्ट, भूतकाल, कल्याण, योग्यपणा, अफू, पारा. –स्त्री. वद्य १४.
**भूतका पकवान, भूतकी मिठाई**–भ्रमांत टाकणारी वस्तु वा गोष्ट.
**भूत चढ़ना या सवार होना**–फार राग येणें. फार हट्ट करणें.
**भूतदया**–स्त्री. प्राणीमात्रावरची दया.
**भूतपूर्व**–वि. माजी, पूर्वीचें.
**भूतल**–पु. भूपृष्ठ, पाताल, जग.
**भूति**–स्त्री. अस्तित्व, जन्म, उत्पत्ति, कल्याण, यश, समृद्धि, महिमा, भस्म, अणिमादि अष्टसिद्धि, हत्तीचा मद, लक्ष्मी, मांसपाक बिशेष, जाति, रोहिततृण, हत्तीचा अलंकार.
**भूतिकाम**–पु. बृहस्पति, प्रधान, मंत्री.
**भतिकील**–पु. खळगा, खंदक, द्रव्य पुर-
**भूतिकृत्य**–पु. उत्सव. [ ण्याचा खळगा.
**भूतिनी**–स्त्री. डाकिण. [ राजा.
**भूधर**–पु. पर्वत, डोंगर, शेषनाग, विष्णु,
**भून, भ्रूण**–पु. गर्भ, बालक, विद्वान ब्राम्हण.
**भूनना**–क्रि. स. भाजणें, तळणें, सतावणें.
**भूप, भूपति, भूपाल**–पु. राजा.
**भूभल**–स्त्री. गरम रेती.
**भूमा, भूमन**–पु. ब्रह्म, विराट पुरुष, वैपुल्य, बाहुल्य, सम्पत्ति, बहुवचन.
**भूमि–मी**–स्त्री. जमीन, जागा, आधार, देश, क्षेत्र, स्थावर मिळकत, मजला, आसन, सोंग, विषय, मर्यादा, इयत्ता.
**भूमिका**–स्त्री. पायरी, फळा, वेष, भूषविणें, सोंग घेणें, प्रस्तावना, रचना,
**भूमिनाग**–पु. गांडूळ. [ वेषांतर.
**भूमिया**–पु. जमीनदार, ग्रामदेवता.
**भूमिहार**–पु. बिहार व संयुक्त प्रांतांतील
**भूर**–पु. रेती, वाळू.–वि. पुष्कळ. [ एक जात.
**भूरज**–पु. भूर्जपत्र, धूळ.
**भूरजतरु**–पु. भूर्जपत्राचा वृक्ष.
**भूरा**–पु. भुरा, करडा रंग, साखर. –वि. मळकट रंगाचा, खाकी. [ अशुद्धि, भूल.
**भूरी**–वि. पुष्कळ, मोठें. –पु. ब्रह्म, विष्णु, महेश, सोनें. –अ. अति, वारंवार.
**भूल**–स्त्री. विस्मरण, चूक, कसूर, अपराध.
**भूलना**–क्रि. स. विसरणें, चूक करणें, हरविणें, गमविणें. –क्रि. अ. विस्मरण होणें, चूक होणें, गर्विष्ठ होणें, हरवणें.
**भूलभुलैया**–स्त्री. चक्रव्यूह.
**भूवा**–पु. कपाशी. [ दागिना.
**भूषण, भूसन**–पु. अलंकार, शोभेची वस्तु,
**भूषना**–क्रि. स. भूषविणें, सजविणें. शोभा.
**भूषा**–स्त्री. दागिना, अलंकार, सजावट.
**भूषित**–वि. अलंकृत, सजविलेला. –क्रि. अ. भुंकणें, कुत्र्याचें ओरडणें.
**भूसना**–पु. भूस, भुसा.
**भूसी**–स्त्री. भूस, भुसकट, तूस, कोंडा.

मंदार वृक्ष, मोत्यांचा हार, एक पर्वत, एक वर्ण वृत्त.
**मंदरा**–वि. ठेंगणा.–पु. एक प्रकारचें वाद्य.
**मंदाकिनी**–स्त्री. गंगा, स्वर्गंगा, चित्रकूट पर्वतांतून वाहणारी नदी.
**मंदिर**–पु. देवालय, घर, वासस्थान, शहर.
**मंदुरा**–स्त्री. गादी, चटई, हातरी, तबेला.
**मंदोदरी**–स्त्री. रावणाची पट्टराणी, मय राक्षसाची मुलगी.
**मंद्र**–वि. गंभीर शब्द, रमणीय.–पु. विंध्याद्रीवरील हत्ती, वाद्य विशेष.
**मंशा**–स्त्री. इच्छा, आशय.
**मंसब**–पु. दर्जा, पदवी, हुद्दा, अभिप्राय.
**मंसूख**–वि. रद्द केलेला, काढून टाकलेला.
**मंसूबा**–पु. हेतु, उपाय, योजना.
**मअदन**–पु. धातूची खाण.
**मअलूल**–वि. तर्कानें किंवा युक्तिवादानें सिद्ध केलेला.–पु. निष्कर्ष.
**मआज् अल्लाह्**–परमेश्वर रक्षण करो.
**मआनी**–पु. अर्थ, उद्देश, हेतु. [नदारी.
**मआश**–स्त्री. उपजीविकेचें साधन, जमी-
**मआशरत**–स्त्री. सामाजिक जीवन.
**मइके, मायके**–स्त्री. माहेर.
**मइत्री, मैत्री**–स्त्री. मैत्री, मित्रता.
**मई**–स्त्री. मे महिना.
**मच(का)ई**–स्त्री. मका.
**मकड़ा**–पु. मोठा कोळी (किडा).
**मकड़ी**–स्त्री. कोळी, कातीण.
**मकतब**–पु. शाळा, विद्यालय.
**मक़तल**–पु. वधस्थान, फांशीची जागा, प्रियकरणीचें विहार स्थल.
**मकतून**–वि. लिखित.–पु. लिखाण, पत्र.
**मक़तूल**–वि. कत्तल झालेला, प्रेमी.
**मक़दूर**–पु. सामर्थ्य.
**मक़नातीस**–पु. लोहचुंबक. [दिलेला.
**मक़फूल**–वि. गहाण ठेवलेला, स्वस्त दरानें
**मक़बरा**–पु. समाधिस्थान, थडगें.
**मक़बूज़ा**–वि. वश केलेलें. [केलेला.
**मक़बूल**–वि. कबुली दिलेला, पसंत, निवड
**मकरंद**–पु. फुलांतील मध, एक वृत्त, फुलांतील केसर.
**मकर**–पु. माघ महिना, मगर, मकर रास, सैन्याचा एक प्रकारचा व्यूह, मासा, कपट, चलाखी.
**मकरतार**–पु. कलाबूत.
**मकरा**–पु. नाचणी, कोळी (प्राणी).
**मकरी**–स्त्री. एका रोगाचें नांव, मगर.–पु.
**मक़रूज़**–वि. ऋणकरी, देणेदार. [समुद्र.
**मकरूह**–वि. तिरस्कृत.
**मक़सद**–पु. उद्देश, ध्येय, आकांक्षा, कामना.
**मक़सूद**–वि. उद्दिष्ट, अभिप्रेत, गर्भित.
**मक़सूम**–वि. विभक्त.–पु. नशीब, गणितांत
**मकान**–पु. घर, स्थान, निवासस्थान. [भाज्य.
**मकाफ़ात**–स्त्री. पापाचें फळ, बदला.
**मक़ाम**–पु. स्थान, मुक्कामाची जागा.
**मक़ामी**–वि. स्थिर, स्थानीय.
**मकाला**–पु. ग्रंथ, प्रकरण, करारनामा, सांगितलेली गोष्ट.
**मकु**–अ. वाटेल तें, उलटपक्षीं, कदाचित्, जरी, यद्यपि, इतकेंच नव्हे तर. [माणूस.
**मकुना**–पु. बिनदांताचा हत्ती, बिन मिशांचा
**मकुनी**–स्त्री. बेसन भरून केलेली कचोरी.
**मक़ूला**–पु. म्हण, उक्ति.
**मकोई-य**–स्त्री. बोराएवढें एक आंबट
**मकोड़ा**–पु. मुंगळा. [रसाळ फळ, राजबेरी.
**मकोरना**–क्रि. स. मुरगळणें, पिरगळणें.

**मक्का**–पु. मका, मुसलमानांचें तीर्थस्थान
**मक्कार**–वि. कपटी, धूर्त, लबाड. [मक्का.
**मक्कारी**–स्त्री. कपट.
**मक्खन**–पु. लोणी.
**(कलेजेपर) मक्खन मला जाना**–शत्रूची हानि पाहून आनंद मानणें.
**मक्खी**–स्त्री. माशी. [बसणें.
**मक्खी उड़ाना या मारना**–माशा मारीत
**मक्खी की तरह निकाल देना**–एकदम काढून दूर फेकणें.
**(जीती) मक्खी निगलना**–जाणून बुजून हानिकारक काम करणें.
**(दूधकी) मक्खी होना**–बहिष्कृत होणें.
**मक्खी चूस**–वि. कंजूष, चिक्कू.
**मख**–पु. यज्ञ, विष्णु, पूजा.
**मखज़न**–पु. कोष, खजिना, शब्द कोश.
**मखतूल**–पु. काळें रेशीम.
**मखतूली**–वि. काळ्या रेशमापासून बनलेला. [आहे असा.
**मखदूश**–वि. ज्याच्यांत नुकसानीचें भय
**मखनिया**–पु. लोणीविक्या.–वि. ज्याच्यांतून लोणी काढून घेतलें आहे असें.
**मखनुल**–पु. काळें रेशीम.
**मख़मल**–स्त्री. मखमली कापड.
**मख़मसा**–पु. विकट प्रश्न किंवा प्रसंग.
**मख़मूर**–वि. नशेमध्यें चूर.
**मख़रज**–पु. उगम, शब्दाची व्युत्पत्ति, निघण्याचा रस्ता, बोलण्याचें इंद्रीय, तोंड.
**मख़लूक़**–वि. रचलेलें. –स्त्री. सृष्टींतील जीव, बनलेली वस्तु.
**मख़लूकात**–स्त्री. 'मखलूक़'चें अ. वचन.
**मख़लूत**–वि. मिसळलेलें.
**मख़सूस**–वि. विशेष, वेगळें केलेलें.
**मखाना**–पु. एक औषधी वनस्पति.
**मख़ौल**–पु. थट्टामस्करी.
**मख़ौल उड़ाना**–टर उडविणें.
**मग**–पु. मार्ग, रस्ता, मगध देश, शाकद्वीपी ब्राह्मण.
**मगज़**–पु. मेंदू, गर. [द्वीपी ब्राह्मण.
**मगज़ खाना या चाटना**–डोकें पिकविणें.
**मगज़ खाली करना या पचाना**–डोकेंफोड
**मगज़ चट**–वि. खाष्ट, वडबड्या. [करणें.
**मग़ज़ी**–स्त्री. किनारीला लावण्याचा गोटा, जर.
**मगदल**–पु. मुगदळाचा लाडू.
**मगदा**–वि. मार्गदर्शक.
**मगध**–पु. दक्षिण बिहार, भाट. [लेला.
**मगन, मग्न**–वि. मग्न, लीन, प्रसन्न, बुडा-
**मगना**–क्रि. अ. तन्मय होणें, बुडणें.
**मग़फ़िरत**–स्त्री. क्षमा,
**मग़फ़ूर**–वि. कैलासवासी.
**मग़मूम**–वि. दुःखी.
**मग़र**–अ. परंतु, पण, मगर.
**मग़रमच्छ**–पु. मगर, सुसर, मोठे मासे.
**मगरा**–वि. उद्धट, घमेंडखोर, पर्वत.
**मग़रिब**–पु. पश्चिम दिशा.
**मग़रूर**–वि. घमेंडखोर.
**मग़रूर का सिर नीचा**–गर्वाचें घर खाली.
**मग़रेला, मग्रैल**–पु. छपराचें वरचें टोंक,
**मग़लूब**–वि. पराजित, जिंकलेला. [एक बीं.
**मगह**–पु. मगध देश.
**मगहि**–पु. एक प्रकारचें पान.–वि. मगध
**मगु, मग्ग**–पु. मार्ग, पंथ. [देशाचा.
**मग़ज़ी**–स्त्री. समान, मार्जिन, किनार.
**मग्न**–वि. मग्न, तल्लीन, बुडालेला, नशेंत
**मचक**–स्त्री. दाब, वजन. [गुंग.
**मचकना**–क्रि. स. दाबणें, चेपणें, चिरडणें.

**भौसा**–पु. दाटी, गर्दी, गडबड.
**भ्रम**–पु. वाटोळें फिरणें, चक्कर, भ्रम, संशय, एक प्रकारचा रोग, मूर्च्छा, भ्रमण, चाकाचा फेरा, प्रतिष्ठा, पाण्याचा पाट, गटार, गोंधळ, चाक, चरक, जातें, विपरीत ज्ञान, च्युत होणें.
**भ्रमना**–क्रि. अ. फसणें, भटकणें.
**भ्रमि भ्रमी**–स्त्री. भ्रमण, भोंवरा, चक्र (कुंभाराचें), मूर्च्छा, चूक, बावटळ. –वि. भ्रम झालेला, चकित. [चालीचा.
**भ्रष्ट**–वि. पतित, बिघडलेला, दूषित, वाईट
**भ्रांत**–पु. तलवारीचा एक हात. –वि. भ्रमिष्ट झालेला, व्याकुळ, उन्मत्त, [फिरविलेला.
**भ्राजना**–क्रि. अ. शोभणें.
**भ्राजमान**–वि. शोभायमान.
**भ्राजा**–वि. शोभलेला, सुंदर दिसलेला.
**भ्रात.भ्राता**–पु. भाऊ, जिवलग मित्र,आप्त.
**भ्रान्ति**–स्त्री. भ्रम, शंका, भ्रमण, वेडेपणा, चूक, मोह, एक प्रकारचा काव्यालंकार.
**भ्रामर**–पु. मध.
**भ्रू**–स्त्री. भुवई.
**भ्रूभंग**–पु. कपाळाची आठी.
**भ्वहरना**–क्रि. अ. भयभीत होणें.

## [ म ]

**मंकुर**–पु. आरसा. [नौकेची नाळ.
**मंग**–स्त्री. याचना, भांग (स्त्रियांचा),
**मॅंगता, मंगन**–पु. याचक, भिक्षुक.
**मॅंगनी**–स्त्री. मागणी, मागणी (लग्नाची), उसनी वस्तु.
**मंगल**–वि. शुभ, समृद्ध. –पु. मंगळ ग्रह, सुदेव, सुख, शुभशकुन, शुभकार्य. –स्त्री. पार्वती, पतिव्रता, हळद, दुर्वा.
**मंगला**–स्त्री. पार्वती.
**मंगलाचरण**–पु. कार्यारंभीची स्तुति, आशीर्वाद.
**मंगलामुखी**–स्त्री. वेश्या.
**मंगली**–वि. मंगळाचा किंवा मंगळाची.
**मॅंगवाना, मॅंगाना**–क्रि. स. मागविणें.
**मॅंगेतर**–वि. मागणी घातलेला किंवा घातलेली.
**मंच**–पु. खाट, पलंग, फलाट, व्यासपीठ, सिंहासन, उच्चासन, माच, उंच ओटा, शेतांतला माचा.
**मंचक**–पु. पलंग, माचा, खाटलें.
**मंजन**–पु. स्नान, दंतमंजन.
**मॅंजना**–क्रि. अ. घासलें जाणें, स्वच्छ होणें, अभ्यास होणें, तयारी होणें.
**मॅंजाना**–क्रि. स. घांसवून घेणें.
**मॅंजार,मार्जार**–स्त्री. मांजर.
**मंज़िल**–स्त्री. मुक्कामाची जागा, इमारतीचा मजला, टप्पा, मजल.
**मंज़िलत**–स्त्री. हुद्दा, पद, अधिकार.
**मंजीर**–पु. नूपुर, पैंजण, तोरड्या, घुसळखांब.
**मंजीरा**–पु. चिपळ्या, घुंगरू, झांज.
**मंजु**–वि. सुंदर, गोड. –पु. हंस.
**मंजुल**–वि. सुंदर, मधुर. –पु. तित्तिर, लतामंडप, झरा, शेवाळ.
**मंज़ूर**–वि. स्वीकृत.
**मंजूषा,मंजूषिका**–स्त्री. लहान पेटी, पिंजरा, पीप, मंजिष्ठा, दगड.
**मॅंझधार**–पु. प्रवाहाचा मध्यभाग.
**मॅंझला**–वि. मधला.
**मंझली**–वि. मधली.
**मंझा**–वि. मधला, मधोमध असलेला.–पु. पलंग, खाट, नदींतील बेट, शिरपेच, झाडाचें खोड.
**मॅंझार**–अ. मध्यभागीं.
**मॅंझियाना**–क्रि. स. ओलांडणें, पलीकडे जाणें.
**मॅंझियार**–वि. मधला.

**मँझोला**–वि. मधला, मध्यम.

**मंड**–पु. अलंकार, बेडूक, एरंड, पेज (भाताची), साय, फेंस, मद्याचा सत्त्वांश, कांजी, सत्त्व. –स्त्री. मद्य, आंवळी.

**मंडन**–वि. अलंकार घालणारा. –पु. भूषण, शृंगार, प्रमाणानें सिद्ध केलेली गोष्ट.

**मंडना**–क्रि. स. सजविणें, समर्थन करणें, भरणें. [तंबू, मंदिरावरील कळस.

**मंडप**–पु. लतागृह.–पु. विश्रामस्थान, मांडव,

**मॅंडरना**–क्रि. अ. घेरून येणें, भरून येणें.

**मँडरा(ला)ना**–क्रि. अ. सभोंवतीं उडणें, सभोंवतीं फिरणें.

**मंडल**–वि. वाटोळें. –पु. कुत्रा, मंडोळ (सर्प वि.), चक्राकार व्यूह, घेर, वर्तुळ, वलय, बिंब, मंडलाकार गति, समुदाय, मंतरलेली जागा, ग्रहकक्षा, मंडल (घोडा फिरण्याचें), सोंगट्यांचा पट, देश, राष्ट्र, भोंवतालचा प्रांत, आसपासचे राजे, गुडघे लववून वेध करणें, ऋग्वेद, खंड, गजकर्ण, नायटा, लाडू, परिधि, खळें.

**मंडलक**–पु. चक्रव्यूह, आरसा.

**मंडली**–स्त्री. वर्तुळ, समूह, दुर्वा, कोरफड, वाटोळें फिरणें, गुळवेल, समाज, सभा, भजनमंडळी. –वि. गरगर फिरणारा (वारा). –पु. महासर्प, घोणस, प्रांताधिकारी, केंसाळ मांजर, कुत्रा, रंग बदलणारा सरडा, सूर्य, वड.

**मंडलीक**–पु. मांडलीक, बारा राजांचा

**मंडवा**–पु. मांडव, मंडप. [अधिपति.

**मंडार**–पु. करंडा, पेटारा, खड्डा.

**मंडित**–वि. सजविलेला, पसरलेला, भरलेला.

**मंडी**–पु. मोठा बाजार.

**मँडुआ**–पु. नाचणी.

**मंत्र**–पु. वेद संहिता, मांत्रिक, गारुड्याचा मंत्र, देवस्तुतिवाक्य, बोलणें, सल्लामसलत, खलबत, युक्ति, उपाय, गुप्त गोष्ट.

**मंतव्य**–पु. हेतु, मनीषा, अभिप्राय, मत.

**मंत्रणा**–स्त्री. सल्ला, राजकार्य विचार, खलबत.

**मंत्रराज**–पु. रामनाम, मंत्रांचा राजा.

**मंत्री**–पु. प्रधान, आमात्य, न्यायाधीश.

**मंथ**–पु. घुसळणें, मंथन, घर्षण, नाश, वध, रवी, सूर्य, सातु, पीठ (जव, गहूं इत्यादिचें).

**मंथन**–पु. रवी, ताक करण्याचें भांडें, घुसळणें, तुडवणें, हालवणें, वध, चर्चा, वाटाघाट, उहापोह.

**मंथर**–वि. हळू चालणारा, मूर्ख, स्थूल, अवाढव्य, वांकडा, खोल (शब्द), सूचक, नीच, हलका–.पु. कोठी, खजीना, रवी, प्रतिबंध, फळ, कुसुंबा.

**मंथिनी**, **मंथनी**–स्त्री. रवी. [वीर्य, रेत.

**मंथी**–वि. घुसळणारा, क्लेशदायक.–पु.

**मंद**–वि. हळू, सावकाश, बेफिकीर, मूर्ख, मठ्ठ, खोल (शब्द), सौम्य, मृदु, अल्प, कमजोर, क्षीण, दुर्दैवी, आळशी, रोगी झिंगलेला, स्वच्छंदी, स्वतंत्र, निर्विकार, दुष्ट, प्रत्यय (जसें–दौलतमंद–धनवान).–पु. शनिग्रह, यम, गजभेद, प्रलय.–अ. हळुहळु, सौम्यपणें, थोडें इ.

**मंदता**–स्त्री. सुस्ती, आळस, अल्पत्व.

**मंदत्व**–पु. सुस्ती, आळस, अल्पत्व.

**मंदर**–वि. मंद, स्थूल.–पु. स्वर्ग, आरसा,

गळयांत घालणें,वाद्याला चामडें बसवणें.
**मढ़वाना**–क्रि. स. मढवून घेणें.
**मढ़ाई**–स्त्री. मढविण्याचें काम किंवा मजुरी.
**मढ़ी**–स्त्री. लहानसा मठ,झोंपडी, लहान घर.
**मणि**–स्त्री. श्रेष्ठ व्यक्ति, रत्न, मणि, स्फटिक, पाण्याचें मडकें, लोहचुंबक, शिश्नाग्र, शेळीचा माने खालचा स्तन, कांच व तुलसी काष्ठ. इ. चा सच्छिद्र वाटोळा पदार्थ, पुरुषांचें रेत.
**मणिबंध**–पु. मनगट, रत्न जडविणें.
**मणी**–पु. साप. –स्त्री. पाहा 'मणि'.
**मतंग**–पु. हत्ती, त्रिशंकु राजा ,ढग.
**मत**–अ. नको, नाहीं.-पु. मत, धर्म, आशय, पंथ, पसंती, संमति, हेतु, उद्देश, ज्ञान, सल्ला. –वि. सन्माननीय, सत्कृत्य, अभिप्रेत, सम्मत, मान्य.
**मतन**–पु. मध्यभाग, टीका करण्यायोग्य ग्रंथ, पृष्ठभाग. –वि. मजबूत. [ माजणें.
**मतना**–क्रि. अ. मत बनविणें, उन्मत्त होणें,
**मतबख़**–पु. स्वयंपाकघर.
**मतबा**–पु. मुद्रणालय, छापखाना.
**मतब्ब**–पु. दवाखाना.
**मतरिया**–स्त्री. आई, माता. –वि. मंत्री, मंत्रानें प्रभावित झालेला.
**मतरूक**–वि. त्याग केलेलें.
**मतलब**–पु. तात्पर्य, आशय, अर्थ, स्वार्थ, विचार, हेतु, संबंध.
**मतलबी**–वि. स्वार्थी, आपलपोटया.
**मतला**–पु. पूर्व दिशा, गजल काव्याचें आरं- [भीचें दोन चरण.
**मतली**–स्त्री. मळमळ.
**मतवार-रा-ला**–वि. मदोन्मत्त, नशेंत चूर, झिंगलेला, वेडा, उन्माद झालेला.
**मतवारे**–वि. पाहा, 'मतवार.'
**मता**–पु. सम्पात्ति, मत. –स्त्री. बुद्धि.
**मतसर, मत्सर**–पु. द्वेष, राग.
**मताधिकार**–पु. मत देण्याचा अधिकार.
**मतानत**–स्त्री. दृढता, मजबूती.
**मतालिब**–पु. 'मतलब'चें अ. वचन.
**मतावलंबी**–पु. विशिष्ट मताचा किंवा संप्रदायाचा.
**मति**–अ. समान, सदृश, तुल्य.–स्त्री. बुद्धि, संमति, मन, कल्पना, विचार, उद्देश, निश्चय, इच्छा, आदर, प्राण, मनोवृत्ति, मन:शक्ति, आशीर्वाद.
**मतिमंत**–वि. बुद्धिमान.
**मतीन**–वि. दृढ, पक्का, मजबूत.
**मतीरा**–पु. टरबूज.
**मत्कुण**–पु. ढेंकुण, पिसू, सुळा नसलेला हत्ती, दाढी मिशा नसलेला पुरुष, टोणगा, माड.–स्त्री. केशरहित योनि.
**मतेई**–स्त्री. सावत्र आई.
**मत्त**–वि. मदयुक्त (हत्ती), मस्त, माजलेला, उन्मत्त,प्रसन्न.–स्त्री. मात्रा, मद्य. –पु. दारूबाज, वेडा, मस्तहत्ती, कोकिळ, टोणगा, घोडा.
**मत्था**–पु. कपाळ, माथा.
**मत्था टेकना**–क्रि. स. नमस्कार करणें.
**मथना**–क्रि. स. घुसळणें, एक जीव करणें, कालवणें, उध्वस्त करणें, शोध लावणें, एखादी गोष्ट पुन्हां पुन्हां करणें.–पु. रवी. [ घुसळण्याची क्रिया.
**मथनियाँ, मथनी**–स्त्री. ताकाचा डेरा,
**मथानी**–स्त्री. रवी.
**मथानी पढ़ना या बहना**–खळबळ उडणें.
**मथौरा**–पु. ओबडधोबड रंधा.

**मध्य**–पु. माथें.
**मद**–स्त्री. खातें, विभाग.–पु. हर्ष, हत्तीचा मद, वीर्य, कस्तूरी, मद्य, इच्छा, नशा, उन्मत्तपणा, गर्व.–वि. मस्त.
**मदक**–स्त्री. अफूच्या सत्त्वापासून बनलेला एक मादक पदार्थ.
**मदकची**–वि. मदक पिणारा. [मस्त हत्ती.
**मदकल**–वि. उन्मत्त, मस्त, मदोन्मत्त.–पु.
**मदखला**–वि. दाखल, जमा केलेला.
**मदखूला**–स्त्री. रखेली स्त्री.
**मदगल**–वि· उन्मत्त, मस्त, मदोन्मत्त.
**मदद**–स्त्री. मदत, मदतगार मनुष्य.
**मददगार**–वि. मदतनीस,
**मदन**–पु. कामदेव, कामक्रीडा, भुंगा, मैना, प्रेम, एक छंद, मेण, कामेच्छा, वसंत, धोत्रा.–वि. धुंद करणारें.
**मदन चतुर्दशी**–स्त्री. चैत्र शु. १४.
**मदफन**–पु. स्मशान, कब्रिस्तान.
**मदरसा**–पु. शाळा.
**मद व जजर**–पु. भरती ओहोटी.
**मदह**–स्त्री. प्रशंसा. [हतबुद्ध.
**मदहोश**–वि. निशेंत चूर असलेला, मस्त,
**मदाखिल**–स्त्री. प्रवेशद्वार, उत्पादन.
**मदाखिलत**–स्त्री. लक्ष देणें, अधिकार चालविणें.
**मदार**–पु. हत्ती, रानडुक्कर, कामुक, ठक, धूर्त, सुगंधी, द्रव्य. –वि. रुईचें झाड, भ्रमण मार्ग, आधार, मुसलमानांच्या एका पिराचें नांव.
**मदारात**–स्त्री. आदर सत्कार.
**मदारी**–पु. गारुडी, मदार नामक पिराचा
**मदिया**–स्त्री. मादी. [अनुयायी.
**मदिरा**–स्त्री. दारु, एक वृत्त, खंजनपक्षी.
**मदिना**–पु. नगर, अरबस्तानांतील एक
**मदीला**–वि. मादक. [शहर.
**मदोदै**–स्त्री. मंदोदरी, रावणपत्नी.
**मद्देनजर**–अ. नजरे समोर, लक्ष देऊन.
**मद्धे**–अ. मध्यें, विषयांत, लेखांत.
**मद्रसा**–पु. मदरसा.
**मध-धि**–पु. मध्य.–अ. आंत.
**मधिम**–वि. मध्यम.
**मधु**–पु.-पाणी, मकरंद, मध, वसंत, दारू.– स्त्री. मधमाशी.–वि. गोड, स्वादिष्ट.
**मधुकर**–पु. भुंगा.
**मधुप**–पु. भुंगा, उद्धव. [ऋत्विज.
**मधुपर्क**–पु. पंचामृत, वर, आतिथ्य,
**मधुमक्खी, मधु मक्षिका**.–स्त्री. मधमाशी.
**मधुर**–वि. मधुयुक्त, गोड, मोहक, रम्य, प्रिय.-पु. माधुर्य, पावटा, चवळी, गहूं, तांबडा ऊंस, तांबडा शेवगा,बार, मदन काकडी, आंबा, बदाम, गूळ, चिमणा, कथील, काकवी. –स्त्री. बडीशेप, ममुरा, खजूरी, शिंदी, ज्येष्टीमध, शतावरी.
**मधुरता, मधुराई**–स्त्री. सुंदरता, कोमलता,
**मधुरेण**–गोडीगुलाबीनें. [गोडी.
**मध्य**–वि. मध्य भागाचा, मधला, मध्यम, सामान्य, न्याय्य, तिऱ्हाईत, अधम.–पु. मध्यभाग, कंबर, पोट, गाभा, अंतरता, सतराव्या स्थानाची संख्या.
**मध्या**–स्त्री. मधलें बोट, प्रौढ कन्या.
**मध्यदिन, मध्यदिवस**–मध्यान्ह. –दुपार, १६ तें २० घटका हा काळ.
**मध्यम**–वि. मधला, सामान्य, मध्यम प्रतीचा, निःपक्षपाती, मुख्य.–पु. सप्तस्वरांपैकीं चौथा, गुच्छांतलें मधलें फूल,

—क्रि. अ. दबले जाणें, दबणें. [पसरणें.
**मचना**—क्रि. अ. माजणें, गडबड होणें,
**मचमचाना**—क्रि. अ. गडबडणें.
**मचल**—स्त्री. हट्ट.
**मचलना**—क्रि. अ. हट्ट करणें, अडून बसणें.
**मचला**—वि. ऐन बोलण्याच्या वेळीं जाणून बुजून गप्प राहणारा, मळमळ करविणारी (वस्तु).
**मचलाना**—क्रि. अ. हट्ट करणें, मळमळणें. —क्रि. स. हट्ट करण्यास प्रवृत्त होणें.
**मचवा**—पु. पलंग, चौकीचा पाया.
**मचान**—स्त्री. उंच बैठक, माचा, माचाळ.
**मचाना**— क्रि. स. माजविणें, गडबड करणें.
**मचिया**—स्त्री. लहान पलंग
**मचैया**—वि. माजविणारा.
**मच्छरता,मत्सरत**—स्त्री. मत्सर, असूया.
**मच्छी**—स्त्री माशी.
**मछरी-ली**—स्त्री. मासा, मासळी.
**मछुआ-वा, मछुवाहा**—पु.मासे धरणारा कोळी, नावाडी.
**मजकूर**—वि. वर्तमान.—पु. हकीकत, पत्रांतलें
**मजदूर**—पु. मजूर, हमाल. [वर्तमान.
**मजदूरी**—स्त्री. मजुरी, मजुरीचे पैसे.
**मजना**—क्रि. अ. निमग्न होणें, तल्लीन होणें, अनुरक्त होणें.
**मजनूँ**—वि. प्रेमवेडा, सडपातळ बांध्याचा.
**मजबूत**—वि. दृढ, बलवान.
**मजबूर**—वि. लाचार, विवश.
**मजबूरन**—अ. अनिच्छापूर्वक, निरुपायास्तव.
**मजबूरी**—स्त्री. लाचारी, विवशता, नाइलाज.
**मजमा**—पु. लोकांची गर्दी, दाटी, जमाव, समुदाय.
**मजमूआ**—पु. संग्रह.—वि. एकत्र केलेलें.
**मजमूई**—वि. सर्व.
**मजमून**—पु. मजकूर, निबंध, विषय.
**मजरा**—पु. शेत, गांव, लहान गांव.
**मजरूआ**—वि. नांगरलेलें व पेरलेलें (शेत).
**मजरूह**—वि. घायाळ, विरहानें व्याकुळ
**मजल**—स्त्री. पाहा 'मंजिल' [झालेला.
**मजलिस**—स्त्री. सभा, बैठक, समारंभ, नाचगाण्याची बैठक, मैफल, समिती.
**मजलूम**—वि. जुलुमानें त्रासलेला, अत्याचार पीडित.
**मजहका**—पु. थट्टा, हंसण्यासारखी गोष्ट.
**मजहब**—वि. धर्म, धार्मिक संप्रदाय, पंथ.
**मजहबी**—वि. धार्मिक,सांप्रदायिक.—पु. भंगी.
**मजहूल**—वि. आळशी, थकलेला, अप्रसिद्ध.
**मजा**—पु. मौज, आनंद, थट्टा, स्वाद.
**मजा चखाना**—हात दाखविणें, केलेल्या अपराधाबद्दल शिक्षा देणें. [क्रिया.
**मजाक**—पु. थट्टामस्करी, रुचि, चाखण्याची
**मजाकन**—अ. हंसत हंसत, थट्टेनें. [तीचें.
**मजाकिया**—वि. विनोदी, थट्टेखोर, गम-
**मजाज**—पु. अधिकार.—वि. कायद्यानें अधिकार मिळालेला.
**मजाजन**—अ. नियमाप्रमाणें.
**मजाजी**—वि. कृत्रिम, संसारिक.
**मजार**—पु. समाधि, कबर, थडगें.
**मजारी**—स्त्री. मांजर.
**मजाल**—स्त्री. सामर्थ्य, योग्यता.
**मजाहिब**—पु. 'मजहब'चें अ. वचन.
**मजीठ**—स्त्री. एक वनस्पति, हिच्यापासून लाल रंग निघतो, मंजिष्ट.
**मजीठी**—वि. लाल रंगाचें.
**मजीद**—पु. अधिकता, विपुलता, मोठा, श्रेष्ठ.—वि. वाढविलेला, अधिक.

**मजीद**–वि. पवित्र व पूज्य, मोठा.– [ पु. कुराण.
**मजीर**–स्त्री. मंजिरी.
**मंजीरा**–पु. टाळ (लहान).
**मजूर**–पु. मजूर, हमाल.
**मज्ज**–स्त्री. मज्जा, हाडांतील धातु.
**मज्जन**–पु. बुडी, दंतमंजन, स्नान, हाडांच्या नळींतील तुपासारखा पदार्थ, मगज, गाभा. [ दंतमंजन करणें.
**मज्जना**–क्रि. अ. बुडी मारणें, बुडणें,
**मज्जा**–स्त्री. मेंदू, मगज, सत्व, गीर.
**मझ-झ**–अ. मध्यें, मधोमध. [ मध्य.
**मझधार**–स्त्री. नदीची मध्यधारा, कार्याचा
**मझल, मझोला**–वि. मधला, मध्यम आकाराचा. [ क्रि. अ. प्रवेश होणें.
**मझाना, मझावना**–क्रि. स. प्रवेश करविणें.–
**मझार**–अ. मध्यभागीं.
**मझारि-री**–स्त्री. मध्यें, आंत.
**मझियाना**–क्रि. अ. वल्हविणें, मधून निघणें.
**मझियारा**–वि. मधील, मधला.
मझोला–वि. मधला, मध्यम आकाराचा.
**मझोली**–स्त्री. एक प्रकारची बैलगाडी.
**मट**–पु. मडकें, घडा. [ चाल, गति.
**मटक**–स्त्री. नखरा, हावभाव, नखरेल
**मटकना**–क्रि. अ. हावभाव करीत चालणें, अंगविक्षेप करणें, हावभाव दाखविणें, मुरडणें, परत फिरणें, विचलित होणें.
**मटका**–पु. मडकें. [ करणें.
**मटकाना**–क्रि. अ. नखरे करणें, हावभाव
**मटकी**–स्त्री. लहान मडकें, नखरा.
**मटकीला**–वि. नखरेबाज.
**मटकौअ(व)ल**–स्त्री. नखरा, हावभाव.
**मटमंगरा**–पु. एक लग्नविधि.
**मटमैला**–वि. मळखाऊ, खाकी.
**मटर**–पु. वाटाणा, मटार.
**मटरगश्त**–पु. फेरफटका. [ नष्टप्राय.
**मटिया मसान**–वि. चुथडा झालेला,
**मटिया मेट**–वि. मातींत मिसळलेला.
**मटियारा**–वि. पुष्कळ माती असलेलें,
**मटियाल**–वि. मळकट. [ मळखाऊ, खाकी.
**मटुका**–पु. मडकें.
**मटुकी**–स्त्री. मडकें.
**मट्टी**–स्त्री. माती.
**मट्टी खराब करना**–नष्ट होणें.
**मट्टी खाना**–मृतमांस खाणें, त्रास देणें.
**मट्टी डालना**–मिटविणें, बुजविणें. [ भांडणें.
**मट्टी पर लड़ना**–किरकोळ गोष्टीसाठीं
**मठ**–पु. निवासस्थान, साधूंचे राहण्याचे घर, पाठशाळा, देऊळ, बैलगाडी.
**मठिका**–स्त्री. लहान मठ, लहान घर.
**मठिया**–स्त्री. झोंपडी, मठ, कांशाची बांगडी.
**मठी**–स्त्री. लहान मठ. –पु. मठाचा महंत.
**मठोर**–स्त्री. दहीं घुसळण्याचें मोठें मडकें.
**मठ्ठर**–वि. मठ्ठ, आळशी.
**मठ्ठा**–पु. ताक. –वि. कुंद, मठ्ठ.
**मठ्ठा डालना**–उध्वस्त करणें. [ माठ.
**मठ्ठी**–स्त्री. मटक्यांच्या डाळीची पुरी,
**मड़ई**–स्त्री. झोंपडी, लहान मंडप.
**मड़क**–स्त्री. रहस्य, गुपित.
**मड़वा**–पु. मांडव.
**मड़हा, मढ़ा**–पु. माजघर.
**मड़ाड़**–पु. कच्चा तलाव.
**मडियाना**–क्रि. स. चिकटविणें.
**मडुआ**–पु. नाचणी.
**मड़ैया**–स्त्री. झोंपडी, मांडव.
**मढ़**–अडेलतट्टू, हट्टी.
**मढ़ना**–क्रि. स. मढविणें, माथीं मारणें,

**मनसूबा**–पु. युक्ति, विचार.
**मनसूबा बाँधना**–युक्ति योजणें.
**मफ़हूम**–पु. मुद्दा, वस्तु.–वि. समजलेला.
**ममनून**–वि. कृतज्ञ, आभारी.
**ममियाना**–क्रि. अ. बकरीचें बें बें करणें.
**ममियाससुर**– पु. मामेसासरा.
**ममियासास**–स्त्री. मामे सासू. [आश्रयस्थान.
**ममियाउर, ममियौरा**–पु. मामाचें घर,
**ममेराभाई**–पु. मामे भाऊ.
**मम्बा**–पु. झरा, उगम, निघण्याची जागा.
**मयंक**–पु. चंद्र.
**मयंद**–पु. सिंह, वाघ.
**मय**–स्त्री. दारू.–प्रत्य. सहित. –पु. एक दानव ( हा उत्तम शिल्पकार होता ), मेस्किको देशाचे प्राचीन लोक, घोडा,
**मयखाना**–पु. दारूचा गुत्ता. [खच्चर, वैद्य.
**मयखोर**–वि. दारूडचा.
**मयगल**–पु. मत्त हत्ती.
**मयन**–पु. कामदेव. [पार्वतीची आई, मैना.
**मयना**–स्त्री. हिमालयाच्या पत्नीचे नांव,
**मयस्सर**–वि. उपलब्ध, सुलभ.
**मया**–स्त्री. मायाजाळ, जग, प्रेमपाश.
**मयार**–वि. दयाळु. –स्त्री. आढें.
**मयारी**–स्त्री. तुळई.
**मयूख**–पु. किरण, प्रकाश, ज्वाला, शंकु,
**मयूष**–पु. अमृत, किरण. [शोभा.
**मय्या**–स्त्री. आई.
**मर**–पु. मृत्युलोक, विष. [इषारा, मृत्यु.
**मरक**–पु. महामारी, इ. सांथ. –स्त्री.
**मरकज़**–पु. केंद्र, मध्यस्थान, उर्दू लिपींत कांहीं अक्षरांवर असणारी लहान तिरपी
**मरकत**–पु. पाचू, पन्ना. [रेघ.
**मरकद**–पु. कबर, शयनागार. [कचरणें.
**मरकना**–क्रि. अ. भारानें तुटणें, मुरकणें,
**मरकहा, मरखना**–वि. मरतुकडा, मारका.
**मरकाना**–क्रि. स. फोडणें, चरा पाडणें.
**मरक़ूम, मरकूमा**–वि. लिहिलेलें.
**मरगजा**–वि. चोळामोळा झालेलें.
**मरगल**–पु. भरलेलें वांगें.
**मरग़ूब**–वि. प्रिय, सुंदर, रुचिकर.
**मरग़ोल–ला**–पु. गाणाऱ्या पक्ष्यांचा मधुर स्वर, गाण्यांतील तान.
**मरघट**–पु. स्मशान. –वि. वाईट आकृतीचा, नेहमीं खिन्न राहणारा.
**मरज, मर्ज**–पु. रोग, पीडा, खोड.
**मरजाद–दा**–स्त्री. सीमा, प्रतिष्ठा, प्रणालिका, आदर.
**मरजिया**–वि. काळाच्या दाढेंतून वांचलेला, मरणासन्न, प्राण देण्यास तयार झालेला.–पु. समुद्रांतून मोतीं काढणारा.
**मरजी**–स्त्री. मर्जी, इच्छा.
**मरजीनवा**–वि. प्राण देण्यास तयार झालेला, अर्धमेला, मरणासन्न, मरणांतून वांचलेला. –पु. पाणबुडचा.
**मरतबा**–पु. वेळ, पाळी, पदवी.
**मरतूब**–वि. भिजलेला.
**मरद, मर्द**–पु. पुरुष, वीर. [मनुष्यत्व.
**मरदई, मर्दई**–स्त्री. साहस, पराक्रम.
**मरदन, मर्दन**–पु. घासणें, चोळणें, कुटणें, दळणें, नाश करणें, अंग रगडणें.–वि. कुटणारा, चोळणारा, नाश करणारा.
**मरदना, मर्दना**–क्रि. स. चोळणें, मर्दन करणें, विध्वंस करणें, तिंबणें. [धाडस.
**मरदानगी, मरदी**–स्त्री. वीरता, शौर्य,
**मरदाना**–वि. पौरुषी, मर्दानी, वीरोचित.
**मरदूद**–वि. तिरस्कृत, तुच्छ, नीच, अधम.

—पु. एक प्रकारची शिवी.
**मरन, मरण**—पु. मरण, मृत्यु, बचनाग.
**मरनसील**—अ. मरण्यायोग्य.
**मरना**—क्रि.अ. मरणें, हाल अपेष्टा सोसणें, कोमेजणें, शरमिंधें होणें, निरुपयोगी होणें, हरणें, आवेग थांबणें, थंडावणें.
**(किसीपर) मरना**—लुब्ध होणें, फिदा होणें.
**मरना पचना**—क्रि. अ. अति कष्ट करणें, हाल अपेष्टांत दिवस काढणें.
**( बातको ) मरना**—ऐट करणें, प्रतिज्ञा पूर्ण करण्यांत झटणें.
**( बातपर ) मरना**—शब्द राखणें.
**मरना मिटना**—कष्ट करून मरणें.
**मरनी**—स्त्री. मरण, क्लेश, एखाद्याच्या मृत्यूनें त्याच्या नातलगाना होणारें दुःख.
**मरफ़ा**—पु. ढोलकें.
**मरभुक्खा**—वि. उपासमार झालेला, बुभुक्षित, दरिद्री.
**मरम**—पु. मर्म, रहस्य.
**मरमर**—पु. संगमरवर, पाहा 'मर्म'.
**मरमी, मर्मी**—वि. मर्म जाणणारा, तज्ञ.
**मरम्मत**—स्त्री. दुरुस्ती.
**मरम्मत करना**—मार, चोप देणें.
**मरवाना**—क्रि. स. मारविणें.
**मरसिया**—पु. उर्दूतील शोकगीत, मृत्यु शोक, एकाद्या व्यक्तीचें गुणकीर्तन.
**मरहट**—पु. स्मशान.—स्त्री. एक कडधान्य.
**मरहठा**—पु. मराठा.
**मरहबा**—अ. शाबास, वाहवा.
**मरहम**—पु. मलम.
**मरहला**—पु. मजला, विषय.
**मरहूम**—वि. स्वर्गवासी, मेलेला.
**मरात**—स्त्री. स्त्री.
**मरातिब**—पु. घराचा मजला, दर्जा, मान, पद.
**मरायल**—वि. मारखाऊ, निर्बल, सत्त्वहीन.
**मराल**—पु. हंस, बदक, घोडा, हत्ती.
**मरिंद**—पु. मकरंद, भुंगा.
**मरिच**—पु. मिर्ची.
**मरियम**—स्त्री. कुमारी, येशुख्रिस्ताची आई.
**मरियल**—वि. अशक्त, दुबळा, मरतुकडा.
**मरी**—स्त्री. महामारी.
**मरीचिका**—स्त्री. मृगजळ, किरण.
**मरीचियाली**—पु. सूर्य, चंद्र.
**मरीज़**—वि. रोगी.
**मरीना**—पु. लोकरीचें बारीक (पातळ) वस्त्र.
**मरू-रु**—वि. कठीण, दुष्कर, वाळवंटाचे, मारवाडच्या आसपासचा, प्रदेश.
**मरुआ**—पु. मरवा, कडीपाट. [इंद्र, हनुमान.
**मरुत**—पु. वारा, देव, पांढरा मरवा, प्राण,
**मरूथल**—पु. मारवाड, वाळवंट.
**मरुभूमि**—स्त्री. वाळवंट.
**मरुरना**—क्रि. अ. मुरडणें.
**मरूरा**—पु. मुरडा ( पोटांतील ).
**मरोड़**—पु. पिरगळा, मुरडा, पीळ, दुःख, मुरड, क्रोध, गर्व.
**मरोड़ करना**—कपट करणें, मुरड घालून बोलणें, गर्व करणें.
**मरोड़की बात**—कपटाची गोष्ट, गर्वाची गोष्ट.
**मरोड़ खाना**—हेलपाटे घालणें, मुरड येणें, गोंधळांत पडणें.
**मरोड़ना**—क्रि. स. मुरगळणें, मुरडणें, मुरगाळून मारून टाकणें.
**(अंग) मरोड़ना**—आळे पिळे देणें.
**(आँख) मरोड़ना**—डोळा मारणें, इशारा करणें, नाक मुरडणें.
**(हाथ) मरोड़ना**—पस्तावणें, मनगट चावणें.
**मरोड़फली**—स्त्री. मुरुडशेंग.
**मरोड़ा**—पु. पीळ, मुरड, मुरडा.

मध्य भाग, कबंर, मध्यदेश, या नावांचा राग, एक प्रकारचा नायक, तू तुम्ही ह्या शब्दाचा पुरुष.

**मध्यमा**–स्त्री. न्हाण आलेली मुलगी, मधलें बोट, हृदयस्थ वाणी भेद (परा, पशांती, परा आणि वैखरी हे जे वाणीचे चार भेद त्यांतील तिसरा), एक प्रकारची नायिका.

**मध्यवित**–वि. मध्यम वर्गातील.

**मध्यस्थ**–वि. मधला, मध्यभागचा, तिन्हाईत, निःपक्षपाती, उदासीन, तटस्थ, नपुंसक, सामान्य, पंच, लवाद.

**मन, मनस्**–पु. मन, सुखदुःखादि ज्ञानाचें इंद्रिय, सदसद्विवेक बुद्धि, कल्पना, विचार, संकल्प, विकल्पात्मक अंतःकरण वृत्ति, हेतु, उद्देश, इच्छा, स्वभाव, शौर्य, पराक्रम, ध्यान, मनशील.

**मन आना**–रुचणें, प्रेम होणें. [ जोडणें.

**(किसीसे) मन अटकना या उलझना**–प्रेम

**मनकी करना**–आपल्या इच्छेप्रमाणें करणें.

**मनके लड्डू खाना**–मनांत मांडें खाणें.

**मन टूटना**–हताश होणें.

**मन चलना**–इच्छा होणें, मन चळणें.

**मन टटोलना**–मनाचा ठाव घेणें.

**मन तोड़ना या हारना**–निरुत्साही होणें.

**मन देखना**–मन पाहणें.

**(किसीपर) मन धरना**–एकाग्रता करणें.

**मन पाना**–मनांतील गूढ जाणणें.

**मन बढ़ना**–उत्साहित होणें.

**मनमें बसना**–मनांत भरणें.

**मन बहलाना**–मन गुंतविणें, करमणूक करून

**मन बूझना**–मनांतलें ओळखणें. [ घेणें.

**मन भरना**–विश्वास बसणें, संतोष होणें.

**मन मोदक से भूख मिटाना**–मनोराज्यांत

**मन हरा होना**–प्रसन्न होणें. [ गर्क होणें.

**मनही मन**–मनांतल्या मनांत.

**मनई**–पु. मनुष्य.

**मनकना**–क्रि. अ. हालणें, डोलणें.

**मनका**–पु. मणका. [ (मारतेसमयीं).

**मनका ढलना या ढलकना**–मान टाकणें

**मनकूला**–वि. स्थावरच्या उलट, जंगम.

**जायदाद मनकूला**–जंगम इस्टेट, गैर मनकूला-स्थावर इस्टेट.

**मनकूहा**–वि. विवाहिता. [ कल्पना.

**मनगढ़ंत**–वि. कपोलकल्पित.–स्त्री. कपोल,

**मनचला**–वि. रसिक, धाडसी, निर्भय.

**मनचाहा**–वि. आवडीचा, पसंतीचा.

**मन चाहा, मनचीता**–वि. विचारांतीं ठरलेलें.

**मनज़र**–पु. दृश्य, देखावा.

**मनजात**–पु. कामदेव.

**मनत–ता**–पु. नवस.

**मनफी**–वि. कमी केलेलें.

**मनभाया**–वि. आवडीचा.

**मनमथ**–पु. कामदेव. [यथेच्छ.

**मनमाना**–वि. मनाजोगता, पसंतीचा, खूप,

**मनमाना घर जाना**–स्वेच्छाचार, आपला

**मनमारे**–वि. खिन्नपणानें. [हात जगन्नाथ.

**मनमु (मो) टाव**–पु. आपसांतील तेढ,

**मनमोदक**–पु. मनांतील मांडे. [बेबनाव.

**मनमौजी**–वि. खुशालचेंडू. [घालविणें.

**मनवाना**–क्रि. स. समजूत घालणें, समजूत

**मनशा**–स्त्री. इच्छा, विचार, हेतु.

**मनसना**–क्रि. स. इच्छा करणें, संकल्प करणें, पाणी सोडणें.

**मनसब**–पु. दर्जा, हुद्दा, काम, अधिकार.

**मनसबदार**–पु. हुद्देदार, अधिकारी.

**मनसहिं**–अ. मनांत, मनानें, मनाला.
**मनसा**–स्त्री. इच्छा, मनोरथ, अभिलाषा, मन, बुद्धि, तात्पर्य. वि.–मनानें उत्पन्न, मनाचा.–अ. मनाकडून.
**मनसाकर**–वि. मनोरथ पूर्ण करणारा.
**मनसाना**–क्रि. अ. लहरींत येणें.–क्रि. स. लहर उत्पन्न करविणें.
**मनसायन**–पु. करमणुकीची जागा.
**मनसि**–अ. मनानें, हृदयानें, मानसिक.
**मनसिज**–पु. कामदेव.
**मनसूख**–वि. अप्रामाणिक ठरलेला, टाकाऊ.
**मनसूबा**–पु. युक्ति, कल्पना, विचार.
**मनसूबा बांधना**–युक्ति योजणें.
**मनस्विता**–स्त्री. लहरीपणा.
**मनहुँ**–अ. जणूं, जसें.
**मनहुं**–अ. जसा.
**मनहूस**–वि. उदार, अशुभ.
**मना**–वि. मनाई केलेला, वर्ज्य, अनुचित.
**मनाक**–ग–वि. थोडा, अल्प.
**मनादि**–स्त्री. दवंडी.
**मनाना**–क्रि. स. स्वीकार करावयास लावणें, खुश करणें, समजूत घालणें, देवाला आळविणें, नवस करणे.
**मनि, मणि**–पु. जवाहिर.
**मनि(णि)यारा**–पु. जवाहिऱ्या.
**मनिहार**–पु. कासार, रत्नहार.
**मनी**–स्त्री. घमेंड, मणि, रत्न, वीर्य.
**मनिषि**–वि. बुद्धिमान.
**मनु**–अ. जणूं.–पु.मनु, विष्णु, अंतःकरण, चौदाची संख्या, मनुष्य, मन, अग्नि, ब्रह्मा, विद्वान.
**मनुआँ–वा**–पु. मन, चित्त, मनुष्य.
**मनुज**–पु. मनुष्य, मनुपासून उत्पन्न.
**मनुजाद**–पु. माणसें खाणारा राक्षस.
**मनुष**–पु. मनुष्य, पति.
**मनुष्य**–पु. माणूस.
**मनुसाई**–स्त्री.पराक्रम,माणुसकी. [शांति.
**मनुहार**–स्त्री. मनधरणी, प्रार्थना, सत्कार,
**मनुहारना**–क्रि. स. खुशामत करणें, विनंति करणें, आदरसत्कार करणें.
**मनुजर**–पु. व्यवस्थापक, म्यानेजर.
**मनों**–अ. जणुं.
**मनोगत**–वि. मनांत असलेलें, गुप्त, अंतस्थ, इच्छिलेला.–पु. इच्छा, अभिप्राय, कामदेव.
**मनोज, मनोभव**–पु. कामदेव. वि.–मनापासून उभ्दवलेलें. [मनपसंत.
**मनोनीत**–वि. निवडून आलेला, पसंतीचा,
**मनोनीत सभापति**–पु. निवडून आलेला अध्यक्ष. [खोटेपणा.
**मनोमल**–पु. मनाचा विकार, मनाचा
**मनोरंजन**–पु. मनाला प्रसन्न करण्याची
**मनोरथ**–पु. इच्छा, अभिलाषा. [क्रिया.
**मनोरम**–वि. सुंदर, रम्य.–पु. हंस.–स्त्री. गोरोचन.
**मनोरा**–पु. भिंतीवर पूजा करण्याकरितां शेणानें काढतात तीं चित्रें (दिवाळी-
**मनोविज्ञान**–पु. मानसशास्त्र. [नंतर).
**मनोहर**–वि. रम्य, मोहक. –पु. जाई, जुई, कुंद, सोनें, एकछंद, एकराग. [करणें.
**मनौति**–स्त्री. नवस, असंतुष्टाला संतुष्ट
**मनौति उतारना या चढ़ाना**–नवस फेडणें.
**मनौति मानना**–नवस करणें.
**मन्नत**–स्त्री. नवस.
**मनसब**–पु. हुद्दा.
**मनसूब**–वि. संबंध ठेवलेला.

**मरोड़ी**–स्त्री. पीळ.
**मरोड़ी करना**–ओढाताण करणें.
**मरोरना**–क्रि. स. पाहा 'मरोड़ना'.
**मर्कत**–पु. पाच (रत्न).
**मर्ग**–पु. मृत्यु.
**मर्ग़ज़ार**–पु. हिरवेंगार मैदान.
**मर्ज़**–पु. रोग, आजार.
**मर्ज़ी**–स्त्री. इच्छा, आज्ञा.
**मर्तबा**–पु. पदवी, वेळा.
**मर्तबान**–पु. चिनी मातीची बरणी.
**मर्द**–पु. पुरुष, धाडसी पुरुष, पति, शूर योद्धा. [सूचक शब्द.
**मर्दक**–पु. एखाद्या माणसाबद्दल तिरस्कार
**मर्दुआ**–वि. यःकश्चित्, मेला (शिवी).
**मर्दुम**–पु. मनुष्य.
**मर्दुमशुमारी**–स्त्री. खाने सुमारी, जनसंख्या.
**मर्दुमी**–स्त्री. मर्दुमकी, शौर्य.
**मर्म**–पु. शरीराचा एखादा नाजूक भाग, रहस्य, स्वरूप, संधिस्थान.
**मर्मर**–पु. संगमरवर, झुळझुळ शब्द, करकर
**मर्मवाक्य**–पु. रहस्य, [आवाज.
**मर्मान्तिक**–वि. मर्मभेदी.
**मर्मी**–वि. तत्त्वज्ञ, मर्मज्ञ.
**मर्य्यादा**–स्त्री. सीमा, तीर, तट, नियम, शिष्टाचार, करार, सदाचार, धर्म.
**मलंग**–पु. मुसलमान साधु.
**मल**–वि. घाणेरडा, लोभी, नास्तिक. –पु. घाण, गाळ, गंज, विष्ठा, मूत्र, घाम इ. देहमल, अशुद्धता, पाप, कापूर,
**मलऊन**–वि. निंद्य, शापित. [समुद्रफेस.
**मलक**–पु. देवदूत.
**मलका**–स्त्री. महाराणी.–पु. प्रतिभा, दक्षता.
**मलखम**–पु. मलखांब, मलखांबाचा व्यायाम. [संयुक्त प्रांतांतील रजपूत.
**मलखाना**–पु. मुसलमानाचेंहिंदूझालेलेपश्चिम
**मलगजा**–वि. घाणेरडा, मंद. –पु. पीठ लावून तळलेलें वांग्याचें तुकडे.
**मलगिरी**–पु. तपकिरी रंग.
**मलगोबा**–पु. मळ, पू, केरकचरा, दहीं घालून
**मलजूम**–वि. आवश्यक. [शिजविलेली डाळ.
**मलना**–क्रि. स. घांसणें, रगडणें, चोळणें, चुरगळणें, दाबणें. [वचन.
**मलफूज़**–पु. महात्म्याचें किंवा धर्मगुरूचें
**मलबा**–पु. इमारत पडल्यावर सांचलेल्या दगड, विटा, चुना इ. चा ढीग, केरकचरा.
**मलवाना**–क्रि. स. चोळून घेणें, चाळविणें.
**मलबूस**–पु. पोशाख. –वि. पोशाख केलेला.
**मलमलाना**–क्रि. स. वारंवार, स्पर्श करणें, पस्तावणें, वारंवार उघडणें व झांकणें.
**मलमास**–पु. अधिकमास. [पांढरें चंदन.
**मलय**–पु. बाग, नंदनवन, मलबार प्रांत,
**मलहम**–पु. मलम.
**मलाई**–स्त्री. दुधावरील साय, सार, तत्त्व, –स्त्री. चोळण्याची क्रिया किंवा मजूरी.
**मलाकर**–पु. घाणीचा ढीग.
**मलाका**–स्त्री. कामुक स्त्री, दूती, हत्तीण.
**मलान, म्लान**–वि. म्लान, उदास.
**मलामत**–स्त्री. झिडकारणें, धुडकावणें,
**मलार**–पु. मल्हार राग. [घाण, दूषित अंश.
**मलार कीं सूझना**–विनोदाची लहर येणें.
**मलार गाना**–आनंदानें बोलणें.
**मलाल**–पु. दुःख, उद्विग्नता, उदासीनता.
**मलाह**–पु. धीवर, नावाडी.
**मलाहत**–स्त्री. सांवळेपणा, चेहऱ्यावरील
**मलिंद**–पु. भुंगा. [आभा, कांति,
**मलिक**–पु. अधिपति, राजा.

**मलिच्छ**–वि. नीच, मांस भक्षक, म्लेंच्छ.
**मलिन**–वि. अशुद्ध, वाईट, घाणेरडा, दूषित, काळे, निस्तेज.–पु. कृष्ण पक्ष, मळकट वस्त्र, पाप, दोष, ताक, टाकणखार.
**मलिनमुख**–वि. दुष्ट, क्रूर.–पु. अग्नि, [पिशाच, प्रेत, वानर.
**मलिनांबु**–पु. शाई.
**मलिनास्य**–वि. नीच निर्दय.
**मलिना, मलिनी**–स्त्री. रजस्वला
**मलिनाना**–क्रि. स. मळणें.
**मलिया**–स्त्री. लहान माळ, आंवळ तोंडाचें [मडकें, फेरा.
**मलियामेट**–पु. धूळधाण.
**मलीदा**–पु. मऊ लोकरीचें कापड, चुरमा.
**मलूल**–वि. दुःखी, खिन्न, आजारी, थकलेला
**मलैया**–स्त्री. मडकें. [प्रबल इच्छा.
**मलोला**–पु. मनोव्यथा, दुःख, आतुरता,
**मलोले आना या खाना**–दुःख वाटणें, दुःख साहणें.
**मल्ल**–वि. बलवान, उत्कृष्ट.–पु. पैलवान, पेला, गाल, कपाळाची करटी, व्रात्य क्षत्रिय व क्षत्रियांची संतति, मत्स्य.–वि. स्त्री.–स्त्री. मोगरी, उटणें.
**मल्लाह**–पु. नावाडी, कोळी.
**मल्लू**–पु. वानर.
**मल्हारना**–क्रि. स. गोंजारणें, लाड करणें.
**मवक्किल**–पु. अशील. [पगार वगैरे.
**मवाजिब**–पु. ठराविक वेळीं मिळणारी वस्तु,
**मवाज़ी**–वि. सर्व, प्रायः, बरोबर.–पु. जोड.
**मवाद**–पु.–पू, घाण.
**मवास**–पु.–आश्रयस्थान, किल्ला.
**मवास करना**–निवास करणें.
**मवासी**–स्त्री. लहान किल्ला.–पु. किल्ले-[दार, पुढारी.
**मवेशी**–पु. गुरेंढोरें.
**मवेशीखाना**–पु. गोठा.

**मशक**–पु. मच्छर, डांस, मस, पखाल, गांधीलमाशी, बारीक पुरळ.
**मशकहरी**–स्त्री. मच्छरदाणी.
**मशक्कत**–स्त्री. परिश्रम, सक्त मजुरी.
**मशग़ला**–पु. विनोद, मनरंजन.
**मशगूल**–वि. कार्य, मग्न, व्यग्र.
**मशरफ़**–पु. मानाचें स्थान.
**मशरिक़**–पु. पूर्वदिशा.
**मशरू**–पु. एका जातीचें कापड.
**मशरूफ़**–वि. कार्यव्यग्र.
**मशवरत, मशविरा**–पु. सल्ला, कारस्थान.
**मशहरी**–स्त्री. मच्छरदाणी.
**मशहूर**–वि. प्रसिद्ध.
**मशीर**–पु. सल्लागार, संकेत करणारा, [राजाचा मंत्री.
**मश्क़**–पु. अभ्यास.
**मश्कूर**–वि. कृतज्ञ, आभारी.
**मश्शाक़**–वि. कुशल, अभ्यस्त. [जटामांसी.
**मषि**–स्त्री. शाई, काजल, सुरमा, घाण,
**मष्ट**–वि. मुका, उदासीन, संस्कारशून्य, मौन राहणारा.
**मष्ट धरना या रहना**–गप्प राहणें.
**मस**–स्त्री. शाई, मिसरूड.
**मस भींजना**–मिसरूड फुटणें. [क्रिया.
**मसक**–पु. डांस.–स्त्री. परवाल, फाटण्याची
**मसकना**–क्रि. अ. टरकणें, फाटणें.–क्रि. स. [टरकावणें, फाडणें.
**मसकरा**–पु. चेष्टेखोर.
**मसकला**–पु. धार लावण्याचें चाक, धार [लावणें.
**मसकली**–स्त्री. पाहा 'मसकूला.'
**मसका**–पु. लोणी, ताजे तूप, दह्याचें पाणी, मिस्सी.
**मसकीन**–वि. गरीब, सज्जन, दरिद्री, भोळा, [सुशील.
**मसख़रा**–पु. थट्टेखोर, विनोदी.
**मसख़रापन**–पु. थट्टामस्करी.

**मसखरी**–स्त्री. थट्टा मस्करी.
**मसजिद**–स्त्री. मशीद.
**मसदर**–पु. मूळ, क्रियापदाचा धातु.
**मसनद**–स्त्री. लोड, बैठकीची गादी.
**मसना**–क्रि. स. चोळणें, चुरगाळणें.
**मसनूअ**–पु. कौशल्यानें बनविलेली वस्तु.
**मसनूई**–वि. नकली, कृत्रिम.
**मसमुंद**–वि. धकाधकी.
**मसरफ़**–पु. उपयोग, खर्चाची बाब.
**मसरूका**–वि. चोरलेलें.
**मसरूफ़**–वि. कामांत गढलेला, खर्चिलेला.
**मसरूर**–वि. प्रसन्न.
**मसल**–स्त्री. म्हण, दृष्टांत.
**मसलख़**–पु. कत्तलखाना.
**मसलन्**–वि. उदाहरणार्थ.
**मसलना**–क्रि. स. चुरगळणें, दाबणें, तिंबणें.
**मसलहत**–स्त्री. गुप्त मसलत.
**मसलहतन**–अ. विशेष उद्देशानें.
**मसला**–पु. म्हण, विचारणीय विषय.
**मसविदा**–पु. मसुदा, कच्चा खर्डा, उपाय, युक्ति. [पलंग.
**मसहरी**–स्त्री. मच्छरदाणी, मच्छरदाणीचा
**मसा**–पु. मस, मूळव्याधीचा मांसाचा गोळा, [डांस.
**मसाइब**–पु. 'मुसीबत'चें अ. वचन.
**मसान**–पु. स्मशान, भूत पिशाच्च आदि, रणभूमि. [सिद्धी करणें.
**मसान जगाना**–स्मशानांत बसून मंत्र-
**मसाना**–पु. मूत्राशय, स्मशान.
**मसानिया**–पु. डोम, स्मशानवासी.
**मसानी**–स्त्री. पिशाचिनी, डाकीण.
**मसाफ़**–पु. युद्ध, रणक्षेत्र.
**मसाफ़त**–स्त्री. अंतर, श्रम.
**मसाम**–पु. कातडीवरील छिद्र, रोम.
**मसायल**–पु. प्रश्न, समस्या.
**मसालहत**–स्त्री. आपसांत तह करणें, मैत्री.
**मसाला**–पु. साधन सामुग्री, मसाला, चांगल्या गोष्टी, दारूकाम, तेल.
**मसाहत**–स्त्री. जमीन, मापणी, माप.
**मसि, मसी**–स्त्री. पाहा 'मषि.'
**मसिबिंदू**–पु. काजळाचें गालबोट.
**मसियाना**–क्रि. अ. पूर्ण होणें, भरून जाणें.
**मसिहर**–वि. काळोखी लागलेला.–स्त्री. [मशाल.
**मसीत, मसीद**–स्त्री. मशीद.
**मसीना**–स्त्री. अळशी, मका.
**मसीह-हा**–पु. तारक, येशु ख्रिस्त, मित्र, दूरच्या देशांत भ्रमण केलेला.
**मसीहाई**–स्त्री. मसीहाचें पद किंवा कार्य, मसीहा प्रमाणें केलेलीं कामें, प्रेमी- [स्त्रीचा प्रेमळपणा.
**मसू**–स्त्री. अडचण.
**मसू कर के**–मोठ्या कष्टानें.
**मसूड़ा**–पु. हिरडी.
**मसूर**–स्त्री. मसुरीची डाळ.
**मसूरिका**–स्त्री. देवी (रोग).
**मसूस, मसूसन**–स्त्री. मानसिक व्यथा.
**मसू (सो)सना**–क्रि. अ. मनोवेग आवरणें, कुढणें, मुरगळणें, पिळणें.
**मसौदा**–पु. मसुदा, कच्चें टिपण, उपाय.
**मसौदेबाज़**–पु. युक्तिबाज.
**मस्कन**–पु. घर.
**मस्खरा**–पु. थट्टेखोर.
**मस्त**–वि. मदोन्मत्त, नेहमीं आनंदी राहणारा, तरुण, अत्यंत आनंदित.
**मस्तगी**–स्त्री. एक डिंक.
**मस्तक**–पु. डोकें, मेंदू, शेंडा, शिखर.
**मस्ताना**–अ. उन्मत्तासारखा.–क्रि. अ. उन्मत्त होणें.

**मस्तिष्क**–पु. मेंदू, डोकें.
**मस्तूर**–वि. गुप्त, लिहिलेलें उल्लेखिलेलें.
**मस्तूरात**–स्त्री. स्त्रिया, सभ्य स्त्रिया.
**मस्तूल**–पु. डोलकाठी.
**महँ, महँई**–अ. मध्यें.–वि. महान.
**महँगा**–वि. महाग.
**महँगी**–स्त्री. महागाई, दुष्काळ.
**महक**–स्त्री. सुवास, सुगंध.
**महकना**–क्रि. अ. सुवास येणें.
**महकमा**–पु. विभाग.
**महकान**–स्त्री. वास.
**महकीला**–वि. सुगंधित.
**महकूम**–वि. आधीन, आश्रित.
**महज़**–वि. निव्वळ, शुद्ध.–स्त्री. अ. फक्त.
**महज़ क़ैद**–स्त्री. साधी शिक्षा.
**महज़र**–पु. सूचनापत्र (नोटीस).
**महत्**–वि. अधिकता, मोठा, महान.–पु.–ब्रम्ह, मोठेपणा, राज्य.–अ. अत्यंत.
**महता**–पु. गांवचा मुख्य, मुनशी.–स्त्री. अभिमान.
**महताब**–पु. चंद्र. –स्त्री. चांदणें, बागेंतील चबुतरा.
**महताबी**–स्त्री. बागेंतील चबुतरा, एक प्रकारचें दारूकाम.
**महतारी**–स्त्री. आई.
**महती**–स्त्री. नारदाच्या वीणेचें नांव, महत्त्व.
**महदूद**–वि. मर्यादित, व्याख्या केलेला.
**महन**–पु. नाश, मंथन, कलह, एक अस्त्र.–वि. नाश करणारा.
**महना**–क्रि. स. घुसळणें, नष्ट करणें, फिरून फिरून शोध लावणें, एक काम पुष्कळदां करणें.–पु. रवी.
**महफ़िल**–स्त्री. गाण्याची बैठक, उत्सव, सभा.
**महफ़ूज़**–स्त्री. राखून ठेवलेला, निगा ठेवलेला.
**महबस**–पु. तुरुंग.
**महबूब**–पु. प्रियकर.
**महमंत**–वि. मदोन्मत्त.
**महमह**–अ. सुगंधपूर्वक.
**महमहा**–वि. सुगंधित.
**महमहाना**–क्रि. अ. सुवास येणें.
**महमा**–स्त्री. महिमा.
**महमेज़**–स्त्री. जोडयाचा नाल.
**महर**–पु. जमीनदाराकरितां आदरसूचक शब्द, एक प्रकारचा पक्षी, सरदार, भोई.
**महरम**–पु. जिवश्च कंठश्च मित्र, जनानखान्यांत जाण्याची परवानगी असलेले विशिष्ट नातलग, स्नेही, जवळचा नातलग, ज्याचें बरोबर लग्नसंबंध होऊं शकत नाहीं, गौप्य जाणणारा. –स्त्री. स्त्रियांच्या चोळीचा छातीजवळचा भाग.
**महरा**–पु. भोई, सरदार, पुढारी.
**महराना**–पु. भोई लोकांची राहण्याची जागा.
**महराब**–स्त्री. महिराप.
**महरि**–स्त्री. स्त्रियांकरितां आदरसूचक शब्द. (व्रजभाषा), मालकीण, गवळण पक्षी.
**महरी, महरू**–स्त्री. मोलकरीण, कुळंवीण, कुलीन स्त्री.
**महरूम**–वि. वंचित, दुर्दैवी.
**महरेटा**–पु. श्रीकृष्ण.
**महरेटी**–स्त्री. राधा.
**महल**–पु. महाल, अंतःपुर, मोठा दिवाणखाना, वाडा, संधि.
**महलसरा**–स्त्री. अंतःपुर, जनानखाना.
**महली**–पु. अंतःपुरांतील चौकीदार.
**महल्ला**–पु. पेठ, गंज, मोहल्ला.
**महशर**–पु. प्रलयकालचा दिवस.
**महसूल**–पु. महसूल, सारा, भाडें.
**महसूस**–वि. ज्ञात, अनुभवास आलेला.
**महसूसात**–स्त्री. अनुभवानें जाणावयाच्या गोष्टी.
**महा**–वि. श्रेष्ठ, मोठें (समासांत जसें–

महाराज-श्रेष्ठ राजा इ.).
**महाई**–स्त्री. घुसळण्याचें काम किंवा मजुरी.
**महागद**–पु. महारोग. [साधु, भला माणूस.
**महाजन**–पु. श्रीमंत, सावकार, वाणी,
**महाजनी**–स्त्री. सावकारी वह्या लिहिण्याची विशिष्ट लिपि.
**महातम**–पु. पाहा 'महात्म्य'.
**महादेव**–पु. शंकर.
**महान**–वि. श्रेष्ठ, मोठा.
**महानिद्रा**–स्त्री. मृत्यु.
**महानिशा**–स्त्री. मध्यरात्र, कल्पांताची रात्र.
**महापथ**–पु. राजमार्ग, मृत्यु. वाट, बदरी केदारांची यात्रा.
**महापातक**–पु. ब्रह्महत्या, गुरुपत्नीगमन, मद्यपान, चोरी, व हीं पापें करणाऱ्याशीं संगत.
**महापात्र**–पु. अंत्यविधि चालविणारा किंवा त्यानिमित्त दान घेणारा ब्राह्मण, श्रेष्ठ ब्राह्मण.
**महाप्रभु**–पु. इंद्र, शंकर, विष्णु, तपस्वी.
**महाप्रस्थान**–पु. मरणें, मरण्याची दीक्षा घेऊन उत्तरेस हिमालयाकडे जाणें.
**महाप्राण**–पु. जोराचा उच्चार, जोरानें उच्चारण्याचे वर्ण (ख,घ,छ,झ,ठ,ढ,थ, ध,फ,भ,श,ष,स,ह), डोमकावळा.
**महाबत**–पु. भय, भीति. [घोडा, इ. चें.)
**महामांस**–पु. नरमांस, पशुमांस (गाय, हत्ती,
**महामारी**–स्त्री. पटकी, रोगाची सांथ,
**महामोह**–पु. भोगेच्छा. [महाकाली.
**महाय**–वि. मोठें, फार.
**महारत**–स्त्री. निपुणता, अभ्यास.
**महाराज**–पु. फार मोठा राजा, ब्राह्मण, गुरु इ. चें संबोधन.
**महाराष्ट्र**–पु. दक्षिण भारतांतील एक प्रसिद्ध भाग, फार मोठें राष्ट्र.
**महार्घ**–वि. बहुमूल्य, महाग. [गट.
**महाल**–पु. पेठ, गंज, भाग, हिस्सा, गांवांचा
**महावट**–स्त्री. पौष माघांत पडणारा पाऊस, हिवाळ्यांत पडणारा पाऊस.
**महावत**–पु. माहूत. [लावतात तो रंग.
**महावर**–पु. सुवासिनी स्त्रिया पायांना
**महावरी**–पु. लाल रंगाची गोळी.
**महाशय**–पु. महाराज, महात्मा.
**महि**–स्त्री. पृथ्वी. –पु. महिमा.
**महिदेव**–पु. ब्राह्मण.
**महिपाल**–पु. राजा.
**महिमा**–स्त्री. महत्त्व, प्रभाव, अष्टसिद्धींपैकीं एक, रूप, अश्वमेधांतील उखळीसारखें सुवर्णाचें वरुणाचें पात्र.
**महियाँ**–अ. आंत.
**महियाउर**–पु. ताकांत शिजविलेला भात.
**महिला**–स्त्री. स्त्री, उन्मत्त स्त्री, सभ्य स्त्री, वांघाटी, सुगंधी रेणुक बीज. [राक्षस.
**महिष**–पु. रेडा, अभिषिक्त राजा, महिष
**महिषी**–स्त्री. म्हैस, पट्टराणी, राणी, मादी, दासी, व्यभिचारिणी पतिच्या व्यभिचाराचें धन, सैरंध्री. [राज्य, प्रांत.
**मही**–स्त्री. पृथ्वी, जमीन (दगड, विटा इ.),
**महीन**–वि. झिरझिरीत, सूक्ष्म, नाजूक.
**महीना**–पु. महिना, मासिक पगार, वेतन, मासिक धर्म (स्त्रियांचा).
**महीप, महीपति**–पु. राजा, जमीनदार.
**महीसुर**–पु. ब्राह्मण.
**महुं**–अ. आंत, मध्यें.
**महुअर**–पु. पुंगी, जादुगाराचा मंत्र.
**महुआ**–पु. मोहाचें झाड.

**महुवीर**—स्त्री. पुंगी.
**महूख**—पु. ज्येष्ठीमध, मोहाचें झाड.
**महूरत**—पु. मुहूर्त.
**महर**—पु. भांडण, मठ्ठा. [मठ्ठा.
**महेरा**—पु. एक प्रकारचा खाद्य पदार्थ,
**महेरी**—स्त्री. उकडलेली ज्वारी.—वि. अडच-
**महेस**—पु. शंकर, ईश्वर. [णींत टाकणारा.
**महोगनी**—पु. एक मजबूत लाकूड.
**महोच्छव**—पु. महोत्सव.
**महोदय**—पु. महाराज, आधिपत्य, स्वर्ग स्वामी, कान्यकुब्ज देश.
**महोला**—पु. बहाणा, फसवणूक.
**माँ**—स्त्री. आई. —अ. मध्यें.
**माँखना**—क्रि. अ. रागावणें, मनाला लागणें.
**माँखी**—स्त्री. माशी. [क्रिया, आवश्यकता.
**माँग**—स्त्री. भांग (केंसांतील), मागण्याची
**माँग कोख से सुखी रहना**—सौभाग्य व पोरेंबाळें यांसह सुखी असणें.
**माँग पट्टी करना**—वेणी फणी करणें.
**माँग भरी रहना**—सौभाग्यवती असणें.
**माँगटीका**—पु. बिंदी.
**माँगन**—पु. मागणी, भिकारी.
**माँगना**—क्रि. स. मागणें, याचना करणें, इच्छा पुरी करण्यास सांगणें.
**माँगने**—अ. भीक मागावयास.
**माँचना**—क्रि. अ. प्रारंभ होणें, प्रसिद्ध होणें.
**माँचा**—पु. पलंग, खाट, माचण, लहान पाट.
**माँजना**—क्रि. स. घासणें, मांजा (पतंगाच्या दोराला लावायचा) करणें.—क्रि. अ. अभ्यास करणें.
**माँजर**—स्त्री. हाडांचा सांपळा.
**माँजा**—पु. पहिल्या पावसाचा फेंस (हा माशांना मादक असतो).
**माँझ**—अ. आंत, मध्यें.—पु. अंतर, फरक.
**माँझा**—पु. नदींत बनलेलें बेट, पगडीचा शिरपेच, लग्नांत वधूवरांना नेसवतात तीं पिवळीं वस्त्रें, वृक्षाचें खोड.
**माँझिल**—अ. मधील.
**माँझी**—पु. नावाडी, मध्यस्थ (भांडण
**माँट**—पु. माठ, सज्जा. [मिटविणारा).
**माँठ**—पु. माठ, मडकें.
**माँड़**—पु. भाताची पेज, खळ.
**माँड़ना**—क्रि. स. मर्दन करणें, चोळणें, लिंपणें, रचणें, सजविणें, कणसांतून दाणे काढणें, माजविणें, गडबड करणें,
**माँड़नी**—स्त्री. कांठ, गोठ. [तिंबणें.
**मांड़व**—पु. मांडव, मंडप.
**मांडवी**—स्त्री. भरताची पत्नि, जनक राजाच्या भावाची मुलगी.
**माँडा**—पु. लग्नमंडप, परोठा, मांडा (पक्वान्न),
**माँडी**—स्त्री. पेज, खळ. [मोतिबिंदु.
**माँड्यो**—पु. पाहुणे उतरण्याची जागा, लग्नमंडप, देव प्रतिष्ठेची जागा.
**माँत**—वि. मस्त, हतप्रभ, वेडा, पराजित.
**माँतना**—क्रि. अ. उन्मत्त होणें.
**माँता**—वि. मदोन्मत्त.
**माँद**—स्त्री. गुहा, गुंफा.—वि. निस्तेज, उदास, तुलनेंत हलका, कमी प्रतीचा, पराजित,
**माँदगी**—स्त्री. रोग, आजार. [पराभूत.
**माँदा**—वि. थकलेला, भागलेला, उरलासुरला, आजारी.
**माँपना**—क्रि. अ. निशेंत चूर होणें.
**माँर्थ**—अ. आंत.
**माँस, माँसु**—पु. मांस.
**माँह, माँहा, माँहि-हीं**—अ. आंत, मध्यें.

**मैंगल**—पु. मस्तावलेला हत्ती. —वि. मस्तावलेला.
**मैथिली**—स्त्री. जानकी, मिथिला देशाची [ राजकन्या.
**मैदा**—पु. सपीठ, मैदा.
**मैदान**—पु. रणक्षेत्र, लांबरुंद सपाट जमीन.
**मैन**—मदन, मेण, कामदेव. [ औषधी फळ.
**मैनफल**—पु. अक्रोडाच्या जातीचें एक
**मैनसिल**—स्त्री. मनशील (एक रासायनिक औषधि), एक प्रकारची पिवळी धातु.
**मैना**—पु. रजपुतामधील एक जात. —स्त्री. हिमालयाची स्त्री, मेनका, मैना.
**मैनाक**—पु. एका पर्वताचे नांव, हिमालयाचें [एक शिखर.
**मैमंत**—वि. मदोन्मत्त, गर्विष्ठ.
**मैयत**—स्त्री. मृत्यु, मरण ,शव, प्रेत.
**मैया**—स्त्री. आई (आदराचा शब्द).
**मैरा**—पु. शेतांतील माचा.
**मैल**—पु. मळ, दोष विकार, मैल. [वागणें.
**(किसीके प्रति) मैल रखना**—खुनशीपणानें
**(हाथ पैरका)मैल**—हाताचा मळ,तुच्छ गोष्ट.
**मैल खोरा**—वि. मळकट रंगाचा, मळखाऊ, —पु. साबण.
**मैला**—वि. मळकट, विकारयुक्त, दुर्गंधयुक्त.—पु. घाण. [ षित होणें.
**मैला करना**—मन खिन्न होणें, मन कलु-
**मैला कुचैला**—वि. घामट, मळलेलें, मळकट कपडे घालणारा.
**मैहार**—पु. मठ्ठा, फोडणीचें ताक.
**मों**—स. माझा.—अ. मध्यें, मी.
**मोंगरा**—पु. मोगरा.
**मोंछ**—स्त्री. मिशी.
**मोंढा**—पु. वेताची बैठक, खांदा.
**मो**—स. माझा.
**मोई**—वि. मोहित झालेली. बेशुद्ध, मेलेली.
**मोकना**—पु. बिनदातांचा हत्ती, बिन मिशांचा पुरुष.—क्रि. अ. संपणें. सुटणें.—क्रि. स. मोडणें, फेंकणें.
**मोकल-ला**—वि. स्वच्छंदी, स्वतंत्र.
**मोख, मोक्ष**—पु. मोक्ष, सुट्टी, मुक्ति, जन्ममरणापासून सुटका, गळून पडणें, टाकणें, कर्ज फेडणें, त्याग, उचलपट्टी, [ फेंकणें.
**मोखा**—पु. झरोका.
**मोच**—स्त्री. शीर चमकणें, नस उतरणें.—पु. केळ, शेवगा, सांवरी, सळई.
**मोचखाना**—क्रि. स. मुरगळणें (पाय इ.).
**मोचन**—वि. सोडविणारा, सुटका, कर्ज फेडणें.
**मोचना**—क्रि. स. सोडविणें, फेंकणें, पाडणें. —पु. केंस उपटण्याचा चिमटा.
**मोची**—पु. चांभार.—वि. सोडविणारा, दूर [ करणारा.
**मोच्छ**—पु. पाहा 'मोख'.
**मोछ**—स्त्री. मिशी.—पु. मोक्ष.
**मोज(जि)जा**—पु. अद्भुत कृत्य, चमत्कार.
**मोजरा**—पु. पाहा 'मुजरा'.
**मोट**—स्त्री. गाठोडें.—पु. मोट (चामडयाची). —वि. साधारण, कमी किंमतीचा.
**मोटरी**—स्त्री. गठडी.
**मोटा**—वि. जाड, लठ्ठ, दाट, जाडेंभरडें.
**मोटा खाना, मोटा पहनना**—साधी राहाणी.
**मोटा झोटा**—वि. जाडें भरडें.
**मोटाई**—स्त्री. स्थूलपणा, लठ्ठपणा, कुरापत.
**मोटाई चढ़ना**—घमेंडखोर होणें.
**मोटाना**—क्रि. अ. लठ्ठ होणें, घमेंड करणें, फुगणें, श्रीमंत होणें.—क्रि. स. लठ्ठ करणें.
**मोटिया**—पु. हमाल, ओझें वाहणारा, जाडें भरडें कापड.

**मोठ**–मुगाप्रमाणें असणारें एक धान्य.
**मोड़**–पु. वळण, बांकण.
**मोड़दार**–वि. बांकडें तिकडें, वळणदार.
**मोड़ना**–क्रि. स. वळवणें, फिरविणें, घडी करणें, मोडणें, बोथट करणें.
**(मुँह)मोड़ना**–विमुख होणें.
**मोतकिद**–वि. विश्वास ठेवणारा, एकाद्या धर्माचा अनुयायी.
**मोतबर**–वि. विश्वासपात्र.
**मोतमद**–वि. विश्वासू, विश्वस्त.
**मोतमिद**–वि. विश्वास ठेवणारा.
**मोताद**–स्त्री. औषधाचें निश्चित प्रमाण.
**मोतिया**–पु. मोगरा, एकप्रकारचा नमस्कार.–वि. फिक्का गुलाबी किंवा पिवळा गुलाबी मिसळलेला रंग.
**मोतिया बिंद**–पु. मोतिबिंदु.
**मोतिझिरा**–पु. कांजिण्या.
**मोतिसिरी**–स्त्री. मोत्यांची माळ.
**मोती**–पु. मोती.
**मोती कूट कर भरना**–चमकणें.
**मोती गरजना**–मोती पिचणें, मोती तडकणें.
**(आँख के) मोती**–अश्रु.
**(मानस के) मोती**–अश्रु.
**मोतीओंसे मुँह भरना**–पुष्कळसें द्रव्य देणें.
**मोती पिरोना**–अत्यंत गोड बोलणें, उत्तम लिहिणें, बनावट गोष्ट सांगणें.
**मोती मोलना**–क्रि. स. फावडयानें पैसे [ओढणें.
**मोथी**–स्त्री. मेथी.
**मोद**–पु. हर्ष, प्रसन्नता, सुगंध, एक छंद.
**मोदक**–वि. आनंद देणारा.–पु. लाडू, औषधी लाडू, गूळ, एक वर्णवृत्त.
**मोदी**–पु. किराणा मालाचा व्यापारी.
**मोदीखाना**–पु. मालाचें कोठार, भंडार.
**मोधू**–वि. मूर्ख.
**मोन, मोना**–क्रि. स. भिजविणें, ओलें [करणें.–पु. पेटारा.
**मोम**–पु. मेण.–वि. मऊ, दयाळू.
**मोमजामा**–पु. मेणकापड.
**मोमबत्ती**–स्त्री. मेणबत्ती. [विणकर.
**मोमिन**–पु.धर्मनिष्ठ मुसलमान, मुसलमान
**मोमियाइ**–स्त्री. नकली शिलाजित.
**मोमी**–वि. मेणाचें.
**मोय**–स. माझा.
**मोयन**–पु. मोहन (पदार्थांत घालावयाचें). 
**मोर**–स. माझें. –पु. मोर, मुंगी, सैन्याची पुढची रांग.
**मोरचंद**–पु. मोराच्या पंखावरचा डोळा.
**मोरचा**–पु. गंज , जंग, कीट (लोखंडावरील), खंदक, खाई, माऱ्याची जागा.
**मोरचा जीतना या मारना**–शत्रूची आघाडी [मारणें.
**मोरछल**–पु. मोरपिसाची चवरी.
**मोरछली**–पु. बकुळीचें झाड.
**मोरन**–स्त्री. मोडणें, श्रीखंड,घुसळलेलें दहीं.
**मोरना**–क्रि. स. लोणी काढणें, वळणें.
**मोरनी**–स्त्री. लांडोर, नथेची टीक. [तुरा.
**मोरपंखा**–पु. मोराचें पीस, मोरपंखाचा
**मोरपंखी**–स्त्री. मोरासारखी आकृति एका टोंकाला असणारी नाव.–पु. मोराच्या पिसासारखा रंग.–वि. मोरपिसाच्या रंगाचा.
**मोरपच्छ**–पु. मोरपीस. [दोरी.
**मोरवा**–पु. मोर, सुकाणूला बांधण्याची
**मोरहुति**–अ. माझ्याकडून, माझ्यासारखी माझी पाळी.
**मोरा**–वि. माझा.–पु. अकीक नांवाचें रत्न.
**मोराना**–क्रि. स. सभोंवार फिरविणें.
**मोरी**–स्त्री. पन्हाळी, मोरी, क्षत्रियांची

**मोल**–पु. मूल्य, किंमत. [एक जात.
**मोल तोल करना**–भाव ठरविणें.
**मोष**–पु. मोक्ष, चोरी, लूट.
**मोह**–पु. माया, अज्ञान, मूर्च्छा, प्यार, घोटाळा, चूक, आश्चर्य, दुःख देहाला आत्मा मानणें, प्रेमाचें वेड.
**मोहड़ा**–पु. दर्शनी भाग.
**मोहताज**–वि. गरीब, कंगाल, इच्छुक.
**मोहताड़ा**–वि. गरीब, कंगाल. [आंबा.
**मोहनभोग**–पु. शिरा, एका जातीचा
**मोहना**–क्रि. स. मोहित करणें, ठकविणें, भुलविणें, बेशुद्ध करणें.
**मोहनी**–स्त्री. समुद्रमंथन काळचे विष्णुरूप, भांग, मद्य.
**मोहमय**–वि. खोटें, मूर्खतापूर्ण.
**मोहमिल**–वि. निरर्थक, सोडलेला. [(नाणें.)
**मोहर**–स्त्री. शिक्का, मोहरें, छाप, मोहोर
**मोहरा**–पु. बुद्धिबळांतील मोहरें, मातीचा सांचा, इस्त्री (रेशमी वस्त्रांकरितां), भांड्याचें तोंड, वस्तूचा वरचा किंवा पुढला भाग, आघाडीचें सैन्य, चोळीचा बंद, माऱ्याची जागा.
**मोहरा लेना**–सामना करणें, टक्कर देणें.
**मोहरी**–स्त्री. भांड्याचें लहान तोंड. पायजम्याचा तळधेर, मोरी.
**मोहरिर**–पु. कारकून. [मुदत.
**मोहलत**–स्त्री. सुट्टी, फुरसत, अवधि,
**मोहलिक**–वि. कसाई.
**मोहसिन**–वि. उपकार करणारा.
**मोहार**–पु. दार, पुढचा भाग, भुंगा, मधपुडा.
**मोंहि-हीं**–स. मला.
**मौंगी**–स्त्री. मुका, मुकेपणा, मौन.
**मौंडा**–पु. मुलगा, बालक.
**मौका**–पु. संधि, घटनास्थळ, देश, स्थान.
**मौका बे मौका**–वेळीं अवेळीं.
**मौकाशनास**–वि. संधिसाधु.
**मौकूफ**–वि. बडतर्फ (नौकरीवरून), रद्द केलेला, अवलंबून राहणारा.
**मौखिक**–वि. तोंडी, तोंडाचा.
**मौज**–स्त्री. लहर, उत्साह, आनंद, सुख,
**मौज उड़ाना**–मौज मारणें. [वैभव.
**(किसीकी) मौज पाना**–दुसऱ्याची मर्जी
**मौज में आना**–लहरींत येणें. [जाणणें.
**मौज़ा**–पु. जागा, शेत, गांव.
**मौजी**–वि. मजा मारणारा, आनंदी,
**मौजूँ**–वि. योग्य, ठीक. [प्रसन्नचित्त.
**मौजूद**–वि. उपस्थित, हजर, तयार.
**मौजूदगी**–स्त्री. उपस्थिति.
**मौजूदा**–वि. चालू. [सैन्य वगैरेची हजेरी.
**मौजूदात**–स्त्री. सृष्टींतील सर्व वस्तु व प्राणी,
**मौड़**–पु. बाशिंग.
**मौत**–स्त्री. मरण, कष्ट.
**मौत का सिरपर खेलना या नाचना**–मृत्यु
**मौताद**–स्त्री. मात्रा. [जवळ येणें.
**मौन**–वि. चुप.–पु. मुकेपणा, भांडें, डबा,
**मौन गहना**–गप्प बसणें. [मुनिव्रत.
**मौन बाँधना**–मौन धारण करणें.
**मौन संभारना**–मौन पाळणें.
**मौर**–पु. आंब्याचा मोहोर, मंजिरी.–पु. लग्नांत घालावयाची पगडी, शिरोमणी, गरदन.
**मौरना**–क्रि. स. मोहरणें., बहर येणें.
**मौरवी, मौर्वी**–स्त्री. प्रत्यंचा, धनुष्याची
**मौरसिरी**–स्त्री. बकुळीचें झाड. [दोरी.
**मौरूसी**–वि. परंपरागत, वडिलार्जित.

**मौल**–वि. मूळचा (रहिवाशी), जुनें, कुलीन,पिढीजाद(नोकर,प्रधान सेना इ.) द्रव्याचें बळ. –पु. जुना प्रधान.
**मौलवी**–पु. अरबी व फारसीचा पंडित, मुसलमान शास्त्री.
**मौला**–पु. मित्र, ईश्वर, स्वामि.
**मौलाना**–पु. मुसलमानी धर्मगुरु, फार फार मोठा विद्वान.
**मौलि**–पु. डोकें, अग्र, टोंक, अशोक, मुकुट, शेंडी, केंस, बुचडा, वेणी, शेंडा.–स्त्री. पृथ्वी.
**मौलिक**–वि. मूळचें, स्वतंत्र, नवीन, मुख्य. –पु. मुळया विकणारा.
**मौलूद**–पु. नवजात शिशु, महंमद पैगंबरांचा जन्मोत्सव.
**मौस(सि)म**–पु. मोसम, ऋतु.
**मौसा**–पु, मावशीचा पति, मावसा.
**मौसिया**–वि. मावशीप्रमाणें.
**मौसिया सास**–स्त्री. मावस सासू.
**मौसिया ससुर**–पु. मावस सासरा.
**मौसी**–स्त्री. मावशी.
**मौसूफ**–वि. प्रशंसित, उल्लेखित.
**मौसूम**–वि. नामक.
**मौसूल**–वि. प्राप्त, मिळालेलें.
**मौसेरा**–वि. मावस.
**म्याऊँ का ठौर**–दुर्गमस्थान.
**म्याऊँ कौन पकडे**–मांजराच्या गळयांत कोण घंटा बांधणार. [म्यान.
**म्यान**–पु. अन्नमय कोश, शरीर, शस्त्राचें
**म्याना**–क्रि. स. म्यानांत ठेवणें.–पु, मेणा.
**म्युनिसिपैल्टी**–स्त्री. म्युनिसिपालटी.
**म्योंडी**–स्त्री. निगडीचें झाड.
**म्लान**–वि. कोमजलेलें, थकलेला, अशक्त, खिन्न, मलिन.–स्त्री. रजस्वला.
**म्लेच्छ**–पु. यवन, अनार्य, रानटीमनुष्य हिंगूळ, तांबे.–वि. पापी, नीच.
**म्हा**–स. 'मैं'चें विभक्ति प्रत्यय लावतांना,
**म्हारा**–स. आमचें. [होणारे रूप.

## [य]

**यंत्र**–पु. यंत्र, हत्यार, खास कामासाठीं तयार केलेलें हत्यार, वाद्य, कुलुप.
**यंत्रणा**–स्त्री. कष्ट, पीडा, वेदना.
**यंत्रालय**–पु. कारखाना, छापखाना.
**यकंग**–वि. एकांग, एकांगी.
**यक**–वि. एक.
**यक कलम**–वि. पूर्ण.–अ. एका दमांत.
**यकजा**–अ. एकत्र.
**यकजाई**–वि. एकत्र मिसळलेलें, एकंदर.
**यकटक**–अ. टकलावून, एकसारखें.
**यकता**–वि. अद्वितीय, अनुपम.
**यकबयक,यकबारगी**–अ.एकाएकीं,अचानक.
**यकमुश्त**–अ. एकाच वेळीं, एकहातीं, एक मूठीं (रक्कम इत्यादींची फेड).
**यकलख्त**–वि. पाहा 'यककलम'.
**यकसाँ**–वि. सारखा, समान. [लेला.
**यकसू**–वि. स्थिर, एकाच बाजूस अस-
**यकायक**–अ. अचानक.
**यकीन**–पु. दृढविश्वास, भरंवसा.
**यकीन लाना**–विश्वास ठेवणें, मानणें.
**यकीनन्**–अ. निश्चितपणें, खात्रीपूर्वक, खरोखरीच.
**यकीनी**–वि. निश्चित, ठराविक.
**यकुम,यक्कुम**–वि. प्रथम.
**यक्का**–पु. एक गाडी,– वि. एकाशीं संबंध ठेवणारा, एकटा, अनुपम.

**यख़**–पु. गोठून घट्ट झालेलें बर्फ, हिम.–वि. फार थंड.
**यख़नी**–स्त्री. मांसाचा रस्सा. [सहवास.
**यगानगत**–स्त्री. संबंध, अनुपमता, एकी,
**यगाना**–वि. नात्याचा, आप्तेष्ट, निरुपम.
**यच्छ,यक्ष**–पु. यक्ष.
**यज़्दान**–पु. ईश्वराचें एक नांव. [देणारा.
**यजमान**–पु. यज्ञ करणारा, ब्राह्मणांना दान
**यजुर्वेद**–पु. चार वेदांपैकीं एक वेद.
**यत**–वि. जाणारे, व्यापक, नियमित, यत्न करणारा, मर्यादित, जेवढें, जो, ज्याचें, जिंकलेला, मुक्त, हत्तीला पायानें डिवचणें.
**यज्ञ**–पु. याग, होम, पूजा, धर्मकृत्य, आत्मा, ब्रह्म, विष्णु, यूपरहित यज्ञ.
**यतीम**–पु. अनाथ, पोरका.
**यतीमी**–स्त्री. अनाथावस्था.
**यतीम खाना**–पु. अनाथाश्रम.
**यत्न**–पु. प्रयत्न, दीर्घ प्रयत्न, काळजी,
**यत्र**–अ. जेथें, ज्या दिशेला. [दक्षता, श्रम.
**यत्रकत्र**–अ. कोठेंतरी, कोठेंही.
**यत्रतत्र**–अ. जिकडे तिकडे, कोठेंही, सर्वत्र.
**यथा**–अ. ज्याप्रमाणें, जसें, त्याचप्रमाणें, पुढें दिल्याप्रमाणें, सारखें, प्रमाणें, उदाहरणार्थ, कीं, कारण, म्हणजे, जितकें, ज्या अर्थीं, जर, योग्यरीतीनें.
**यथातथ्य**–अ. जसेंच्या तसें.
**यथायथ**–अ. योग्यरीतीनें, अनुक्रमें, हळू हळू.
**यथायोग-ग्य**–अ. परिस्थित्यनुरूप, कालानुरूप. [वि. खरें, सार्थ, योग्य.
**यथार्थ**–अ. योग्य, जसें पाहिजे तसें.–
**यथार्थवाद**–पु. वास्तव वाद.
**यथेष्ट**–वि. पाहिजे तितकें.

**यद**–पु, हात.–सर्व. जो, जी, जें.
**यदा**–अ. जेव्हां, जेथें ज्याअर्थी, जर.
**यदि**–अ. जर, कदाचित.
**यदु**–पु. ययाति राजाचा जेष्ठ पुत्र.
**यदपि, यद्दपि, यद्यपि**–अ. जरी.
**यम**–पु. यमराज, संयम, नदी, महानदी, जुळें, अश्विनी कुमार, शनि, कावळा, नकुल सहदेव जोडी, अष्टांग योगांपैकीं पहिलें, आवरणें, ताबा, मृत्यूची देवता, निग्रह, दोनाची संख्या, मनाला धर्माच्या ठिकाणीं स्थिर ठेवण्याचें साधन.–वि. नियम करणारा.
**यमघंट**–पु. एक दुष्ट योग, दोष विशेष.
**यमज**–पु. जुळें, अश्विनी कुमार.
**यमदग्नि**–पु. जमदाग्नि.
**यमल**–पु. जोडी, जुळें, अश्विनीकुमार.
**यमनाह**–पु. धर्मराज.
**यरकान**–पु. पंडुरोग.
**यवन**–पु. ग्रीक मनुष्य, अनार्य, परदेशीय, मुसलमान, कालयवन नामक राजा.
**यवनिका,यवनी**–स्त्री. नाटकाचा पडदा, यवन स्त्री, दासी. [समूह, सुदैव.
**यश**–पु. कीर्ति, प्रशंसा, अलौकिक गुण
**यशस्वी,यशस्वत्**–वि. कीर्तिमान, प्रख्यात्, दुष्कर कर्म पार पाडणारा, शुभलक्षणी (अश्वर दास, मणि इ.)
**यष्टि**–स्त्री. काडी, छडी, खोडचा, खांब, फांदी, हार, वेल, दोरी, ज्येष्ठी मध,
**यह**–स. हा, ही, हें. [ध्वजदंड.–पु. बाहु.
**यहाँ**–अ. येथें , या जगांत.
**यही**–स. हाच, हीच, हेंच.
**यहूद**–पु. येशुख्रिस्ताचें जन्मस्थान, 'यहूदी'चें
**यहूदिन**–स्त्री. यहूदी स्त्री. [–अ. वचन.

**यॅा**–अ. येथें. [ 'यह' चें सामान्यरूप.
**या**–अ. अथवा, किंवा. –सर्व. व्रजभाषेंत
**याकूत**–पु. लाल (रत्न).
**याग**–पु. यज्ञ, हवन. [ मागणें.
**याचना**–क्रि. स. विनंति, प्रार्थना, भीक
**यातना**–स्त्री. सूड, पीडा, यमलोकांत भोगावयाची पीडा, प्रतिकार, फेड.
**यातायात**–पु. दळणवळण, रहदारी.
**यातें**–अ. यामुळें.
**यात्रा**–स्त्री. प्रवास, यात्रा, प्रयाण, फिरणें, मोहीम, तीर्थाटन, उत्सव, मिरवणूक, रस्ता, चरितार्थ, व्यवहार, रूढी, उपाय, गाडी, नाटक, वेळ घालविणें, यात्रेकऱ्यांचा समुदाय.
**यात्रावाल**–पु. तीर्थउपाध्या, पंड्या.
**यात्रिक, यात्री**–वि. वहिवाटीचें, यात्रेचा, निर्वाहोपयोगी. –पु. प्रवासी, वाटसरू, मोहीम, मोहीमेची सामुग्री.
**याद**–स्त्री. स्मरण, अठवण.
**यादगार**–स्त्री. स्मृतिचिन्ह.
**यादगारी**–स्त्री. आठवण.
**याददास्त**–स्त्री. स्मरणशक्ति, आठवणी-साठीं वहींत केलेली नोंद.
**यानी-ने**–अ. अर्थात्, म्हणजे.
**यापन**–पु. घालविणें, हाकलून देणें, वर्तन, व्यतीत करणें, बरा करणें, (रोग) सांत्वन(दुःखाचें), विलंब, पोषण, निर्वाह, सराव करणें, उपदेश, आवरणें. –वि. निर्वाहापुरतें.
**याफ्त**–स्त्री. मिळकत, उत्पन्न, आय.
**याफ्तनी**–स्त्री. एकाद्यावर निघालेली बाकी रक्कम.
**याब**–प्रत्य. मिळविणारा, उदा.– कामयाब.
**याबू**–पु. तट्टू.
**यामना**–हे. काजळ, सुरमा.
**यामिनी, यामिका**–स्त्री. रात्र. [ प्रियकर.
**यार**–पु. मदतनीस, साहाय्यक, मित्र, जार,
**यारबाश**–वि. मनमिळाऊ, कामुक.
**यारमार**–वि. मित्रद्रोही.
**यारा**–पु. सामर्थ्य.
**यारान**–पु. 'यार' चें अ. वचन. [ प्रमाणें.
**याराना**–पु. मैत्री, दोस्ती. –वि. मित्रा-
**यारी**–स्त्री. मैत्री, स्त्रीपुरुषांचें अनुचित प्रेम.
**याल**–स्त्री. मान, आयाळ.
**यावत**–वि. जितकें, सर्व. –अ. जितकें, दूर, पर्यंत, मध्यंतरी, तोपर्यंत, जोपर्यंत, लवकर, जेव्हां, निश्चय.
**यास**–स्त्री. निराशा, प्रयत्न, घमासा.
**यासीन**–स्त्री. मृत्युसमयीं चांगली गति प्राप्त होण्यासाठीं म्हणावयास सांग-तात तो कुराणांतील मंत्र.
**यासु**–स. ज्याचें, जिचें.
**याहि-ही**–स. याला, हिला.
**युक्त**–वि. जोडलेलें, सहित, सज्ज, तल्लीन, तत्पर, सरावलेला, हुशार, योग्य, न्याय्य, नियमवान, व्रतस्थ, योगाभ्यासी, निपुण. –पु. योगी, जूं, न्यायार्जित, द्रव्य.
**युक्ति**–स्त्री. एकीकरण, बेरीज, वापरणें, जूं बांधणें, चाल, वहिवाट, उचितपणा, योजना, उपाय, खुबी, कला, नैपुण्य, विवेक, अनुमान, कारण, सांकेतिक भाषण, धातुमिश्रण.
**युग**–पु. जूं, जोडी, कालावधि, चार युगें काल, मोठा कालावधि, जन्म, चार हात लांबी, उंची, जुगार, जुगाराच्या कवड्या.

**युगति, युक्ति**–स्त्री. उपाय, तर्क, प्रमाण, विचार.
**युगपत्**–अ. एकाच वेळीं, बरोबरच, एकदम.
**युगयुग**–स्त्री. कितीतरी काळ.
**युगसंधि**–स्त्री. संक्रमणकाल, संक्रमणावस्था.
**युमन**–पु. सुदैव, सफलता.
**युयुत्सा**–स्त्री. शत्रुत्व, लढण्याची इच्छा.
**युयुत्सु**–वि. लढूं इच्छिणारा.
**युवक**–पु. तरुण मनुष्य.
**युवराई-जी**–पु. युवराजाचें पद.
**युवराज**–पु. युवराज, राजपुत्र. [मादी)
**युवा**–पु. तरुण पुरुष (युवति-ती–तरुण स्त्री,
**यूं**–अ. असें, अशा तऱ्हेनें.
**यूज़**–पु. चित्ता. –वि. शेंकडा. [कळप.
**यूथ**–पु. समूह, सैन्य, सजातीयांचा समुदाय,
**यूथप, यूथपति**–पु. सेनापति, सरदार, म्होरक्या, श्रेष्ठ हत्ती.
**यूनान**–पु. ग्रीक देश.
**यूनानी**–वि. ग्रीक देशाचा, ग्रीकनिवासी. –स्त्री. ग्रीक भाषा.
**यूरिश**–स्त्री. आक्रमण, मोहीम.
**यूह**–पु. समूह, झुंड.
**ये**–स. हे, हे सर्व.
**येई**–स. हाच.
**येऊ, येहू**–अ. हेहीं
**ये तो**–वि. हें तर, एवढा.
**यों**–अ. असें, अशा तऱ्हेनें.
**यों तो**– तसें पाहिलें तर.
**योंहि-ही**–अ. उगीचच, विनाकारण.
**योग**–पु. स्पर्श, परिणाम युक्ति, संयोग, मेळ, योगायोग, सहकार, सहवास, प्रेम, युक्ति, ध्यान, संगति, कपट, प्रयोग, औषध, धन, लाभ नियम, संबंध, वैराग्य.
**योगरूढि**–वि. व्युत्पत्तीनें व रूढीनें अर्थाचा वाचक (शब्द). [नारिंग.
**योगी**–पु. मुनि, योग करणारा, जादूगार,
**योग्य**–वि. उचित, साजेसें, पात्र, समर्थ, अनुरूप, उपयुक्त. –स्त्री. अभ्यास, शास्त्राभ्यास, सूर्य.–पु. वाहन, चंदन, पुरणपोळी, मुरडशेंग.
**योजना**–स्त्री. योजना, व्यवहार, व्यवस्था, जोडणें, रचना, अर्थ लावणें, कामास लावणें, चार कोस (अंतर), उत्तेजन,
**योधा**–पु. वीर. [परब्रह्म.
**योधापन**–पु. शौर्य.
**योनि**–स्त्री. स्त्रियांचें जननेंद्रिय, उत्पत्ति-स्थान, कारण, आदि कारण, जाणण्याचें साधन, खाण, आधार स्थान, जात.
**यौं**–अ. असें, अशातऱ्हेनें.
**यौ**–स. हा, ही, हें.
**यौगिक**–वि. उपयुक्त, योग्य, नेहमीचें. –पु. उत्पत्तिसिद्ध, योगसंबंधी.
**यौतक, यौतुक**–पु. लग्नांत वराला किंवा वधूला मिळणारा अहेर, एकाद्याच्या नांवानें काढून ठेवलेलें द्रव्य. –वि. एकट्याचेंच.
**यौन**–वि. योनिसंबंधी, विवाहनिमित्त. –पु. बायकोचे नातलग, विवाह, शरीर संबंध, योनि, उत्पत्ति कारण.
**यौम**–पु. दिवस. [दररोजचा.
**यौमिया**–पु. एका दिवसाचें वेतन. –वि.
**यौवन**–पु. तारुण्य, तरुणीसमूह.–वि. तरुण.

## [ र ]

**रंक**–वि. दरिद्री, कंजूस, आळशी, भूकेलेला. –पु. भिकारी.

**रंग**–पु. अखाडा, प्रेक्षक गण, वर्ण, शोभा, छटा, प्रभाव, क्रीडा, आनंद, नृत्यगीत इत्यादि, नृत्य अभिनय होण्याचें ठिकाण, रणक्षेत्र, रंग, कात (खाण्याचा),
**रंग आ जाना**–रंग चढणें. [समाज, खळ.
**(चेहरेका) रंग उड़ना, उतर जाना या फक होजाना**–तोंड उतरणें, फिक्कें पडणें.
**रंग करना**–चैन करणें.
**रंग खुलना**–सुंदर दिसणें.
**(गिरगिटसा) रंग बदलना**–सरड्याप्रमाणें रंग बदलणें, चंचल वृत्ति.
**रंग चढ़ना**–धुंदी वाढत जाणें.
**रंग चूना या टपकना**–तारुण्य मुसमुसणें.
**रंग जमना**–प्रभाव पडणें. [छाप बसविणें.
**रंग जमाना या बांधना**–धाक बसविणें,
**रंग दिखाना**–छाप पाडणें, संकटांत टाकणें.
**रंग देखना**–रागरंग पाहणें.
**रंग निखरना**–चेहरा खुलणें.
**रंगपर आना**–सुशोभित होणें, तीव्र होणें.
**(चेहरेका) रंग बदलना**–रागावणें.
**रंग बिगड़ना**–वाईट स्थिति येणें. [उडणें.
**रंग मचाना**–रणधुमाळी माजविणें, दंगल
**रंग मारना**–जय मिळविणें.
**रंग में भंग होना**–आनंदात विघ्न येणें.
**रंग में डूबना**–चैन करणें.
**रंग रखना**–महत्त्व टिकविणें.
**रंग रचना**–उत्सव करणें. [विणें.
**रंग रलना, रंगरलियाँ मचाना**–चैन उड-
**रंग रातना**–गाढ प्रेम करणें, परम मैत्री
**रंग लगना**–अधिकाराचा मद येणें. [करणें.
**रंग लाना**–तक्रार करणें, प्रभाव पाडणें, अहित करणें, नखरा करणें, रागावणें, सतावणें.

**रंग सफ़ेद पड़ जाना**–चिंतित होणें.
**रंग होना**–प्रभाव पडणें, आनंद होणें.
**रंग ढंग**–पु. पद्धत, दशा, चालचलणूक, लक्षण. [व कापडाचे रंग.
**रंगत**–स्त्री. आनंद, मौज, दशा, चेहऱ्याचे
**रंगतरा**–पु. नारिंग, संतरें.
**रंगना**–क्रि. स. रंगविणें, प्रेमांत गुंतविणें, अनुकूल करणें.–क्रि. अ. आसक्त होणें.
**रंगबिरंगा**–वि. रंगीबेरंगी, अनेक प्रकारचा,
**रंगभूमि**–स्त्री. नाटक गृह. [विविध.
**रंग मंच**–पु. रंगभूमि.
**रंगरली**–स्त्री. क्रीडा, आनंदोत्सव, चैन.
**रंगरसिया**–पु. विलासी, रंगेल पुरुष.
**रंगराज**–पु. श्रीकृष्ण.
**रँगराला**–वि. प्रेमळ.
**रंगराग**–पु. रागरंग.
**रंगरावा**–वि. प्रसन्न, रंगलेला.
**रँगरूट**–पु. रिक्रूट, नवीन भरती केलेला
**रँगरेज**–पु. रंगारी. [शिपाई, नवशिक्या.
**रँगवाई, रंगाई**–स्त्री. रंगविण्याची मजुरी.
**रंगवाना, रंगाना**–क्रि. स. रंगवून घेणें.
**रंगशाला**–स्त्री. नाटकगृह.
**रंगसाज**–पु. रंगारी, रंग तयार करणारा.
**रंगामेजी**–स्त्री. खुलवून सांगणें.
**रंगारंग**–वि. चित्रविचित्र, विविध.
**रंगी**–वि. आनंदी, विनोदी.
**रंगीन**–वि. रंगीत, रंगदार, विलासप्रिय.
**रंगीला**–वि रंगेल, रसिक.
**रंच, रंचक**–वि. थोडें, अल्प.
**रंज**–पु. दुःख, खेद, शोक.
**रंजक**–वि. रंजविणारा, हंसविणारा.–स्त्री. तोड्याच्या बंदुकीची दारू, एखाद्याला चिडविण्यासाठीं सांगितलेली गोष्ट.

**रंजन**–पु. मन प्रसन्न करण्याची क्रिया, चंदन.
**रंजना**–क्रि. स. प्रसन्न, करणें, भजणें, स्मरण करणें, रंगविणें. [लुब्ध.
**रंजित**–वि. रंगलेलें, आनंदित, अनुरक्त,
**रंजिश, रंजीदगी**–स्त्री. वैर, मनाचा संकोच, खिन्नता.
**रंजीदा**–वि. दु:खी, कष्टी, खिन्न, नाराज,
**रंडापा**–पु. वैधव्य. [अप्रसन्न.
**रंडीबाज**–पु. वेश्यागामी.
**रँडुआ, रँडुवा**–पु. विधुर, ज्याची बायको वारली आहे असा पुरुष.
**रंतिदेव**–पु. एका राजाचें नांव.
**रंद**–पु. झरोका, बंदूक किंवा तोफ सोडण्यासाठीं किल्ल्याच्या भिंतींत केलेलें छिद्र.
**रंदना**–क्रि. स. रंधा मारून लाकूड
**रंदा**–पु. रंधा. [गुळगुळीत करणें.
**रंधन**–पु. स्वयंपाक, स्वयंपाक करण्याची क्रिया, नाश, पीडा.–वि. नाश करणारा.
**रंध्र**–पु. भोंक, चीर, मध्यभाग, गुहा, व्यंग, नाजूक भाग, उणीव.
**रंभ**–पु. वेळू, एक प्रकारचा बाण, कठिण शब्द, बांबू.
**रंभा**–स्त्री. अप्सरा, गौरी, वेश्या, केळें, उत्तरदिशा.–पु. कुदळ, पहार.
**रंभाना**–क्रि. स. हंबरणें.
**रँहचटा**–वि. हावरा, लोलुप.
**रइनि**–स्त्री. रजनी, रात्र.
**रई**–स्त्री. रवी, भरडा, रवा, पीठ.–वि. अनुरक्त, संयुक्त, बुडलेलें, मिसळलेलें. [जमीनदार.
**रईस**–पु. श्रीमंत, धनिक, प्रांताधिकारी,
**रईसी**–स्त्री. श्रीमंती.
**रउताई**–स्त्री. स्वामित्व, मालकी.
**रउरे**–स. द्वितीय पुरुषाचें आदर सूचक संबोधन, महाराज, महाशय.
**रकछ**–पु. पानांची भजी.
**रकत, रक्त**–पु. रक्त.–वि. लाल.
**रकतांक, रक्तांक**–पु. पोवळें, केशर,
**रकबा**–पु. क्षेत्रफळ. [रक्तचंदन.
**रकम**–स्त्री. लिखाण, मोहोर, संपत्ति, प्रकार, दागिना, धूर्त, चलाख, सुंदर स्त्री.
**रकम के**–नाना प्रकारचे.
**रकाब, रिकाब**–स्त्री. रिकिब.
**रक़ाबत**–स्त्री. चढाओढ, प्रतिद्वंद्विता.
**रकाबदार**–पु. मोतद्दार, स्वयंपाकी,
**रकाबी**–स्त्री. बशी, ताटली. [हलवाई.
**रकीब**–पु. प्रेमिकेचा दुसरा प्रियकर, प्रेमक्षेत्राचा प्रतिद्वंद्वि.
**रक्त**–वि. रंगविलेलें, तांबडा, अनुरक्त, मनोहर, सुश्राव्य, कर्णमधुर, गानकुशल, क्रीडारत, खेळणारा.–स्त्री. तांबडी गुंज, मंजिष्ठा, उंटकटारी, लाख.–पु. रक्त रोहिडा, पोवळें, रक्त, तांबें, शेंदूर, हिंगुळ, केशर, रक्त-चंदन, गुलाबी चंदन.
**रक्तबीज**–पु. डाळिंब, एक राक्षस.
**रक्तार्श**–पु. मूळव्याध.
**रक्तिका**–स्त्री. रत्ती (वजन).
**रक्षा**–स्त्री. रक्षण, सुरक्षितता, मंत्राचा ताइत, श्रावणी पूर्णिमेला हातांत बांधावयाची राखी, राख, भस्म.
**रक्स**–पु. नृत्य.
**रख**–स्त्री. कुरण.
**रखना**–क्रि. स. ठेवणें, सांभाळणें, रक्षण करणें, वाया जाऊं न देणें, सोंपविणें,

गहाण ठेवणें, ताब्यांत घेणें, नेमणें, धारण करणें, कर्जदार होणें, मनांत [अनुभवणें.
**रखनी**–स्त्री. रखेली, पत्नी.
**रख रखाव**–पु. रक्षण.
**रखला**–पु. लहान तोफ, तोफेची गाडी.
**रखवाई-ली**–स्त्री. राखण, राखण करण्याची मजुरी.
**रखवाना**–क्रि. स. ठेववून घेणें. [पहारेकरी.
**रखवाला**–पु. संभाळणारा, राखण करणारा,
**रखाई**–स्त्री. रखवाली, राखण करण्याची मजुरी. [सांभाळणें.
**रखाना**–क्रि. स. ठेववून घेणें.–क्रि. अ.
**रखिया**–पु. राख, राखी, रक्षण.
**रखेली, रखात**–स्त्री. रखेली, उपपत्नी.
**रखैय्या**–पु. रक्षक, रक्षा करणारा.
**रख्त**–पु. सामान, पोशाख, जोडयाचें कातडें, थाटमाट.
**रग**–स्त्री. शीर, नस, नाडी, पानाची शीर.
**रग दबना**–दाबांत असणें, हातांतलें बाहुलें बनणें.
**रग फड़कना**–उत्साहाचें लक्षण दिसणें.
**रगड़**–स्त्री. घर्षण, झगडा, रगडण्यापासून उत्पन्न झालेलें चिन्ह, कठिण परिश्रम.
**रगड़ना**–क्रि. स. रगडणें, चेपणें, वाटणें, घांसणें, भरडणें.
**रगपट्टा**–पु. देहांतील इंद्रियें.
**रग़बत**–स्त्री. प्रवृत्ति, इच्छा.
**रगरेशा**–पु. पानांच्या शिरा, शरीरांतील प्रत्येक इंद्रिय.
**रगरेशा जानना**–अंडीपिल्लीं माहीत असणें.
**रगवाना**–क्रि. स. चूप बसविणें, शांत करणें.
**रगाना**–क्रि. अ. शांत होणें.–क्रि. स. गप्प बसविणें..
**रगेदना**–क्रि. स. पळविणें, फार काम घेणें.
**रघु**–पु. सूर्यवंशांतील एका राजाचें नांव.
**रघुराई**–पु. रामचंद्र. [करणारा.
**रचक**–वि. थोडें, किंचित.–पु. रचना
**रचना**–क्रि. स. रचणें, बनविणें.–स्त्री. कृति, रचना, कौशल्य, विशेष चमत्कार असलेलें गद्य किंवा पद्य.
**रचवाना, रचाना**–क्रि. स. रचविणें, बनविणें, मेंदी लावून घेणें.
**रचिरचि**–अ. अत्यंत कौशल्यानें.
**रचैता**–वि. रचणारा.
**रच्छक, रक्षक**–पु. रक्षक, पालक,पहारेकरी.–वि. रक्षण करणारा.
**रच्छना**–क्रि. अ. रक्षण करणें.
**रच्छस, रक्षस**–पु. राक्षस, पिशाच्च.
**रच्छा, रक्षा**–स्त्री. रक्षण.
**रज**–पु. चांदी धोबी, आर्तव, रजोगुण, पाप, पाणी, पराग.–स्त्री. धूळ, रात्र,
**रजक**–पु. धोबी, चितारी, पोपट.[प्रकाश.
**रजत**–स्त्री. माळ, सोनें, हस्तिदंत, डोह, पर्वत, चांदी, रुपें, रक्त. –वि. पांढरें, रुप्याचें, लाल.
**रजना**–क्रि. अ. रंगणें, मग्न होणें. –क्रि. स. रंगविणें. –स्त्री. राळ, धूप.
**रजनी**–स्त्री. रात्र, हळद, राख, नीळ,
**रजनीमुख**–पु. सायंकाल. [चाकवत.
**रजब**–पु. अरबी वर्षाचा सातवा महिना.
**रजबहा**–पु. गुरांमुळें मळलेली वाट, मुख्य नळ (मेन पाइप).
**रजबाड़ा**–पु. संस्थान, राजा.
**रजवार**–पु. दरबार. [स्वीकृति.
**रज़ा**–स्त्री. इच्छा, मर्जी, सुट्टी, अनुमति,
**रज़ाभित**–स्त्री. मुलाला स्तनपान करविणें.

**रजाइ-इय**–स्त्री. आज्ञा, इच्छा, सुट्टी, अनुमति, स्वीकृति.
**रजाई**–स्त्री. रजई, राजेपणा, आज्ञा.
**रज़ामंद**–वि. सहमत असलेला.
**रजाय, रजायस**–स्त्री. इच्छा, आज्ञा.
**रज़ील**–वि. नीच, हलक्या जातीचा.
**रजु, रज्जु**–स्त्री. दोरी, केसांची वेणी, लगाम.
**रज़्ज़ाक़**–पु. धनी, पालन पोषण करणारा, [ईश्वर.
**रज़्म**–स्त्री. युद्ध.
**रट**–स्त्री. घोकंपट्टी.
**रट लगाना**–पुन्हां पुन्हां सांगणें.
**रटन**–पु. घोष, कथ.–स्त्री. घोकंपट्टी.
**रटना**–क्रि. स. पाठ करणें, घोकंपट्टी [करणें.
**रठ**–वि. शुष्क, सुकलेला.
**रण**–पु. लढाई, आवाज, वाद्य वाजविण्याची धनुकली, गमन, रणभूमि.
**रणखेत**–पु. रणक्षेत्र.
**रणसिंघा**–पु. तुतारी, रणशिंग.
**रणित**–पु. निनादित, खणखण आवाज. –वि. शब्द करणारें, वाजणारें.
**रत**–वि. आनंदित, शोकी, आसक्त, कामांत गुंतलेला. –पु. सुख प्रीति, रक्त, मैथुन.
**रत जगा**–पु. रात्रभर जागणें.
**रतन, रत्न**–पु. रत्न, उत्तम, श्रेष्ठ.
**रतनजोत**–स्त्री. एक प्रकारचें रत्न, एक झुडुप (त्याच्या मुळापासून लाल रंग निघतो).
**रतनाक (ग) र, रत्नाकर**–पु. समुद्र.
**रतनार-रा**–वि. लालसर, ह्या शब्दाचा उपयोग डोळयासाठीं होतो.
**रतनारे**–लाल रंगाचे.
**रतनालिया**–वि. लालसर. [तांबडेपणा.
**रतनारी**–पु. तांदुळाची एक जात. –स्त्री.
**रतनारीच**–पु. मदन, कुत्रा, रांडबाज, स्त्रीचा सीत्कार शब्द.
**रतल**–स्त्री. रत्तल (वजन), दारुचा प्याला.
**रतहिंडक**–पु. रांडबाज, स्त्रीवर बलात्कार करणारा.
**रताना**–क्रि. अ. रत होणें, मग्न होणें.
**रतायनी**–स्त्री. वेश्या. [–क्रि. स. आकर्षिणें.
**रताली**–स्त्री. कुंटीण.
**रतालू**–पु. रताळें.
**रति**–स्त्री. आनंद, सुख, प्रीति, आसक्ति, विषयसुख, मैथुन, आकर्षण, मदन पत्नी, योनि, रात्र.–अ. रत्तीभर, किंचित्.
**रतिक**–अ. किंचित्, थोडेसें.
**रतिनाह**–पु. कामदेव.
**रतियाना**–क्रि. अ. प्रेम करणें.
**रतिराइ-ई**–पु. कामदेव.
**रती**–स्त्री. मदनाची बायको रति, कांति, संभोग, गुंज (वजन).–अ. जरासा, [किंचित्.
**रती चमकना**–प्रभाव पडणें.
**रतुआ**–पु. कीड.
**रतूबत**–स्त्री. ओल.
**रतोपल**–पु. लाल कमल.
**रतौंधा**–पु. रातांधळेपणा.
**रतौंधी**–स्त्री. रातांधळें.
**रत्त**–पु. रक्त.
**रत्ती**–स्त्री. गुंज, शोभा.–अ. किंचित.
**रत्तीभर**–रेंसभर.
**रत्थी**–स्त्री. तिरडी. [बुद्धिबळांतील उंट.
**रथ**–पु. गाडी, रथ, शरीर, अवयव, पाय,
**रथक्रांत**–पु. आफ्रिका देश, रथानें पड- [लेली चाकोरी.
**रथांग**–पु. चाक.
**रथी**–पु. रथावर स्वार होऊन लढणारा, एक हजार योध्यांबरोबर एकदम

लढणारा.–वि. रथावर स्वार झालेला. –स्त्री. तिरडी.
**रद-द्द**–वि. रद्द, टाकाऊ.–पु. दांत.
**रदछ (च्छ) द**–पु. ओंठ.
**रदीफ़**–स्त्री. घोड्यावर स्वाराच्या मागें बसलेला मनुष्य, गाण्यांतील पालुपद.
**रदीफ़वार**–वि. अक्षराच्या क्रमानें लावलेलें. [ झालेलें.–स्त्री. ओकारी.
**रद्द**–वि. रद्द केलेलें, बदललेलें, निकामी
**रद्द बदल, रद्दोबदल**–बदल, फेरफार.
**रद्दा**–पु. थर.
**रद्दी**–वि. कुचकामाचा,टाकाऊ,निरुपयोगी.
**रन**–पु. युद्ध, जंगल, सरोवर, समुद्राचा लहानसा भाग. [ रुणझुणणें.
**रनकना, रनना**–क्रि. अ. झणत्कार होणें,
**रनबंका, रनबाँकुरा**–पु. योद्धा, वीर.
**रनबन**–पु. घोर जंगल, नाश.
**रन (नि) वास**–पु. अंतःपुर, जनानखाना.
**रनी**–पु. वीर, योद्धा. [जमिनीचा उतार.
**रपट**–स्त्री. रिपोर्ट, रपेट, घसरगुंडी,
**रपटना**–क्रि. अ. घसरणें, घाईनें चालणें. करावयास लावणें.
**रफल**–पु. पांघरण्याचें गरम वस्त्र, शाल.–स्त्री. रायफल (बंदूक).
**रफ़ा**–वि. दूर केलेला, निवृत्त, शांत.–पु. उंची, वेगळेपणा.
**रफ़ादफ़ा**–वि. पाहा 'रफ़ा'.
**रफ़ाह**–स्त्री. सुख, परोपकार.
**रफ़ू**–पु. रफ़ू करण्याचें काम.
**रफ़ूगर**–पु. रफ़ू करणारा. [ झालेला.
**रफ़ूचक्कर**–अ. नाहींसा झालेला, फरारी
**रफ़्त**–वि. भूतकालीन.
**रफ़्तगी**–स्त्री. जाणें, गमन.
**रफ़्तनी**–स्त्री. मालाची निर्गत, गमन.
**रफ़्त व गुजस्त**–झालेला, व्यतीत.
**रफ़्ता रफ़्ता**–अ.सावकाश, हळुहळू, क्रमानें.
**रफ़्तार**–स्त्री. गति, चाल. [ ची पद्धत.
**रफ़्तार व गुफ़्तार**–बोलण्याची व रहाण्या-
**रब**–पु. ईश्वर, पालन पोषण करणारा.
**रबड़**–पु. रबर.
**रबड़ना**–क्रि. स. ढवळणें, फेनणें.
**रबड़ी**–स्त्री. बासुंदी.
**रबदा**–पु. चिखल, चालण्याचें श्रम.
**रबर**–पु. रबर.
**रबाना**–पु. झांझऱ्याचा डफ.
**रबाब**–पु. हाडाच्या नखीनें वाजविण्याचें सारंगीसारखें वाद्य, पठाणांचें फार आवडतें असतें.
**रबी**–स्त्री. वसंतऋतूंत कापलें जाणारें रबीचें पीक, वसंतऋतु.
**रबीउल्अव्वल**–पु. अरबी वर्षाचा तिसरा महिना, हा जेष्ठ महिन्याच्या सुमारास येतो.
**रबीउलआखिर**–पु. अरबी वर्षाचा चौथा महिना हा आषाढ महिन्याच्या सुमारास येतो.
**रबीउस्सानी**–पु. पाहा 'रबीउल् आखिर'.
**रबीब**–पु. पाळलेला मुलगा, बायकोच्या पहिल्या नवऱ्याचा मुलगा.
**रब्त**–पु. अभ्यास, संवय, घनिष्ठ संबंध.
**रब्त जब्त**–घनिष्ठता.
**रमक**–स्त्री. तरंग, झोका, आंदोलन, धुगधुगी, शेवटचा श्वास.–वि. थोडासा.
**रमकना**–क्रि.अ. झोका घेणें, डुलत चालणें.
**रमचेरा**–पु. सेवक.
**रमज़ान**–पु. मुसलमानांचा उपवासाचा

महिना.
**रमज़ानी**–वि. रमजान सणासंबंधीं, रमजान महिन्यांत जन्मलेला, भुकेला,
**रमठ**–पु. हिंग. [उपाशी.
**रमण-न**–वि. सुखविणारा, मोहक. –पु. नवरा, मदन, जार, गाढव, विषय विलास, मैथुन, खेळणें, आनंद, ढुंगण, पडवळाचें मूळ, मदन.
**रमणीक, रमणीय**–वि. आनंददायक, सुंदर.
**रमताराम, रमतेराम**–वि. भटक्या.
**रमना**–क्रि. अ. रमणें, सहल करणें, भिनणें, अनुरक्त होणें, फिरणें, निघून जाणें.–पु. कुरण, बाग, सुंदर व रमणीय स्थान.
**रमनी**–स्त्री. सुंदर तरुण स्त्री, पत्नी, स्त्री.
**रमनीक**–वि. रमणीय, चांगलें.
**रमल**–पु. फाशांवरून वर्तविलें जाणारें भविष्य. [कांति, शोभा.
**रमा**–स्त्री. पत्नी, लक्ष्मी, संपत्ति, सुदैव,
**रमाना**–क्रि. स. रमविणें, मोहित करणें, भुलविणें, अनुकूल करणें, थोपविणें, लावणें, जोडणें.
**रमास**–स्त्री. चवळी (कडधान्य).
**रमज़**–स्त्री. खूण, रहस्य, कोडें, कटाक्ष, इशारा, श्लेष.
**रमेश-स**–पु. रमापति, नारायण.
**रमैती**–स्त्री. शेतकामांतील सहायता.
**रमैनी**–स्त्री. कबीराच्या बीजक नामक ग्रंथाचा दुसरा भाग.
**रमैया**–पु. राम, ईश्वर.–वि. रमणारा.
**रम्ज़**–स्त्री. इशारा, रहस्य, व्यंग, आवाज,
**रम्माल**–पु. रमल विद्या जाणणारा. [कोडें.
**रम्य**–वि. रमणीय, सुंदर.–पु. सोनचांफा, वीर्य.–स्त्री. रात्र.
**रम्हाना**–क्रि. अ. हंबरणें. [उत्सुकता.
**रय**–पु. धूळ, वेग, प्रवाह, त्वरा, जोर,
**रयन**–स्त्री. रात्र.
**रयना**–क्रि. अ. रंगणें, प्रेममग्न होणें, एकरूप होणें. –क्रि. स. भिजविणें,
**रयनि**–स्त्री. रजनी, रात्र. [घुसळणें.
**रये**–क्रि.स. रंगविलें, खेळविलें, मंथन केलें.
**रयो**–क्रि. स. रंगलें.
**रय्यत**–स्त्री. प्रजा.
**ररंकार**–पु. रकाराचा आवाज.
**रर**–स्त्री. ध्यास, घोकणी.
**ररकना**–क्रि. अ. बोचणें, सलणें.
**ररना**–क्रि अ घोकणें, ध्यास लावणें.
**ररिहा**–पु. एक पक्षी, घोकणारा, मोठा
**ररी**–वि. लतकोडगा,नीच तुच्छ. [भिकारी.
**रल, रलक**–पु. आनंद, कोठडी.
**रलना**–क्रि. अ. मिसळून जाणें.
**रलाना**–क्रि. स. मिसळणें, एकत्र करणें.
**रली**–स्त्री क्रीडा, विहार, मौज, आनंद.
**रलूल**–पु. गोंगाट,लोंढा. [कोलाहल, गर्जना.
**रव**–पु. बोल, शब्द, आवाज़, गुंजारव,
**रवकना**–क्रि. अ उड्या मारणें, उसळणें, पळणें. [पणा.
**रवताई**–स्त्री. स्वामित्व, अधिकार, राजे-
**रवण**–वि. ओरडणारा, वाजणारें, उष्ण, गरम, चंचल, थट्टेखोर.–पु. उंट, कोकिळ, गाढव. [करणारा.
**रवन**–पु. रमण, पति. –वि. क्रीडा
**रवना**–क्रि. अ. क्रीडा करणें, आवाज करणें.–पु. रावण.
**रवनि-नी**–स्त्री. सुंदर स्त्री, पत्नी.
**रवन्ना**–पु. परवाना, बीजक (मालाचें),

मालाची किमतीसह यादी.

**रवाँ**–वि. चालू, सुरू झालेला, प्रवाही, संवयीचा, प्रचलित, रूढ.–पु. जलद वाचन.

**रवा**–वि. उचित, योग्य.–पु. कण, तुकडा, रवा, शुद्ध सोनें, काळजी.

**रवाज**–स्त्री. चालरीत, रिवाज.

**रवादार**– व. मिंधा, संबंधीं, आश्रित, रवाळ.

**रवाना**– व. गेलेला, पाठविलेला.

**रवायत**–स्त्री. जुनी गोष्ट, म्हण, कथानक.

**रवारवी**–स्त्री. घाई, घायरगुंडी, हालचाल.

**रवि**–पु. सूर्य.

**रविकर**–पु. सूर्याची किरणें.

**रवितनया**–स्त्री. यमुना नदी.

**रवितनय, रविपूत**–पु. यम, शनि, सुग्रीव, कर्ण, अश्विनीकुमार.

**रविश**–स्त्री. पद्धति, चाल, वाफयाच्या मधली लहान वाट.

**रविसुत, रविसुअ(व)न**–पु.पाहा 'रविपूत'.

**रवैया**–पु. वागणूक, चालरीत. [औषधी.

**रशकपूर**–पु. रसकापूर, एक विषारी

**रश्क**–पु. ईर्षा, मत्सर, वैर, शत्रुत्व.

**रश्केपरी**–वि. परम सुंदरी.

**रस**–पु. उसाचा रस,द्रव पदार्थ, पाणी, पेय, रुचि, चव (गोड, आंबट, खारट, तिखट, कडू व तुरट), चटणी, कोशिंबीर, चाखण्याचा व खाण्याचा पदार्थ, जीभ, रसनेन्द्रिय, आवड, अभिलाष, प्रेम, अनुराग, शृंगार, आनंद, सुख, सौंदर्य, नवरस (शृंगार, वीर, करुण, अद्भुत, हास्य, रौद्र, भयानक, बीभत्स व शांत), सार, सत्त्व, रक्त इ. शरीरांतील द्रव पदार्थ, अन्नाचें रक्त होण्यापूर्वीचें रूपांतर, वीर्य, पारा, विष, दूध, चीक, अमृत, राळ, रसातल, रक्त्याबोळ, कामक्रीडा, उमंग, गुण, सरबत, भस्म (स्वर्णभस्म इ.), रगण व सगण.–वि. ऐकणारा, करणारा ('जसें—दादरस—न्याय करणारा. —फरियादरस —फिर्याद ऐकणारा).

**रस भीजना या भीनना**–तारुण्यांत येणें.

**रसरंग**–प्रेम, क्रीडा.

**रसरीति**–प्रेमपूर्ण व्यवहार.

**रसकोर**–पु, रसगुल्ला (मिठाई).

**रसखीर**–स्त्री. उसाच्या रसांत शिजलेला भात, साखर भात.

**रसगुल्ला**–पु. एक बंगाली मिठाई.

**रसद**–स्त्री. न शिजलेलें धान्य, वांटा, हिस्सा, शिधा, रसद.–पु. नक्षत्रांची गति पाहाण्याचें यंत्र.

**रसदगाह**–स्त्री. वेधशाळा.

**(हिस्सा) रसद**–योग्य वांटा.

**रसदार**–वि. रसाळ, रुचकर, स्वादिष्ट.

**रसना**–स्त्री. जीभ, दोरी, लगाम रुची.–पु. ओरड, मेघगर्जना, चव.–क्रि.अ. झिरपणें, गळणें, आनंदमय होणें, रसास्वाद घेणें, प्रेमांत गुंतणें, तन्मय होणें, अनुरक्त होणें.

**रसभरी**–स्त्री. रासबेरी फळ.

**रसभीना**–वि. रसभरित, आनंदांत मग्न.

**रसम, रस्म**–स्त्री. चाल रीत.–वि. रिवाज, प्रथा, मेळ, संबंध, पगार.

**रसमसा**–वि. रसरशित, अनुरक्त, घामानें भिजलेला.

**रसमि**–स्त्री. किरण, चमक.

**रसराज**–पु. पारा, श्रृंगाररस.

**रसरी**–स्त्री. सुतळी, दोरी.

**रसल**–वि. रसाळ, रसिक, सुंदर.

**रसाँ**–वि. पोंचविणारा.

**रसांजन**–पु. एक औषधि.

**रसा**–स्त्री. पृथ्वी, जमीन, जीभ, पहाड-मूळ, मद्य.– वि. पोंचविणारा, उंच होणारा किंवा दूर जाणारा.

**रसाइनी**–पु. रसायन शास्त्रवेत्ता.

**रसाई**–स्त्री. पोंच.

**रसातल**–पु. सप्त पाताळांपैकीं एक.

**रसाल**–पु. आंबा, ऊंस, फणस, गहूं, कर, धूप, रक्त्याबोळ, जिरें घातलेलें ताक.–वि. रसाळ, सुंदर, रसिक.–स्त्री. जीभ, श्रीखंड, दुर्वा, द्राक्ष, भुईकोहळा.

**रसावर-ल**–पु. उसाच्या रसांत शिजलेला भात, लग्नांतील एक गाणें.

**रसिक**–वि. चवदार, चव घेणारा, सुंदर, कामुक, मर्मज्ञ (काव्याचा), आनंदी, सहृदय, आसक्त, तत्पर.–पु. विषयी पुरुष, हत्ती, घोडा, सारस, गहूं, देवभात, एक छंद.

**रसिका**–स्त्री. श्रीखंड, काकवी, जीभ, रसधातु, कंबरपट्टा, द्राक्ष, मैना.

**रसित**–वि. रसयुक्त, सोनें इ. नें मढवलेलें, मुलामा दिलेलें.–पु. आवाज, मेघगर्जना.

**रसिया, रसी**–वि. रसिक.–पु. होळीचें एक गाणें.

**रसीद**–स्त्री. पावती, पोंच.

**रसील, रसीला**–वि. रसदार, रसिक, सुंदर, स्वादिष्ट.

**रसुन, रसुनक**–पु. लसूण.

**रसूम**–पु. नियम, कायदा, रीति, प्रचलित प्रथेप्रमाणें दिलेला पैसा.

**रसूल**–पु. ईश्वराचा संदेश वाहक पैगंबर.

**रसोइया**–पु. आचारी.

**रसोई**–स्त्री. स्वयंपाक, शिजलेलें अन्न, स्वयंपाक घर.

**रसोईखाना, रसोईघर**–पु. स्वयंपाकघर.

**रसोई जीमना**–जेवणें.

**रसोईदार**–पु. स्वयंपाक करणारा.

**रसोईदारी**–स्त्री. स्वयंपाक करण्याचें काम.

**रसौरा**–पु. उसाच्या रसांत शिजविलेला भात.

**रसौली**–स्त्री. संधिस्थानावर गांठी होण्याचा रोग.

**रस्म**–स्त्री. चालरीत.

**रस्मुलखत**–पु. लिपि.

**रस्सा**–पु. जाड दोर.

**रस्सी**–स्त्री. दोरी.

**रहँकला**–पु. एक प्रकारची गाडी, रेकला, तोफेची गाडी, रेकल्यावर लादलेली तोफ.

**रहँचटा**–पु. मनोरथ सिद्धीची अभिलाषा.

**रहँट**–पु. रहाट (विहीरींतून पाणी काढण्याचा).

**रहँटा**–पु. रहाट (कापसाचें सूत काढण्याचा).

**रहचह**–स्त्री. चिवचिव.

**रहज़न**–पु. पाहा 'राहज़न'

**रहन**–स्त्री. राहणी, व्यवहार, गहाण.

**रहनसहन**–स्त्री. राहणी करणी.

**रहना**–क्रि. अ. राहणें, स्थिर होणें.

**रह जाना**–राहून जाणें, मागें राहणें, असफल होणें.

**रहनि**–स्त्री. रहाणी, आचार, हरभऱ्याची कोरडी भाजी, प्रेम.

**रहनुमा, रहबर**–वि. मार्गदर्शक.

**रहम**–पु. दया, करुणा, क्षमा, गर्भाशय.

**रहमत**–स्त्री. कृपा, दया, वृष्टि, वर्षाव.

**रहमदिल**–वि. दयाळु.

**रहमान**–वि. दयाळु.–पु. ईश्वराचें नांव.

**रहल**–स्त्री. पोथी ठेवण्याची लाकडी कैंची

**रहबाल**–स्त्री. घोड्याची एक चाल.

**रहस**–पु. समुद्र, स्वर्ग, एकांत, निर्जन प्रदेश, गुप्त गोष्ट, मैथुन, यथार्थता, तत्त्व, गुह्यांग.–अ. एकांतात, गुप्तपणें.

**रहसना**–क्रि. अ. प्रसन्न होणें. [पद्धत

**रहस बधावा**–पु. अहेर, विवाहाची एक

**रहसि**–स्त्री. गुप्तस्थान, एकांत स्थान.

**रहस्य**–वि. गुप्त. –पु. गुप्त भेद, मर्म, सहज लक्षांत न येणारी गोष्ट, थट्टा-मस्करी, आचार्य मुखानेंच मिळणारी विद्या, उपनिषद.–अ. गुप्तपणें, एकांतीं.

**रहाई**–स्त्री. चैन, आराम, व्यवहार, राहण्याची क्रिया.

**रहाना**–क्रि. अ. असणें, राहणें.

**रहाव**–पु. स्थिति.

**रहावन**–स्त्री. गुरांचा अड्डा.

**रहासहा**–वि. उरलें सुरलें.

**रहित**–वि. सोडलेला, वर्जित. –पु. एकांत.

**रहिला**–पु. चणा, हरभरा.

**रहीम**–वि. दयाळु, कृपाळु. –पु. ईश्वर, एक कवि, एक साधू.

**रहुवा**–पु. पोटावारी राहिलेला नोकर.

**रहैया**–पु. रहिवासी.

**राँक, रंक**–वि. कंगाल, दिन.

**राँग, राँगा**–पु. कथील, शिसें.

**राँच, रंच**–अ. किंचित्.

**राँचना, राचना**–क्रि. अ. अनुरक्त होणें, प्रेम करणें, तद्रूप होणें, समरस होणें, रंगणें. –क्रि. स. तद्रूप करणें, रंगविणें, समरस करणें.

**राँजना**–क्रि. अ. काजळ फासणें, डाग देणें (भांड्यास). –क्रि. स. रंगविणें.

**राँटा**–पु. टिटवी, वांकडा मनुष्य.

**राँड़**–स्त्री. विधवा, वेश्या.

**राँढना**–क्रि. स. आक्रंदणें, रडणें.

**राँध**–पु. शेजार. –अ. जवळ.

**राँधना**–क्रि. स. स्वयंपाक करणें.

**राँपी**–स्त्री. चांभाराची रापी.

**राँभना**–क्रि. अ. हंबरणें.

**राइ**–पु. सरदार, राजा.

**राई**–स्त्री. मोहरी, राजेपणा, अगदीं लहान माप. –पु. राजा.

**राई नोन उतारना**–दृष्ट काढणें.

**राई का पहाड़ बनाना, राई से पर्वत करना**–राईचा पर्वत करणें.

**राई काई करना**–चक्काचूर करणें.

**राउ, राऊ**–पु. राजा.

**राउत**–पु. राजवंशांतील व्यक्ति, क्षत्रिय, वीर पुरुष. [राजांचा.

**राउर**–पु. अंतःपुर.–वि. आपला, महा-

**राउल**–पु. राजकुलांत उत्पन्न झालेला पुरुष,

**राकस, राक्षस**–पु. राक्षस. [राजा.

**राकसिन, राकसी, राक्षसी**–स्त्री. राक्षसी.

**राका**–स्त्री. पौर्णिमेची रात्र, पौर्णिमा, प्रथम रजोदर्शन झालेली स्त्री.

**राकेश, राकेस**–पु. पूर्णचंद्र.

**राख**–स्त्री. भस्म, धूळ, राख.

**राखना**–क्रि. स. रक्षण करणें, राखण करणें, संभाळणें, कपट करणें, लपवून ठेवणें, अडविणें, आरोप करणें.

**राखी**–स्त्री. रक्षाबंधनाचा दोर, राख.

**राखी पूनो**–स्त्री. नारळी पौर्णिमा.

**राग**–पु. रंग देणें, रंग, उटी, तांबडा रंग, तांबडेपणा, अळता, प्रेम, अनुराग, क्रोध, मत्सर, कोशिंबीर, लोणचें, मुरंबा इ. पदार्थ, गाण्यांतील राग,

गानमाधुर्य, रजोगुण, खादाडपणा, राजा.
**(अपना अपना) राग अलापना**–स्वतःसंबंधींच बोलत राहणें, आपलेंच घोडें दामटणें.
**राग ताग बैठना**–बस्तान बसणें, रागरंग
**राग लगाना**–लांबण लावणें. [जुळणें.
**राचना**–क्रि. स. रचणें, 'सर्जविणें.–क्रि. अ. रंगून जाणें, मग्न होणें.
**राच्छस, राक्षस**–पु. राक्षस, दैत्य.
**राछ**–पु. फणी (हातमागाची), मिरवणूक, बरात, लोहाराचा हातोडा, जात्याचें
**राज़**–पु. रहस्य, गौप्य. [लाकूड.
**राज**–पु. राज्य, स्वामित्व, शासनकाल, देश,
**राजकाज**–राज्यप्रबंध. [गवंडी, राजा.
**राज़दार**–पु. रहस्य सांगणारा.
**राजरजना**–आनंदांत राहणें.
**राजराजना**–राज्य करणें.
**राजगीर**–पु. गवंडी, कारागीर.
**राजधानी**–स्त्री. राजधानी.
**राजन**–पु. राजा, क्षत्रिय, इंद्र, मालक, चंद्र, यज्ञ, सोम, श्रेष्ठ. [शोभणें.
**राजना**–क्रि. अ. राहणें, असणें, विराजणें,
**राजपाट**–पु. राज्य आणि सिंहासन.
**राजबाहा**–पु. पाट, कालवा (सर्वांत
**राजमान**–वि. राजमान्य. [मोठा).
**राजराज**–पु. कुबेर, चंद्र, सम्राट.
**राजस**–वि. रजोगुणयुक्त, रजोगुणापासून उत्पन्न.–पु. आवेश, क्रोध.
**राजस्व**–पु. सरकारी कर.
**राजा**–पु. राजा, स्वामी, एक पदवी.
**राजिका**–स्त्री. ओळ, रेषा, काळी मोहरी, राई, शेत. [झालेला.
**राजित**–वि. सुशोभित, विराजमान
**राजिव, राजीव**–पु. कमळ, मत्स्य.–वि. हत्ती.
**राज़ी**–वि. खुश, प्रसन्न, सुखी, सम्मत, तयार, राजी, निरोगी, अनुकूल.
**राजी**–स्त्री. ओळ, पंक्ति.
**राज़ीनामा**–पु. तडजोडपत्र.
**राजेंद्र**–पु. महाराज.
**राट**–पु. राजा, सरदार, श्रेष्ठ पुरुष.
**राटुल**–पु. मोठा तराजू, कांटा (वज-
**राठ**–पु. राजा, राज्य, मदनवृक्ष. [नाचा).
**राड़**–वि. निरुपयोगी, भेदरट. [भित्रा.
**राढ़**–स्त्री. आरोळी, लढाई, निकामी,
**रात, रातड़ी, रातरी, रात्रि**–स्त्री. रात्र.
**रातदिन**–अ. नेहमीं. [होणें.
**रातना**–क्रि. अ. लाल रंगानें रंगणें, अनुरक्त
**राता**–वि. तांबडें, रंगलेलें, आसक्त.
**राति-ती**–पु. देणगी, दान, द्रव्य.
**रातिचर**–पु. राक्षस.
**रातिब**–पु. गुरांचें खाणें.
**रातुल**–वि. तांबडें.
**राधना**–क्रि. स. आराधना करणें, काम करून
**रान**–स्त्री. मांडी. [घेणें, पूर्ण करणें.
**राना**–पु. राणा.–क्रि. अ. अनुरक्त होणें.
**रानी**–स्त्री. राणी, स्वामिनी.
**राब**–स्त्री. आटविलेला उसाचा रस.
**राबड़ी, रबड़ी**–स्त्री. बासुंदी, आटीव दूध.
**राबना**–पु. शेतांत खत देण्याचा एक विधि.
**राम**–पु. परशुराम, बलदेव, रामचंद्र, तीनाची संख्या, पति, रमण, घोडा, मृग, विशेष, ईश्वर, एक छंद, अशोक, चाकवत, कडू कोष्ठ, तमाल पत्र.–वि. सुंदर, सुखदायक, पांढरा, निळा काळा.
**राम राम करना**–नमस्कार करणें, देवाचें नांव घेणें. [विरक्त होणें.
**राम राम होना, राम शरण होना**–मरणें,

**राम राम हो जाना**–स्वर्गवासी होणें.
**राम राम कर के**–अभिवादन करून, मोठ्या कष्टानें.
**राम कहानी**–स्त्री. रडगाणें.
**रामजनी**–स्त्री. हिंदू वेश्या.
**राम तरोई**–स्त्री. भेंडी.
**राम तारक**–पु. राममंत्र.
**रामदाना**–पु. चवळी (बारीक).
**राम नामी**–पु. रामनाम छापलेलें वस्त्र, साधूंचा एक पंथ, गळ्यांतील एक दागिना, एक माळ.
**रामबाँस**–पु घायपात, एक प्रकारचा मोठा बांबू.
**रामरज**–स्त्री. पिवडी.
**रामर मौवल**–स्त्री. गप्पागोष्टी.
**रामरस**–पु. मीठ, वांटलेली भांग.
**रामराज्य**–पु. अत्यंत सुखदायक राज्य.
**रामशर**–पु. सरकंडा, बोरू.
**रामसुंदर**–स्त्री. एक नौका.
**रामा**–स्त्री. तंबाकू, सुंदर स्त्री, चांगलें गाणारी स्त्री, आर्या छंदाचा एक भेद, हिंगुळ, अशोक, कोरफड, हिंग, नदी, लक्ष्मी, सीता, राधा, रुक्मिणी.
**रामेश्वर**–पु. दक्षिण भारतांतील समुद्र-कांठचें एक शिवलिंग.
**राय**–पु. राजा, भाट, सरदार.–स्त्री. मत, अभिप्राय.
**रायज**–वि. रूढ, प्रचलित.
**रायभोग**–पु. दुपारचा नैवेद्य.
**रायरासि**–स्त्री. राजाचा खजिना.
**रायसा**–पु.एकाद्या राजाच्या शौर्याचें पद्यमय वर्णन.
**रार, रारि**–पु. तंटा, हुज्जत.
**राल**–पु. एक कांबळें.–स्त्री. लाळ, धूप, धुपाचें झाड, सालईचा चीक, राळ.
**राल गिरना, चूना या पटकना**–तोंडाला पाणी सुटणें, अतिलोभ करणें.
**राव**–पु. पाहा 'राय'. किंकाळी, आवाज.
**रावटी**–स्त्री. राहुटी, एकादें लहान घर.
**रावत**–पु. सामंत, सरदार, लहान राजा, वीर.
**रावन, रावण**–पु. रावण.–वि. शत्रूंस रडावयास लावणारा.
**रावना**–क्रि. स. रडविणें. [–वि. आपला.
**रावर-रा-रो**–पु. अंतःपुर, राजवाडा.
**रावल**–पु. राजवाडा, अंतःपुर, सरदार, राजा, रजपूतांच्या कांहीं राजांची पदवी.
**रावी**–पु. कथा सांगणारा, कथा लेखक.
**राशि**–स्त्री. वारसा, संस्था, गणित, ढीग, रास (नक्षत्रावरून झालेली).
**रास**–पु. गलबला, आवाज, भाषण, गौळ्यांचे वर्तुलाकार नृत्य, उत्सव.–स्त्री. श्रीकृष्णाचा एक खेळ, समूह, गुरांची झुंड, व्याज, दत्तक, रस्ता, सडक, राहू (ग्रह), पागा, लगाम, भूशिर, वरचा भाग.–वि. अनुकूल, योग्य.
**रास आना**–अनुकूल होणें, लाभदायक होणें.
**रासभ**–पु. गाढव.
**रासभी**–स्त्री. गाढवी.
**रासि**–पु. पाहा 'राशि'.
**रासी**–पु. मध्यम.–वि. वाईट, नकली, लहान मापाचा. [रासा.
**रासो-सौ**–पु. राजाचें पद्यमय जीवन चरित्र,
**रास्त**–वि. सरळ, बरोबर, उचित, योग्य.
**रास्तगी**–स्त्री. शिष्टता, चांगुलपणा.
**रास्तगो**–वि. खरें बोलणारा.
**रास्तबाज़**–वि. इमानी, खरा.
**रास्ता**–पु. रस्ता, चाल, प्रथा, उपाय, युक्ति.
**रास्ता नापना या पकड़ना**–चालू लागणें, निघून जाणें.

**रास्ता लेना**–अमुक कार्यपद्धति स्वीकारणें, चालू लागणें.

**रास्ता देखना**–वाट पाहणें. [सांगणें.

**रास्ता बताना**–टाळणें, काढून टाकणें, युक्ति

**रास्ती**–स्त्री. सरळपणा, सत्यता.

**राह**–पु. राहु.–स्त्री. रस्ता, मार्ग, प्रथा, चाल, नियम, एक जातीचा मोठा मासा, बहाणा, खबर, षडयंत्र.

**(अपनी) राह आना अपनी राह जाना**–जीवन व्यवहार सरळ ठेवणें.

**राह काटना**–रस्ता बदलणें.

**राह खोटी करना**–उशीर करणें, चालू कामांत अडवणूक करणें.

**राह दिखाना**–मार्ग दाखविणें, प्रतीक्षा

**राह देखना**–वाट पाहणें. [करविणें.

**राह निकालना**–युक्ति शोधणें, स्नेह–सौजन्य वाढविणें.

**राह पड़ना**–दरोडा पडणें. [हट्ट सोडणें.

**राहपर आ जाना**–आचरण सुधारणें, आपला

**राह पैदा करना**–मित्रता करणें, शोधून काढणें, एकाद्या कामांत पटाईत होणें.

**राह बताना**–मार्ग दाखविणें, युक्ति सांगणें, टाळणें, फसविणें, काढून टाकणें.

**राह भूलना**–रस्ता चुकणें.

**राह मारना**–अडविणें, चालू कामांत व्यत्यय आणणें, नष्ट भ्रष्ट करणें, रस्त्यावर लूटमार करणें.

**राहमें आँखें बिछाना**–फार उत्साहानें स्वागत करणें. [सदाचारी होणें.

**राह राह जाना**–सरळ मार्गानें जाणें,

**राह लगाना**–अनुकूल करणें, रस्ता दाखविणें. [चारी होणें.

**राहसे बेराह होना**–मार्गभ्रष्ट होणें, दुरा-

**राहें बताना**–युक्त्या दाखविणें.

**राहखर्च**–पु. प्रवास खर्च.

**राहगीर**–पु. मुशाफिर, प्रवासी.

**राह चलता**–पु. वाटसरू, पांथस्थ, परका.

**राह चौरंगी**–स्त्री. चव्हाटा.

**राहजन**–पु. डाकू, लुटारू.

**राहजनी**–स्त्री. दरोडेखोरी.

**राहत**–स्त्री. आराम, चैन.

**राहदार**–पु. रस्त्यावरून चालण्याचा कर वसूल करणारा. [महसूल.

**राहदारी**–स्त्री. रस्त्यावरील दस्तुरी,

**राहरीति**–स्त्री. व्यवहार, रिवाज, पद्धति.

**राह व रब्त**–पु. घरोबा, संबंध.

**राव व रस्म**–स्त्री. सहवास.

**राहिन**–पु. गहाण ठेवणारा.

**राहिल**–पु. बैरागी, विरक्त.

**राही**–पु. प्रवासी, यात्रेकरू.

**राहु**–पु. राहु, एक प्रकारचा मासा,

**रिंगन**–स्त्री. रांगणें. [गेळा वनस्पति.

**रिंगना**–क्रि. अ. रांगणें.

**रिंगना**–क्रि. स. फिरविणें, रांगविणें.

**रिंगाना**–पु. नास्तिक, धार्मिक बंधनें न मानणारा, स्वच्छंदी पुरुष, स्वैराचारी.–वि. मदोन्मत्त, उडाणटप्पू, मस्त.

**रिंदा**–वि. स्वच्छंदी, उद्धट.

**रिआ(या)यत**–स्त्री. सवलत, लक्ष, दयापूर्ण व्यवहार, न्यूनता.

**रिआयती**–वि. सवलत, लक्ष, दयापूर्ण व्यवहार, न्यूनता इ. संबंधी.

**रिआया**–स्त्री. प्रजा.

**रिकबँछ**–स्त्री. अळूची वडी.

**रिकाव**–स्त्री. रिकिब.

**रिक्त**–वि. रिकामे, हीन, दरिद्री, निरु-

पयोगी, विभागलेलें, क्षीण पुण्य, भाररहित.–पु. रिकामी जागा, पोकळी, अरण्य.
**रिक्ता**–स्त्री. तिथि (४, ९, १४).
**रिक्थ**–पु. वडिलोपार्जित जिनगी, द्रव्य, [सोनें.
**रिक्थी**–पु. वारस, धनिक.
**रिक्थक्रम**–पु. परंपरा, वारसा.
**रिच्छ, रिक्ष**–पुं. अस्वल, नक्षत्र.
**रिच्छेस**–पु. अस्वलांचा स्वामी.
**रिज़क्, रिज़्क्**–पु. दररोजचें जेवण, [आहार.
**रिज़ाली**–स्त्री. निर्लज्जपणा.
**रिजु, ऋजु**–वि. सरळ, सुगम, सज्जन, प्रसन्न, प्रामाणिक, साधा, भोळा, हितकर.–पु. माड. [आसक्त, प्रेमळ.
**रिझवार, रिझकवार**–वि. गुणग्राहक,
**रिझाना**–क्रि. स. प्रसन्न करणें, रिझविणें.
**रिझायल**–वि. प्रसन्न होणारा.
**रिझाव**–पु. प्रसन्नता.
**रिझावना**–क्रि. स. प्रसन्न करणें, रिझवणें.
**रित, रितु**–स्त्री. ऋतु, मोसम.
**रितवना**–क्रि. स. रिकामें करणें, रिचवणें.
**रिन, ऋण**–पु. कर्ज, उधार.
**रिनिआँ, रिनी**–वि. कर्जदार.
**रिपु**–पु. शत्रु, वैरी,चोर ओंवा. [पु. शत्रुघ्न.
**रिपुदमन**–वि. शत्रूंचा नाश करणारा.–
**रिमझिम**–स्त्री. झिमझिम, पावसाची सर.
**रिया**–स्त्री. धोका, दगा, कपट.
**रियाकार**–वि. दगलबाज, कपटी.
**रियाज**–पु. अभ्यास, मेहनत.
**रियाज़ी**–स्त्री. गणित.
**रियायत**–स्त्री. नम्रता, सवलत.
**रियाया**–स्त्री. प्रजा. [ऐश्वर्य, श्रीमंती.
**रियासत**–स्त्री. राज्य, संस्थान, वैभव,
**रियाह**–स्त्री. शरिरांतील वात.
**रिर**–स्त्री. हट्ट.
**रिरना**–क्रि. अ. गयावया करणें.[मागणारा.
**रिरहा**–वि. अतिशय गयावया करून भीक
**रिरि,रिरी**–स्त्री. पितळ. [मिसळणें, रमणें.
**रिलना**–क्रि. अ. प्रवेश करणें, शिरणें,
**रिवाज**–पु. चाल, रीत, प्रथा, पद्धत.
**रिश्ता**–पु. नातें, संबंध.
**रिश्तेदार**–पु. नातेवाईक.
**रिश्वत**–स्त्री. लांच.
**रिश्वतख़ोर**–वि. लांचखाऊ.
**रिषि, ऋषि**–पु. सूक्ष्मदर्शी मुनि, ऋषि.
**रिषिनायक**–पु. मुनींमध्यें श्रेष्ठ,अत्रि ऋषि.
**रिष्ट**–वि. पीडित, दुर्दैवी, धष्टपुष्ट, प्रसन्न. –पु. रिठा, खड्ग, इजा, दुर्दैव, अशुभ, नाश, पाप, वसुदैव, ऐश्वर्य, क्षेम, [कल्याण.
**रिस**–स्त्री. क्रोध.
**रिसमारना**–क्रोध आवरणें.
**रिसना**–क्रि. अ. खळखळून बाहेर येणें.
**रिसवाना**–क्रि. स एकाद्यावर रागावणें.
**रिसहा**–वि. रागीट. [–क्रि. अ. रागावणें.
**रिसाना**–क्रि. अ. रागावणें, चिडणें. –क्रि. स. एकाद्यावर रागावणें.
**रिसानी**–स्त्री. क्रोध, स्पर्धा.
**रिसाल**–पु. राज्यकर. [वकीली.
**रिसालत**–स्त्री. ईश्वरावतार, परराष्ट्र
**रिसालदार**–पु. घोडेस्वारांच्या तुकडीचा मुख्य.
**रिसाला**–पु. पत्र, लहान पुस्तक, घोडदळ.
**रिसिआ (या) ना**–क्रि. अ. रागावणें. –क्रि. स. एकाद्यावर रागावणें.
**रिसिक**–स्त्री. तलवार.
**रिसौंहा**–वि. रागावलेला, नाखुष.

**रिहल**–स्त्री. पुस्तक ठेवून वाचण्याची लाकडी फळी.
**रिहलत**–स्त्री. रवानगी, मृत्यु.
**रिहा**–वि. बधमुक्त, सुटका झालेला.
**रिहाइश**–स्त्री. राहण्याचें ठिकाण, रहाण्याची तऱ्हा.
**रिहाई**–स्त्री. सुटका.
**रींक(ग)ना**–क्रि. अ. रांगणें, रेंगाळणें.
**रींधना**–क्रि. स. शिजविणें.
**री**–अ. अग (संबोधन).
**रीखमूक, ऋष्यमूक**–पु. एका पर्वताचे नांव.
**रीछ**–पु. अस्वल.
**रीझ**–स्त्री. प्रसन्नता, मुग्धता.
**रीझना**–क्रि. अ. प्रसन्न होणें, मोहित होणें.
**रीठ**–स्त्री. युद्ध, तरवार. –वि. अशुभ, वाईट.
**रीठा**–पु. रिठ्याचें झाड, रिठा.
**रीढ़**–स्त्री. पाठीचा कणा.
**रीत, रीति**–स्त्री. रीत, पद्धत, तऱ्हा, चालरीत, परिपाठ, नियम.
**रीतना**–क्रि. अ. रिकामें होणें. –क्रि. स. रिकामें करणें.
**रीता**–वि. रिकामा, रिक्त.
**रीति, रीती**–स्त्री. प्रकार, रीत, कायदा, वाहणें, गमन, नदी, मर्यादा, वहिवाट, भाषापद्धति, पितळ, गंज, कीट, जस्ताचें फूल, मंडूर.
**रीस, रीसि**–स्त्री. क्रोध, मत्सर, स्पर्धा.
**रीसना**–क्रि. स. रागावणें.
**रीह**–स्त्री. वात, पाद, हवा.
**रुंड**–पु. धड, हातपाय तोडलेलें धड.
**रुँदवाना**–क्रि. स. दुसऱ्याकडून तुडवून घेणें.
**रुँधना**–क्रि. अ. थांबणें, अडकून पडणें, कामांत गुंतणें, घेरलें जाणें.
**रु**–अ. आणि.
**रुआ**–पु. रोम.
**रुआना**–क्रि. स. रडविणें.
**रुआब**–पु. पाहा 'रोब'.
**रुआसा**–वि. रडवें.
**रुक**–वि. दाता, उदार.
**रुकना**–क्रि. अ. थांबणें, अडकून पडणें, अडून राहणें, चालण्याचा क्रम बंद पडणें.
**रुकवाना**–क्रि. स. आडकाठी करविणें, थांबविणें.
**रुकावा**–पु. आडकाठी, अडथळा.
**रुकावट**–स्त्री. आडकाठी, अडथळा.
**रुक़्क़ा**–पु. चिठ्ठी, पत्र, रोखा.
**रुक्ख**–पु. वृक्ष.
**रुक्न**–पु. स्तंभ, मुख्य कार्यकर्ता.
**रुक्म**–पु. सोनें, धोका रुक्मिणीचा भाऊ रुक्मी, सोन्याचा दागिना, लोखंड, नागकेशर. –वि. सोनेरी, तेजस्वी, उज्वल.
**रुख़**–पु. गाल, तोंड, कृपादृष्टि, पुढला भाग, हत्ती (बुद्धिबळ), वृक्ष, झाड, आकृति, तोंडाच्या आकृतीवरून प्रगट झालेली मनांतील इच्छा.–अ. कडे, समोर.
**रुखड़ा**–वि. गुळगुळीत नसलेला.
**रुख़सत**–स्त्री. आज्ञा, परवानगी, रजा, मोकळीक.–वि. कोठून तरी निघून गेलेला.
**रुख़सताना**–पु. निरोप देतांना द्यावयाचा पैसा.
**रुख़सती**–स्त्री. निरोप, पाठवणी (नवऱ्या मुलीची).
**रुख़सार**–पु. गाल.
**रुखाई**–स्त्री. रुक्षपणा, कठोरता, बेमुरवतपणा.
**रुखाना**–क्रि. अ. सुकणें, नीरस होणें.
**रुखानी**–स्त्री. गुण्या (सुताराचा).
**रुखौंहाँ**–वि. रुक्ष, शुष्क. [वलेला, आजारी.
**रुग्ण, रुगन**–वि. मोडलेला, पीडित, वांक-
**रुच, रुचा**–स्त्री. आवड, प्रकाश, तेज, सौंदर्य, कांति, रंग, इच्छा, वीज, पोपट मैनेचें गाणें.

**रुचक, रुचकर**–वि. सुखकर, क्षुधावर्द्धक, तिखट, उत्कट. –पु. महाळुंग, कबूतर, एरंड, कवडा, निष्क, दांत, कंठभूषण, कंठी, क्षुधावर्द्धक औषध, माळ, अश्वाभरण, देऊळ, काळें मीठ, टांकणखार, सज्जीखार, मंगल द्रव्य, गोरोचन, संचळखार, वावडिंग.

**रुचना**–क्रि. अ. रुचणें, पसंत पडणें.

**रुचरुच**–अत्यंत चर्वानें.

**रुचि, रुची**–स्त्री. इच्छा, तल्लीनता, आवड गोरोचन, प्रजापति प्रवृत्ति, प्रेम, किरण, शोभा, भूक ,स्वाद, सौंदर्य, तेज,कांति, चव, एका अप्सरेचें नांव. –वि. योग्य, शोभलेला.

**रुचिर**–वि. तेजस्वी, सुंदर, प्रसन्न, चवदार, क्षुधा वर्धक. –पु. केशर, लवंग, मुळा, रुपें.–स्त्री. गोरोचन.

**रुचिराई**–स्त्री. सौंदर्य, रुचिरता. [कोड.

**रुज, रुजा**–पु. भांग, वेदना,जखम,श्रम,मेंढी,

**रुजना**–क्रि. स. मोडणें, दुःख देणें, हत्या- [करणें.

**रुजी**–वि. अस्वस्थ, आजारी.

**रुजू**–वि. कार्यमग्न, तल्लीन.–स्त्री. प्रवृत्ति, परतणें, हायकोर्टांत दुसऱ्यांदा होणारी सुनावणी. [भरून निघणें.

**रुझना**–क्रि. अ. रुजणें, अडकणें, घाव,

**रुझान**–स्त्री. प्रवृत्ति, संदेह, वळण, कल.

**रुठ**–पु. राग, क्रोध.

**रुठना**–क्रि. स. रागावणें. [करणें.

**रुठाना**–क्रि. स. नाराज करणें, नाखुश

**रुत**–स्त्री. ऋतु. –पु. किलबिलाट, ध्वनि.

**रुतबा**–पु. पदवी, हुद्दा, दर्जा, प्रतिष्ठा, मान.

**रुदन**–पु. रडें.

**रुदराछ, रुदराच्छ, रुद्राक्ष** –पु. रुद्राक्ष.

**रुद्र**–वि. भयंकर. –पु. गणदेवता, शंकराचे ११ अवतार, आर्द्रानक्षत्र, वन्हि, अकराची संख्या,शंकराचें एक रूप, रौद्ररस.

**रुद्राणी**–स्त्री. पार्वती,अकरा वर्षांची मुलगी.

**रुधिर**–पु. मंगल, रक्त, केशर.–वि. तांबडे.

**रुनझुन,रुनुकझुनुक**–स्त्री. रुणझुण, झंकार.

**रुनित**–वि. रुणझुण आवाज करणारें.

**रुपना**–क्रि. अ. रुतणें, रोवलें जाणें.

**रुपया**–पु. रुपाया, धन.

**रुपया पैसा**–पु. धन.

**रुपसी**–स्त्री. सुंदरी.

**रुपहला**–वि. पांढरा, रुपेरी. [रुबा).

**रुबा**–वि. चतुर्थांश, चोरणारा (जसें –दिल-

**रुबाई**–स्त्री. चार चरणांचा श्लोक.

**रुमंच**–पु. रोमांच.

**रुमाली**–स्त्री. काचा (लंगोटी), छाटी.

**रुराई**–स्त्री. सौंदर्य.

**रुरुआ, रुरुवा**–पु. मोठें घुबड.

**रुलना**–क्रि. अ. भटकणें. [भटकविणें.

**रुलाई,रुवाई**–स्त्री. रडें.

**रुलाना**–क्रि. स. रडविणें, वाईट करणें,

**रुवा**–पु. एक किडा (याला बुलबुल खातात), एक फूल.

**रुसवा**–वि. निंदित, अपमानित.

**रुसूख**–पु. दृढता, धैर्य, स्नेह, विश्वास.

**रुसूम**–पु. नियम, चाल, प्रथा, वर्षासन.

***रुस्तम**–पु. इराणांतील एक प्रसिद्ध पहेलवान, शूर व्यक्ति.

**रुस्तमी**–स्त्री. शौर्य, वीरता, जबरदस्ती.

**(छिपा) रुस्तम**–दिसण्यांत साधा पण अत्यंत शूर.

**रुह**–वाढणारें (समासांतीं, जसें–भूमिरुह- जमीनींत वाढणारें,) वृक्ष.

**रुहा**–स्त्री. लता.
**रुहठि**–स्त्री. रुसवा, राग, घुस्सा.
**रुहिर,, रुधिर**–पु. रक्त.
**रूंख**–पु. वृक्ष.
**रूँगटा**–पु. रोमांच.
**रूँधट**–स्त्री. मळ, घाण.
**रूँध,रूद्ध**–वि. वेष्टिलेलें, वेढलेलें.
**रूँधना**–क्रि. स. अडविणें, घेरणें.
**रू**–पु. चेहरा, आकृति.–स्त्री. कारण. तळ.
**रूई**–स्त्री. कापूस. [पुढचा भाग, आशा.
**रूईदगी**–स्त्री. वनस्पती.
**रूईदार**–वि. कापसाचा.
**रूए**–स्त्री. चेहरा, कारण.
**रूएदार**–स्त्री. पाहा 'रूदाद.'
**रूक्ष**–वि. कठिण, खडबडीत, खरखरीत, कर्कश, रखरखीत, कोरडें, अस्निग्ध (अन्न. इ.),उंच सखल, निर्दय, मुकलेलें, कोमजलेलें.–पु. वृक्ष, मिरीं.
**रूख**–वि. पाहा 'रुक्ष'. –पु. झाड.
**रूखड़ा**–पु. झुडुप, रोपटें.
**रूखा**–वि. रुक्ष, शुष्क, बेचव, निरस, खडबडीत, उदास, विरक्त.
**रुखा जवाब**–नाकारणें, स्पष्ट सांगणें.
**रूखासूखा**–ओलें कोरडें, जें मिळेल तें.
**रूखा पड़ना या होना**–रागावणें, उद्धटपणा करणें, उदासीनता प्रकट करणें.
**रूखाफीका**–वि. बेचैन, उदास.
**रूखापन**–पु. शुष्कपणा, रुक्षता.
**रूखी**–स्त्री पाहा 'रूखा'.
**रूझना**–क्रि.अ. गुंतणें.
**रूठ,रूठन**–स्त्री. रुसवा, राग.
**रूठना**–क्रि. अ. रुसणें, नाखुश होणें.
**रूठनि**–वि. रुसवा, राग.

**रूड़, रूड़ा**–वि. सुंदर, श्रेष्ठ.
**रूढ**–वि. उत्पन्न झालेला, वाढलेला, वृद्धिगत, गाढ, विस्तृत, गादीवर घातलेलें, प्रसिद्ध ,चालू, प्रचलित.
**रूढि**–स्त्री. वाढ, उत्पत्ति, प्रसार, सिद्धि, कीर्ति, चाल, प्रघात, केवळ लोकांच्या संकेतावरून ठरलेला अर्थ.
**रूदाद**–स्त्री. समाचार, विवरण, दशा, कोर्टांतील कामकाज.
**रूप**–पु. चेहरा, सौंदर्य. वेष, लक्षण, रुपें, स्वभाव, शरीर, दशा, समान, रूपक. –वि. रूपवान.
**रूप**–वि. अनुरूप. साजेसें. जसेंच्या तसें, मोडतोड न झालेलें. –पु. आकार, रूप, चेहरा, लक्षण, स्वरूप, चक्षुरिंद्रियाचा विषय, रंग व आकार, दृश्य पदार्थ, सौंदर्य, मूळ धर्म, स्वभाव, रुपें, रुपया, नाणें, प्रकार,पद्धत,चिन्ह, जात,लक्षण, प्रतिबिंब, प्रतिमा, सादृश्य, कित्ता, नामाचें किंवा धातुचें प्रत्यय लावल्यावरचें रूप, एक संख्या. व्यक्त (संख्या), व्यक्त संख्या (अंक), रूपक ५, अध्ययन, शब्द, खिल्लार, पशु, कविता.
**रूपाजीवा**–स्त्री. वेश्या.
**रूपाश्रय**–वि. अतिसुंदर.
**रूपक**–वि. मूर्त.–पु. रुपया, आकार, खूण, वर्ग, जात, अभिनय प्रदर्शक दृश्य काव्य. –वि. अलंकार, तीन गुंजा वजन, दृष्टांत, प्रदर्शन.
**रूप बनाना–रखना–लेना**–वेष धारण करणें.
**रूप धरना–भरना–हरना**–हुबेहूब रूप घेणें, रूप रचना करणें.

**रूपराशि**–वि. सुंदर, मनोहर.
**रूपहला**–वि. रुपेरी.
**रूपा**–पु. रुपें, पांढरा घोडा.
**रूपी**–वि. रूपवान, सारखें.
**रूपोश**–वि. गुप्त, फरारी. [आज्ञा पत्र.
**रूबकार**–पु. सादर करणें, कोर्टाचा हुकूम,
**रुबराह**–वि. तयार, दुरुस्त केलेला.
**रूबरू**–अ. प्रत्यक्ष, समोरासमोर.
**रूम**–पु. तुर्कस्थान, निर्णयपत्र.
**रूमटी**–स्त्री. वहाणा.
**रूमना**–क्रि. अ. झुलणें.
**रूमाल**–पु. रुमाल, चौकोनी शाल.
**रूमी**–वि. तुर्की.
**रूरना**–क्रि. अ. रडणें, आरडा ओरड करणें.
**रूरा**–वि. सुंदर, श्रेष्ठ (पुरुष).
**रूरिआयत**–स्त्री. पक्षपात, तरफदारी.
**रूरी**–स्त्री. सुंदर स्त्री.
**रूशनास**–वि. परिचित.
**रूस**–पु. रशिया.
**रूसना**–क्रि. अ. रुसणें, रागावणें.
**रूसा**–पु. रोहिस गवत (रोहसेल या पासून निघतें.)
**रूसियाह**–वि. पाणी, काळतोंड्या, अपराधी, अपमानित. [–वि. रशियाचा.
**रूसी**.–स्त्री. भुशा सारखा डोक्यांतील मळ.
**रूह**–स्त्री. आत्मा, जीव, एक अत्तर, सत्त्व, चित्त, आंतरिक इच्छा.
**रूहे अफ़ज़ा**–वि. आनंद देणारा.
**रूह कॉपना**–फार भिणें.
**रूह निकलना**–मरणें, मृतासारखें होणें.
**रूह निकालना**–सत्त्व काढणें, प्राण घेणें.
**रूह फूँकना**–नवचतन्य आणणें, जागृति आणणें.
**रूह भटकना**–फार इच्छा होणें, सद्गति न
**रूह फना होना**–घाबरगुंडी उडणें. [मिळणें.
**रूहना**–क्रि. अ. उसळणें, वाढणें, घेरणें.
**रूहानी**–वि. आत्म्यासंबंधी. [गाणें.
**रेंकना**–क्रि. अ. गाढवाचें ओरडणें, बेसूर
**रेंगटा**–पु. गाढवाचें पोर. [चालणें.
**रेंगना**–क्रि. अ. सरपटणें, चालणें, सावकाश
**रेंगावना**–क्रि. स. हळूहळू सरकविणें किंवा
**रेंट**–पु. नाकांतील मळ. [चालविणें.
**रेंड़**–पु. एरंडाचें झाड.
**रेंड़ी**–स्त्री. एरंडी (बी).
**रेंहकना**–क्रि. स. रेंकणें (गाढवाचें).
**रे**–अ. अरे (संबोधन).
**रेख,रेखा**–स्त्री. रेघ, चिन्ह, चित्र काढणें, रांग, तृप्ति, कपट, भाग्य.
**रेख काढना**–रेघा ओढणें.
**रेख भींजना या भीनना**–मिसरूड फुटणें.
**(रूप) रेखा**–आकृति.
**रेखता, रेख़्ता**–पु. गजल काव्याचा एक प्रकार, दक्षिणी हिंदीचा एक छंद, दिल्लीची उर्दू भाषा, चुन्यानें बनलेली भिंत.–वि. पडलेला,आपोआप तोंडांतून निघालेला (शब्द.)
**रेखना**–क्रि. स. रेखाटणें, खरवडणें.
**रेखा**–स्त्री. ओळ, रेघ,आराखडा, मोजणी, आकार, तळहातावरील रेषा.
**रेखा खींचकर कहना**–ठांसून सांगणें, प्रति-
**रेग**–स्त्री. रेती, वाळू. [ज्ञेनें सांगणें.
**रेगिस्तान**–पु. वाळवंट. [तुकडे.
**रेज़गी, रेज़गारी**–स्त्री. चिल्लर, मोड, लहान
**रेज़ा**–पु. लहान तुकडा, कपड्याचें ठाण, धान, चोळी, गवंड्याबरोबर काम कर-
**रेजिश**–स्त्री. सर्दी. [णारा मुलगा.

**रेत**–स्त्री. रेती, वाळवंट. –पु. वीर्य, पारा, पाणी, बीज. [ गुळीत करणें.
**रेतना**–क्रि. स. कानशीनें घांसणें, गुळ-
**रेतहा**–पु. वाळवंट, पुलीन. –वि. रेताड.
**रेता**–पु. रेती, माती.
**रेती**–स्त्री. कानस, वाळवंट.
**रेतीला**–वि. रेताड, वालुकामय.
**रेनु**–पु. रेती, पृथ्वी, कण, अणुरेणु.
**रेल**–स्त्री. विपुलता, लोंढा, आगगाडी.
**रेलठे(पे)ल**–स्त्री. अधिकता, दाटी, गर्दी.
**रेलना**–क्रि. स. रेलणें, पुढें ढकलणें, अधाशी पणानें खाणें.–क्रि. अ. भरगच्च असणें.
**रेला**–पु. पाण्याचा लोंढा, हल्ला.
**रेलारेल**–स्त्री. धक्काधक्की, रेटारेटी, गर्दी.
**रेवंद**–पु. रेवंदचीनी (औषधिवृक्ष.)
**रेवड़**–पु. शेळ्यामेंढ्यांचा कळप, लेंढार.
**रेशम**–पु. रेशीम.
**रेशा**–पु. काथ्या, सालीवरील तंतू, आब्यां-
**रेसू**–पु. ईर्ष्या, संताप. [तील रेशा.
**रेह**–स्त्री. खार, खारी माती.
**रेहड़**–पु. भिरकें, लहान बैलगाडी,
**रेहन**–पु. गहाण. [ माळरान.
**रेहनदार**–पु. गहाण ठेवून घेणारा,सावकार.
**रेहननामा**–पु. गहाण खत.
**रेहल**–स्त्री. पोथी ठेवण्याची लाकडी कैंची.
**रेहला**–पु. फुटाणे.
**रैतुआ**–पु. रायतें.
**रैदास**–पु. रोहीदास साधु, चांभार.
**रैन,रैनि**–स्त्री. रात्र.
**रैनिचर**–पु. राक्षस.
**रैयत**–स्त्री. प्रजा.
**रैहर**–पु. तंटा, भांडण.
**रोंगटा**–पु. रोमांच, कांटा.
**रोंगटे खड़े होना**–रोमांच उभे राहणें.
**रोंगटी**–स्त्री. खेळांत बेइमानी करणें, किंवा
**रोंगी**–पु. चवळी. [ रागावणें.
**रोंट**–स्त्री. कपट, बहाणा.
**रोंटिया**–पु. कपटी, धूर्त, विश्वासघातकी.
**रोंधना**–क्रि. स. पायाखालीं तुडविणें. –वि. उगवणें, (जसें-खुदरो-आपोआप उगविणारें, गवत इ.).
**रोआ-वाँ-वा**–पु. रोमांच.
**रोआ (वा) ई**–स्त्री. रडारड, रड.
**रोआब**–पु. रुबाब, ऐट.
**रोक**–स्त्री. अडथळा, आडकाठी, अडथळा आणणारी वस्तु, मनाई, निषेध.
**रोकटोक**–स्त्री. अडथळा, मनाई.
**रोकड़**–स्त्री. रोख, जमा, भांडवल.
**रोकड़िया**–पु. खजिनदार.
**रोकना**–क्रि. स. अडविणें, थांबविणें, रोकणें, आडकाठी आणणें, पांघरणें,
**रोकू**–पु. विघ्नकर्ता. [ ताब्यांत ठेवणें.
**रोख**–पु. क्रोध, रोष.
**रोग**–पु. आजार.
**रोगन**–पु. पॉलिश, रोगण.
**रोगनजोश**–पु. मसालेदार मांस.
**रोगनी**–वि. रोगण लावलेलें.
**रोचक**–वि. स्वादिष्ट, मनोरंजक.
**रोचन**–वि. चकचकित, तेजस्वी, प्रकाशित करणारें, आवडतें, क्षुधावर्धक. –पु. पाचक पदार्थ, तांबडा कांदा.
**रोचना**–स्त्री. लाल कमळ, रक्त चंदन. –स्त्री. सुंदर स्त्री, वसुदेवाची बायको.
**रोज़**–पु. दिवस, एक दिवसाची मजुरी, मृत्युतिथि. –अ. नेहमीं, प्रतिदिनीं.
**रोज़गार**–पु. व्यापार, धंदा.

**रोजगारी**–पु. व्यापार धंदा करणारा, व्यापारी.
**रोजनामचा**–पु. दैनंदिनी, रोजनिशी.
**रोजमर्रा**–अ. नित्य, दररोज.–पु. व्यावहारिक बोली, भाषा.
**रोजा**–पु. उपवास, रमजान महिन्यांत मुसलमान करतात तो उपवास.
**रोजाखोर**–पु. उपवास न करणारा मनुष्य.
**रोजादार**–पु. उपवास करणारा.
**रोजाना**–अ. नित्य. [खर्च, मजुरी.
**रोजी**–स्त्री. उपजीविका, रोजचा जेवण-
**रोजीना**–पु. एक दिवसाची मजुरी,
**रोझ**–पु. नीलगाय. [मासिक वेतन.
**रोटिहा**–पु. पोटावारी नौकर, फुकटखाऊ.
**रोटी**–स्त्री. भाकरी,पोळी, स्वयंपाक, जेवण.
**रोटी कपड़ेको तरसना**–फार गरीब होणें.
**रोटी कपड़ेसे खबर लेना**–जेवण आणि कपडा देणें. [करणें.
**रोटी कमाना**–पोट भरण्याइतकें प्राप्त
**रोटीका मारा**–भुकेलेला, कंगाल.
**रोटीकी खाक झाड़ना**–उगीच खुशामत करणें. [मिळाल्यामुळें दुःखी होणें.
**रोटीको रोना**–नोकरी किंवा धंदा न
**रोटी चलना**–निर्वाह होणें.
**रोटियाँ तोड़ना**–फुकट बसून खाणें. [करणें.
**रोटी देना,रोटी कपड़ा देना**–पालन पोषण
**रोटी पर रोटी रखकर खाना**–आनंदानें जीवन निर्वाह करणें. [आपत्ति येणें.
**रोटियाँ लगना**–आपली पूर्व दशा विसरणें,
**रोटीदाल,रोटीपानी**–स्त्री. उपजीविका.
**रोड़ा**–पु. गोटा, लहान दगड.
**रोड़ी**–स्त्री. खडी.
**रोड़े अटकाना या डालना**–विघ्न आणणें.
**रोदसी**–स्त्री. भूमि.

**रोदा**–पु. धनुष्याची दोरी.
**रोधना**–क्रि. स. अडविणें, आडकाठी करणें.
**रोना**–क्रि. अ. रडणें, चिडणें.–वि. चिडका, रडया.–पु. दुःख.
**रोना गाना**–रडगाणें गाणें.
**रोना धोना**–आरडाओरड.
**रोना पीटना**–फार विलाप करणें.
**रो रो कर**–कसें तरी करून, रडून रडून.
**रोपन**–पु. लावणी, पेरणी.
**रोपना**–क्रि. स. रोप लावणें, उचलणें, बरा करणें (व्रण), रोवणें, पेरणें, घेण्याकरितां हात किंवा भांडें पुढें करणें, अडविणें.–पु. तेलफळ (लग्नांत).
**रोपनी**–स्त्री. लावणी (धान्य).
**रोब**–पु. रुबाब, वचक, वजन, ऐट.
**रोब छा जाना**–दरारा बसणें.
**रोब टपकना**–मुखावर तेज चमकणें.
**रोब में आना**–धाकामुळें एकादी गोष्ट करणें, भीति बाळगणें.
**रोबदाब**–पु. प्रभाव. [पीस.
**रोम**–पु. लव (शरिरावरील केस), पक्ष्यांचें
**रोमावलि,रोमराजि, रोमलता**–स्त्री. छाती
**रोयाँ**–पु. रोम. [वरील केस.
**रोयाँ पसीजना**–दया येणें. [काळीं).
**रोया**–पु. स्वप्न. –क्रि. अ. रडला (भत-
**रोर**–स्त्री. आरडाओरड, दंगल. –वि. उपद्रवी, अत्याचारी.
**रोरी,रोली**–स्त्री. कुंकू, धामधूम, गव्हाचा रोग. –वि. सुंदर. –पु. एक रत्न.
**रोल**–स्त्री. कोलाहल, ध्वनि. –पु. पाण्याचा प्रवाह. [करणें.
**रोलना**–क्रि. स. सपाट करणें, समतल
**रोला**–पु. गोंगाट, तुंबळ युद्ध, एक छंद.

**रोली**–स्त्री. गंधाचा रवा.
**रोवनहार**–वि. रडणारा,माणूस मेल्यानंतर त्याच्याबद्दल शोक करणारा कुटुंबी.
**रोवना**–क्रि. अ. रडणें. –वि. चिडखोर.
**रोवनी धोवनी**–स्त्री. शोक, रडवेपणा.
**रोवासा**–वि. रडवा, रडचा.
**रोशन**–वि. प्रकाशित,प्रकट, प्रसिद्ध,जाहीर.
**रोशनचौकी**–स्त्री. सनई. वाजंत्री.
**रोशनदान**–पु. खिडकी, झरोका.
**रोशन दिमाग**–पु. बुद्धिमान, तपकीर.
**रोशनाई**–स्त्री. शाई,प्रकाश, गुळगुळीतपणा.
**रोशनी**–स्त्री. उजेड, प्रकाश, ज्ञान, दिवा, दीप माळेचा प्रकाश, ज्ञानाचा प्रकाश.
**रोष**–पु. राग, चीड, वैर, लढाईचा आवेश.
**रोस**–पु. रोष.
**रोह**–वि. वाढणारें, बसणारा. –पु. वाढ, उंची, अंकुश, उत्पत्ति करणारा. स्वार.
**रोहज**–पु. डोळा.
**रोहिणी, रोहिनी**–स्त्री. रोहिणी नक्षत्र, गाय, वीज, बलरामाची आई, नऊ वर्षांची कन्या, गंडमाळा.
**रोहू**–स्त्री. मोठा मासा.
**रौंद**–स्त्री. तुडवणें, तुडवातुडवी.
**रौंदना**–क्रि. स. चिरडणें, तुडविणें.
**रौ**–स्त्री. वेग,गती, झोक, ओढ (पाण्याची).
**रौजन**–पु. झरोका. [–पु. ध्वनि.
**रौजा**–पु. समाधिस्थान.
**रौताइन**–स्त्री. सरदारीण, स्वतःची स्त्री.
**रौताई**–स्त्री. सरदारकी.
**रौद्र**–वि. प्रचंड, भयंकर, ऊग्र, तामसी, रुद्रसंबंधी. –पु. शैव,क्रोध, भयानक रस, हिंवाळा, यम. भयानकपणा, उष्णता.
**रौन**–पु. पति.–वि. रमणीय.[–स्त्री. गौरी.
**रौनक**–स्त्री. शोभा, कांति, विकास.
**रौनी**–स्त्री. सुंदर स्त्री. [नरकस्थान.
**रौरव**–वि. चंचल, धूर्त, भयंकर. –पु.
**रौरा**–पु. गोंगाट, धामधूम. –स. आपला.
**रौराना**–क्रि.स. विलाप करणें, बडबडणें.
**रौरे**–स. आपलें.
**रौला**–पु. आरडाओरड.
**रौलि**–स्त्री. थप्पड. [पायवाट.
**रौस**–स्त्री. चाल, वेग, वाफ्यांच्या मधली
**रौहल**–स्त्री. घोड्याची एक जात,घोड्याची
**रौही**–स्त्री. हरिणी. [एक चाल.

## [ ल ]

**लंक**–स्त्री. कंबर, लंका.
**लंकलाट**–पु. एक उत्तम पांढरें वस्त्र.
**लंकाल**–पु. सिंह.
**लंकेस**–पु. रावण.
**लंग**–स्त्री. कासोटा.–पु. लंगडेपणा.
**लँगड़ा**–वि. लंगडा.
**लंगड़ाना**–क्रि. अ. लंगडणें.
**लंगर**–पु, नांगर (जहाजाचा), रद्दी सामान, लोढणें, लोंबणारी एकादी जड वस्तु, लोखंडाची जाड व जड साखळी, चांदीचा तोडा, पेहेलवानाचा लंगोट, धागादोरा, गरीबांना वाटावयाचें अन्न, अन्नछत्र.–वि. जड, द्वाड.
**लंगर उठाना**–जहाजाला रवाना करणें, गलबताचें रवाना होणें.
**लंगर करना**–द्वाडपणा करणें, गलबत
**लंगरखाना**–अन्नछत्र. [नांगरणें.
**लंगरगाह**–बंदर. [अन्न दिलें जाणें.
**लंगर जारी होना, लंगर बँटना**–गरीबांना
**लंगर डालना**–गलबत नांगरणें, बोझा टाकणें, कैद्याच्या पायांत बेडी टाकणें.

**लंगर बाँधना**–ब्रह्मचारी राहणें, लंगोट बांधणें.

**लंगर लंगोटा आगे धरना**–पहलवानाला [वस्ताद मानणें.

**लंगूर**–पु. वानर, शेपूट, एक प्रकारचा काळया तोंडाचा वानर.

**लंगूरफल**–पु. नारळ.

**लंगूल**–पु. शेपटी.

**लंगोट**–पु. लंगोट, कुस्तीचा डाव.

**लंगोटबंद**–वि. ब्रह्मचारी.

**लंगोट बाँधना**–कुस्ती लढायला तयार होणें.

**लंगोटी**–स्त्री. लंगोटी, कौपीन्.

**लंगोटी बाँधे फिरना**–लहान बाळ होणें, गरीब असणें.

**लंगोटीया यार**–बालमित्र, लंगोटीमित्र.

**लंगोटी बँधा देना**–कोणाचें सर्वस्व घेणें, भिकारी बनवणें.

**लंगोटी में फाग खेलना**–आवाक्याबाहेर [खर्च करणें.

**लंघन**–पु. उपवास, ओलांडण्याची क्रिया, अतिक्रमण.

**लंघना**–क्रि. अ. ओलांडणें, उडी मारणें.

**लंठ**–वि. मूर्ख.

**लंडूरा**–वि. शेपूट तुटलेलें.

**लंतरानी**–स्त्री. बढाई.

**लंपट**–पु. रंडीबाज.–वि. व्यभिचारी, हावरा, आधाशी, अतिलोभी, आसक्त.

**लंबतडंग**–वि. ताडासारखा उंच.

**लंबा**–वि. उंच, लांब, विशाल.–स्त्री. दुर्गा, लक्ष्मी, कडू दुधी.

**लंबा करना**–आपटणें, पाठवून देणें.

**लंबा होना**–पाय लांब करून पडणें, पसार होणें, पळून जाणें.

**लंबा चौड़ा**–वि. लांबरुंद, विस्तृत.

**लंबा तडंगा**–वि. उंच टांग्या.

**लंबाई**–स्त्री. लांबी, लांवण, अंतर.

**लंबाई चौड़ाई**–स्त्री. लांबी रुंदी.

**लंबी**–स्त्री. उंच स्त्री, लांबी.

**लंबियान भरना**–घोडयांचे किंवा पक्ष्यांचें पळून किंवा उडून अदृश्य होणें. [दाखविणें.

**लंबियान लेना**–लौकर चालणें, मोठेपणा

**लंबी तानकर सोना**–निश्चित झोपणें.

**लंबी तानना**–झोपणें, मरणें.

**लंबी चौड़ी हाँकना**–फार शेखी मिरवणें.

**लंबी साँस लेना**–दुःखी होणें.

**लंबे लंबे डग रखना**–लवकर चालणें.

**लअन तअन**–स्त्री. शिव्या आणि टोमणे.

**लक दक, लक्क हक्क**–वि. उजाड (मैदान), आडंबरपूर्ण.

**लक्कड़तोड़ बातें**–मूर्खपणाच्या गोष्टी.

**लकड़बग्घा**–पु. तरस, लांडग्यापेक्षां मोठा जंगली प्राणी. [विक्या.

**लकड़हारा**–पु. लाकुडतोडया, मोळी-

**लकड़ा**–पु. ओंडा.

**लकड़ी**–स्त्री. लाकूड, लाठी, काठी.

**लकड़ी चलना**–मारामारी होणें.

**लकड़ी पकड़ना**–मदत करणें.

**लकड़ी फेंकना**–दांडपट्टा खेळणें.

**लकड़ी लेकर सीधा हो जाना**–काठी घेऊन मारायला तयार होणें.

**लकड़ी होना**–अतिशय वाळून जाणें, सुकून कठीण होणें.

**लकनक**–स्त्री. तोतरेपणा, रोग किंवा नशेमुळें अडखळत बोलणें.

**लकब**–पु. पदवी, उपनांव खोड, दुर्गुण.

**लकलक**–पु. सारस पक्षी.–वि. हरीण.

**लकलका**–पु. सारस पक्ष्याची बोली, साप

वगैरेची वारंवार जीभ हालवण्याची क्रिया, उच्च आकांक्षा, प्रभाव.
**लकवा**—पु. अर्धांगवायु.
**लकसी**—स्त्री. फळें तोडण्याची आंकडी. —पु. लक्षाधीश.—वि. लाखी रंगाची.
**लकीर**—पु. रेघ, किनार, ओळ. [गतानुगतिक.
**लकीर का फकीर**—नाकासमोर चालणारा,
**लकीर पीटना**—अंधश्रद्धेनें चालणें, वेळेवर काम न करतां मागाहून पश्चात्ताप करणें.
**लकीर खींचना**—बरेंवाईट सांगणें, चिन्ह करणें. [एक वृक्ष.
**लकुट, लकुटिया**—स्त्री. काठी, छडी,
**लकुटी**—स्त्री. छडी.
**लक्कड़-र**—पु. ओंडा, लांकूड. [कबुतर.
**लक्का**—पु. पंख्यासारखी शेपटी असलेलें
**लक्ष**—पु. निशाण, लक्ष्य, लाख (संख्या), चिन्ह, कपट.
**लक्षण**—पु. जाणण्याचें साधन, खूण, चिन्ह, रोगचिन्ह, शुभाशुभचिन्ह, नांव, सद्‌गुण, शुभ चिन्ह, निर्णायक गोष्ट, व्याख्या, विशिष्ट गुणधर्म इ., कारण, प्रसंग, परिणाम, विषय, प्रतिपाद्य विषय, हेतु, ध्याय, अध्याय, प्रकरण, लक्ष्मण, बगळा, शरीरावरील एक विशेष प्रकारचें चिन्ह.
**लक्षणा**—स्त्री. उद्देश, वाच्याहून निराळा पण तत्संबद्ध अर्थ, सारसी, हंसी, एका अप्सरेचें नांव. [जाणणारा.
**लक्षणी**—वि. चिन्ह असलेला, सामुद्रिक
**लक्षना**—क्रि. स. जाणणें, पाहणें.—स्त्री.
**लक्षि**—स्त्री. लक्ष्मी.—पु. लक्ष. [लक्षण.
**लक्ष्मी**—स्त्री. सुदैव, सौंदर्य, तेज, हळद, मुरड शेंग, शमी, विष्णुची पत्नी, संपत्ती शोभा, पार्वतीचें एक नांव, वीरपत्नी, राजस शक्ति, एक वर्णवृत्त, गृहस्वामिनी, सिद्धि, यश, धन, अमानुष शक्ति.
**लक्ष्य**—पु. उद्देश्य, नेम धरण्याचें स्थान, चिन्ह, लक्षणेनें आलेला अर्थ, ज्याची व्याख्या केली ती वस्तु, ढोंग, मिष, लक्ष (संख्या). —वि. दृश्य, अनुमान करण्याजोगें, ज्ञेय. [लक्षाधीश.
**लक्खी**—वि. लाखी रंगाचें. —पु. एक घोडा,
**लख**—क्रि. स. पाहा. —वि. एक लाख. —पु. लाख, लक्ष.
**लखन**—पु. लक्ष्मण. —स्त्री. पाहाणें.
**लखना**—क्रि. स. पाहाणें, ताडणें.
**लखपती**—पु. लक्षाधीश.
**लखलखा**—पु. शुद्धीवर आणण्यासाठी उपयोगांत आणली जाणारी वल्ली.
**लखलखाना**—क्रि. अ. धापा टाकणें.
**लखलूट**—वि. खर्चिक, उधळ्या.
**लखाउ**—पु. खूण, लक्षण, चिन्ह, ओळख पटण्यासाठीं खूण म्हणून दिलेली वस्तु.
**लखाना**—क्रि. अ. दिसणें. —क्रि. स. दाखविणें, कल्पना देणें.
**लखव**—पु. चिन्ह.
**लखिमी**—स्त्री. पाहा 'लक्ष्मी'.
**लखिया**—पु. प्रेक्षक, अनुमान करणारा.
**लखी**—पु. लाल घोडा.
**लखेरा**—पु. लाखेचें काम करणारा कारागीर.
**लखौट**—स्त्री. लाखेची बांगडी.
**लखौटा**—पु. केशराची उटी. कुंकू वगैरे ठेवण्याची पेटी.
**लखौरी**—स्त्री. लाखेची वस्तु, भ्रमरी, लहान पातळ वीट, लाखोली.
**लख्त**—पु. तुकडा.
**लख्ते जिगर, लख्ते दिल**—वि. संतान.
**लग**—अ. पर्यंत, जवळ, साठीं, सह. —स्त्री. [प्रेम.
**लगकर**—मनापासून, लागून.

**लग चलाना**—बरोबर चालणें, चिकटणें, स्नेहसंबंध जोडणें.

**लग जाना**—एकाचे दोष दुसऱ्यावर येणें, चिकटणें, प्रभाव होणें, भरणें, येणें, जळणें, खाऊन टाकणें, लक्ष देणें, टोंचणें.

**लगजिश**—स्त्री. पाय घसरून पडण्याची क्रिया, चूक, बोलतांना अडखळणें.

**लगड़**—पु. ससाणा.

**लगढग**—अ. जवळ जवळ. [पाडणारा.

**लगता हुआ**—सारखा, टोंचेल असा, प्रभाव

**लगती**—वि. बोचणारी, प्रभाव पाडणारी, सारखी. [बोचणारी गोष्ट.

**लगती लगाती बात**—वेळेप्रमाणें बोलणें,

**लगन**—स्त्री. छंद, ध्यान, तळमळ, प्रेम, समई. —पु. विवाह, मुहूर्त, लग्नसराई, मोठें ताट. [होणें.

**लगन चढ़ना**—लग्नाची तिथि निश्चित

**लगनपत्री**—स्त्री. लग्नचिठी.

**लगन लगना**—प्रेम उत्पन्न होणें, विचार

**लगनवट**—स्त्री. प्रेम. [येणें, लक्ष लागणें.

**लगना**—क्रि. अ. लागणें, वाटणें, जुळणें, नीट ठेवणें, टिकणें, खर्च होणें, कळणें, सडणें, असणें, सुटणें (प्रश्न), पान्हवणें (गाय, शेळी इ.).

**लगनि**—स्त्री. पाहा 'लगन'.

**लगनी**—स्त्री. ताट, परात, वशी.

**लगभग**—अ. बहुधा, जवळ जवळ, सुमारें.

**लगमात**—स्त्री. मात्रा (गुरु वा लघु).

**लगर**—पु. घारीसारखा एक शिकारी पक्षी.

**लगलग**—वि. नाजुक, हडकुळा. —पु. सारस.

**लगव**—वि. खोटें, निःसार.

**लगवाना**—क्रि. स. लावविणें.

**लगवार**—पु. प्रियकर, जार.

**लगा**—लागून, चिकटलेला, सडलेला.

**लगा चलना**—मारणें, वार करणें, जवळ

**लगातार**—अ. एकसारखें, अखंड. [चालणें.

**लगा देना**—चिकटविणें, चिरडणें, लपविणें, फसविणें, डावावर लावणें, मिळविणें, चहाडी करणें, थांबविणें. [ण्याची क्रिया.

**लगान**—पु. शेतसारा, कर, महसूल, लाव-

**लगाना**—क्रि. स. लावणें, जोडणें, सोडविणें (गणित इ.), लावणें (भाव), चिकटविणें, खचिणें, मारणें, दूध काढणें, सांगून बहकविणें, रचणें. संमिलित करणें, आघात करणें, मारणें, प्रज्वलित करणें, नेमणूक करणें, पुरणें, स्पर्श करणें, गर्व करणें, परिधान करणें.

**लगाई बुझाई**—चहाडी, दोषारोप. [लावणें.

**लगाई बुझाई करना**—चहाडी करणें, भांडण

**लगा कर कहना**—टोंचून बोलणें.

**लगाना बुझाना**—भांडण लावणें.

**लगानेवाला**—वि. निंदा करणारा, भांडण लावणारा. [प्रेमी, आज्ञा पालक, कैदी.

**लगाबँधा**—बांधलेला, जुना नोकर किंवा

**लगाम**—स्त्री. लगाम, लगामाच्या दोऱ्या.

**लगाम चढ़ाना या देना**—घोड्याला लगाम लावणें, एकाद्याला थांबविणें किंवा गप्प करणें.

**लगायत**—अ. सहित, पर्यंत, शेवटपर्यंत.

**लगाम पर हाथ डाल देना**—लगाम धरून स्वाराला थांबविणें, पुढें जाऊं न देणें, नको म्हणणें. [भेदी.

**लगार**—स्त्री. हप्ता, क्रम, संबंधी, प्रेम,

**लगा रखना**—वांचवून ठेवणें, ठेवणें, आशेंत ठेवणें, लपवून ठेवणें, फुकट ठेवणें, जवळ ठेवणें.

**लगा रहना**–गुंतून रहाणें, बरोबर रहाणें, चिकटून रहाणें, मागें लागून राहणें.
**लगालगी**–स्त्री. प्रेम, आवड, संबंध.
**लगा लाना**–फसवून आणणें.
**लगा लेना**–गणित सोडविणें, नोकरीवर लावणें, बरोबर घेणें, कामांत गुंतविणें, [आरंभ करणें.
**लगाव**–पु. संबंध.
**लगावट**–स्त्री. संबंध, नातें, प्रेम.
**लगावट करना**–प्रेम करणें, आकर्षित करणें, [प्रेम दाखविणें.
**लगावन**–स्त्री. संबंध.
**लगावना**–क्रि. स. पाहा 'लगाना'.
**लगि**–अ. पाहा 'लग'.
**लगुआ**–पु. मित्र, प्रियकर.
**लगुड़**–पु. सोटा, छडी.
**लगूर, लगूल**–पु. वानर, शेपूट.
**लगे**–अ. पाहा 'लग'.
**लगे हाथों**–त्याचबरोबर, बरोबरीनें.
**लगो**–वि. कृत्रिम, खोटें.
**लगौहाँ**–वि. प्रेमी.
**लग्गा-ग्घा**–पु. शेकाटा, आंकडी (फळें तोडण्याची), कार्यारंभ. झेला (आंबे काढण्याचा).
**लग्गा खाना**–बरोबर होणें, बरोबरी करणें.
**लग्गी लगाना**–प्रेम करणें, आरंभ करणें, प्रेम करण्याचा दोष लावणें.
**लग्घड़**–पु. चित्ता, ससाणा.
**लग्न**–पु. शुभ कार्याचा मुहूर्त, विवाहाची वेळ, विवाहाचे दिवस, विवाह, जोतिष शास्त्राप्रमाणें एकाद्या राशीचा उदय. –वि. लागलेला, लज्जित, आसक्त. –स्त्री. पाहा 'लगन'.
**लग्नका**–स्त्री. नागवी स्त्री.
**लग्वियात**–स्त्री. वाह्यात व खोट्या गोष्टी.
**लघु**–वि. शीघ्र, लहान, सुंदर, निःसार, थोडें, हलकें, नीच क्षुल्लक, सहज पचणारें, सौम्य, मंद, इष्ट, अल्पवयी, परिवारशून्य, नीरस, दुर्बळ, शुद्ध. –अ. तिरस्कारानें, जलदीनें. –स्त्री. स्पृक्का. –पु. व्याकरणांतील लघुस्वर, वाळा (वनस्पति).
**लघुताई, लघुता**–स्त्री. नम्रता, लहानपण, नीचता, विचार शून्यता, हीन कुलोत्पत्ति.
**लचक**–स्त्री. लवचिकपणा, लचक.
**लचकना**–क्रि. अ. वांकणें, लचकणें, नमणें.
**लचकनि**–स्त्री. मुरका, लचक, लवचिकपणा.
**लचना**–क्रि. अ. लचकणें, मुरडणें, नमणें.
**लचर**–वि. गुळमुळीत, बुळगा, अस्ताव्यस्त,
**लचार**–वि. अगतिक, निरुपयोगी. [ढिलें.
**लचारी**–स्त्री. लाचारी. –पु. नजराणा, एक प्रकारचें गीत.
**लचीला**–वि. नरम, लवचिक. [निशाण.
**लच्छ**–पु. बहाणा, एक लाख, लक्ष,
**लच्छन**–पु. लक्षण, रीतभात, वर्तणूक, चिन्ह. [पालटणें, तेज जाणें.
**लच्छन झड़ना**–वाईट दिवस येणें, स्थिति
**लच्छा**–पु. गुच्छ (तारेचा), मुळका (कोणत्याही वस्तूचा). एक दागिना, साखळी (पायांतील), एक मिठाई, हलकें केशर. [केलेला, गुणांनीं युक्त.
**लच्छित लक्षित**–वि. पाहिलेला, चिन्ह
**लच्छी**–पु. एक घोडा. –स्त्री. लक्ष्मी, लडी.
**लच्छेदार**–वि. गुंतागुंतीचा, साईची (बासुंदी), गोड गोड (गोष्टी), गोळे असलेला गोड व दाट खाद्य पदार्थ.
**लच्छेदार बातें**–गोड गोष्टी, गुंतागुंतीच्या गोष्टी.

**लछन, लक्षण**–पु. लक्षण, चिन्ह.
**लछमन**–पु. लक्ष्मण.
**लछमन झूला**–दोऱ्यांचा किंवा तारांचा [पूल.
**लज**–स्त्री. लाज.
**लजना**–क्रि.अ. लाजणें.
**लजलजा**–वि. चपचपित.
**लजवाना**–क्रि. स. लाजविणें.
**लजाना**–क्रि. अ. लाजणें.–क्रि.स. लाजविणें.
**लजालू**–पु. लाजाळूचें झाड.
**लजाव**–क्रि. स. लाज.
**लजावना**–क्रि. अ. लाजविणें.
**लजियाना**–क्रि. स. लाजविणें.
**लजीज**–वि. स्वादिष्ट, चवदार.
**लजीला**–वि. लाजलेला, लाजरा.
**लजुरी**–स्त्री. विहिरींतून पाणी काढण्याची [दोरी.
**लजोर,लजोहा,लजौहाँ**–वि. लाजाळू.
**लज्जत**–स्त्री. स्वाद,आनंद, सुख.
**लज्जा**–स्त्री. लाज, विनय, मर्यादा, श्वेत [लाजाळू.
**लज्जालु**–वि. लाजाळू. –स्त्री. लाजाळूचें झाड.
**लट**–स्त्री. लहान किडे, केसांची बट, ज्वाला, ठोंब्या, दोष, खोड, चोर,
**लट छिटकाना**–केस मोकळे सोडणें.
**लटक**–स्त्री. नखरा, मुरका, लोंबणें.
**लटक कर चलना**–हावभाव करीत चालणें.
**लटकन**–पु. नथेचा चौकडा, तुऱ्यांतील रत्नांचा गुच्छ, एक वृक्ष, कच्छपी लागलेला माणूस.
**लटकना**–क्रि. स. लोंबकळणें, वांकणें, लचकणें, उशीर होणें, काम पडून राहणें.
**लटकनि**–स्त्री. झोक, हावभाव.
**लटकाती चाल**–मुरडत चालणें.
**लटका**–पु. नखरा,ढब, हावभाव, जादूटोणा.
**लटका देना**–थाप मारणें, गुंगारा देणें.
**लटका रखना**–आशा देत राहणें, बहाणा करणें.
**लटके याद होना**–क्रि. स. कपट जाणणें, मंत्रतंत्र जाणणें.
**लटकाना**–फांशीं देणें, लटकाविणें, आशेंत ठेवणें, केस मुलतवी ठेवणें, उभा करणें.
**लटकीला, लटकौवाँ**–वि. लटकलेलें.
**लटजाना**–निर्बल होणें.
**लटजीरा**–पु. आघाडा, आड मार्ग, एक [प्रकारचा तांदूळ.
**लटना**–क्रि. अ. जळून जाणें, लडबडणें, लोभविणें, आसक्त होणें, लीन होणें, व्याकुळ होणें.
**लटपट**–वि. रंगेल, रसिक, नशा करणारा, [मस्तवाल.
**लटपटा**–वि. लडबडित, फरफटत, सैल, अस्ताव्यस्त, अशक्त, चुरगळलेलें, मोडकें तोडकें.
**लटपटाना**–क्रि. अ. अडखळून पडणें, लटपटणें, चुकणें, मोहित होणें, लीन होणें.
**लटपटी पगड़ी**–अव्यवस्थित बांधलेलें
**लटपटे दिन**–वाईट दिवस. [पागोटें.
**लटा**–वि. दुर्बल, लंपट, लुच्चा, वाईट, तुच्छ.
**लटाई**–स्त्री. फिरकी (पतंगाची).
**लटाधारी**–वि. जटाधारी.
**लटापोट**–वि. मोहित, आसक्त.
**लटी**–स्त्री. वाईट गोष्ट, वैरागीण, थाप, वेश्या.–वि. दुर्बळ.
**लटुआ**–पु. भोंवरा, भाल्याचें टोक.
**लटू, लट्टू**–पु. भोंवरा.
**लट्टू होना**–फिदा होणें.
**लटूरिया, लटूरी**–स्त्री. शेंडी, केशकलाप
**लठ-लट्ठ**–पु. सोटा. [जटा, बट.
**लट्ठबाज**–वि. लाठी चालविणारा.

**लट्ठमार**–वि. लाठी चालविणारा, कर्कश, [अप्रिय.
**लट्ठर**–वि. मंद, आळशी, ढिला.
**लट्ठा**–पु. खोडा, वासा, पाचर, जाड-कापड, तुळई, खोड (झाडाचें).
**लठियाना**–क्रि. स. लाठीनें मारणें.
**लठैत**–वि. लाठीधारी.
**लडंत**–स्त्री. लढाई, ठोकाठोकी, सामना.
**लड़**–स्त्री. माळ, श्रेणी, दोऱ्याच्या अनेक तारांपैकीं एक तार.
**लड़कई**–स्त्री. बालपण, पोरकटपणा, चपलता, चंचलता, बालबुध्दी, अज्ञान.
**लड़कखेल**–पु. सोपें काम.
**लड़कपन**–स्त्री. पाहा 'लड़कई'.
**लड़का**–पु. मुलगा, पुत्र, बालक.
**लड़काई**–स्त्री. बालपण.
**लड़काबाला**–पु. मूलबाळ, कुटुंब.
**लड़की**–स्त्री. मुलगी, कन्या, पुत्री.
**लड़कीवाला**–पु. कन्येचा बाप, व्याही.
**लड़कौरी**–पु. पुत्रवती.
**लड़खड़ाना**–क्रि. अ. अडखळणें, लटपटणें, डगमगणें, झोंक जाणें, आपटणें.
**लड़ना**–क्रि. अ. भिडणें, मल्लयुद्ध करणें, तक्रार करणें, वादविवाद करणें, टक्कर खाणें, सफल होण्याकरितां प्रयत्न करणें, नांगी मारणें, ध्येय गाठणें.
**लड़बड़**–वि. बोबडे.
**लड़बावला**–वि. मूर्ख, अल्लड.
**लड़ाई**–स्त्री. लढाई, भांडण, वादविवाद, विरोध, टक्कर.
**लड़ाका, लड़ाकू**–वि. शूर, वीर, भांडखोर.
**लड़ाना**–क्रि. स. लढविणें, गुंतविणें, चालविणें (बुद्धि), चिडविणें, व्यवहारांत आणणें, लाड करणें.
**लड़ायता**–वि. लाडका, धृष्ट, भांडखोर.
**लड़ियाना**–क्रि. स. ओंवणें, गुंफणें.
**लड़ी**–स्त्री. सर, लड, कडवें.
**लड़ुवा, लड़ुआ**–पु. लाडू.
**लड़ैता**–वि. लाडका, आवडता, लढणारा, [लाडामुळें धीट झालेला.
**लड्डू**–पु. लाडू.
**(ठगके) लड्डू खाना**–वेडे होणें.
**(मनके) लड्डू खाना या फोड़ना**–मनांत मांडे खाणें.
**लढ़ा, लढ़िया, लढ़ी**–स्त्री. छकडा, हातगाडी.
**लढ़ैता**–वि. पाहा 'लड़ैता'.
**लत**–स्त्री. खोड, वाईट संवय.
**लतखोर-रा**–वि. निर्लज्ज, नीच, लाथाखाऊ, पायपुसणें, लतकोडगा.
**लतमार**–वि. पाहा 'लतखोर'.
**लतर**–स्त्री. वेल, लता.
**लता**–स्त्री. वेल, शाखा, सुंदर स्त्री, आघाटी, मोगरी, जाई, स्पृक्का, एक छंद.
**लताड़**–पु. दमदाटी.
**लताड़ना**–क्रि. स. लाथाडणें, छळणें.
**लतापता**–पु. झाडपान, जडीबुटी.
**लताफ़त**–स्त्री. कोमलता, स्वाद, उत्तमता.
**लतियर-ल**–वि. लतकोडगा.
**लतिया**–वि. दुराचारी, वाईट स्वभावाचा.
**लतियाना**–क्रि. स. लाथाडणें, छळणें, खूप लाथा मारणें.
**लती**–वि. वाईट खोड असलेला, कुकर्मी.
**लतीफ़**–वि. मजेदार, स्वादिष्ट, सुंदर, सूक्ष्म, [कोमल.
**लतीफ़ा**–पु. कहाणी, चुटका.
**लत्ता**–पु. चिंधी, फाटकें वस्त्र.–स्त्री. लाथ.
**लत्ती**–स्त्री. लाथ, चिंधी.
**लथड़ना**–क्रि. अ. बरबटणें, मळणें.
**लथपथ**–वि. आलेंचिंब, चिखलानें माखलेलें.

**लथरना**–क्रि. अ. अंग टाकणें, पहुडणें.
**लथरपथर**–पु. ठेचाठेच, गळ्यापर्यंत भरलेलें. [क्रिया, धमकी, पराजय.
**लथाड़**–स्त्री. जमिनीवरून फरफटण्याची
**लथाड़ना**–क्रि. स. पाहा 'लथेड़ना.'
**लथेड़ना**–क्रि. स. चिखलांत भरविणें, फरफटणें, छळणें, अपमान करणें, थकविणें, दटावणें, हैराण करणें.
**लदना**–क्रि. अ. ओझें लादलें जाणें, आच्छादित होणें, तुरुंगांत जाणें.
**लदवाना**–क्रि. स. ओझें लादविणें.
**लदाऊ-व**–पु. भार, ओझें, बोजा, लाद-
**लदाकु**–पु. बोजा, पाटाई. [ण्याची क्रिया.
**लदुआ, लदुवा, लद्दू**–वि. ओझें वाहणारा.
**लद्धड़**–वि. आळशी.
**लप**–स्त्री. लवणें (तरवारीचें).–पु. ओंजळभर वस्तु, लवचिक वस्तु हलण्याची क्रिया.
**लपक**–स्त्री. झेंप, ज्वाला, चमक, वेग.
**लपकना**–क्रि. स. वेगानें धांवणें, कडकडणें. झेप टाकणें. [जाऊन.
**लपक कर**–झटकन, तावडतोब वेगानें
**लपका**–पु. आक्रमण, चापल्य, चमक.
**लपकी-ची**–स्त्री. एक मासा.
**लपझप**–वि. चंचल, चपळ, सावध.
**लपट**–स्त्री. ज्वाला, आंच, सुगंध, वाऱ्याची झुळुक.
**लपटना**–क्रि. अ. आलिंगणें, भिडणें, चिकटणें, अडकणें, चिमटणें, गढून जाणें, मग्न होणें.
**लपटा**–पु. फोडणीचा सांजा, संबंध.
**लपटाना**–क्रि. स. गुंडाळणें, सुताची लडी करणें, भांडणांत एकाद्याच्या बाजूनें बोलणें, एकाद्या वस्तूनें गुंडाळणें. –क्रि. अ. गुंतणें, संलग्न होणें.
**लपना**–क्रि. अ. वांकणें, कंटाळणें, लचकणें, हलणें, डोलणें, हैराण होणें.
**लपर लपर करना**–उगीच बोलत राहणें.
**लपलपाना**–क्रि. अ. झळकणें, जोरानें हलणें (लवचिक छडी), चमकणें, लटकणें (तरवार इ.).
**लपसी**–स्त्री. शिरा, सांजा, लापशी, कांजी.
**लपाटिया**–पु. लबाड, खोटाडया.
**लपाटी**–स्त्री. लबाडी, खोटें.–वि. लबाड.
**लपाना**–क्रि. स. फटकारणें, चमकविणें
**लपालप**–वि. सपासप. [(छडी).
**लपित**–वि. सांगितलेलें.
**लपेट**–स्त्री. गुंडाळण्याची क्रिया, घेरा, चक्कर, बांधण्याचें कापड, वेष्टण, गुंडाळा, विवंचना.
**लपेट झपेट**–स्त्री. वहाणा, धरपकड, कुस्ती.
**लपेटन**–स्त्री. लपेटी, झांकण, फांस, वेढा.
**लपेटना**–क्रि. स. गुंडाळणें, गांठोडें करणें, बांधून घेणें, धरणें, विवंचनेंत टाकणें.
**लफंगा**–वि. दुराचारी, बदमाश.
**लफ़्ज़ी**–वि. शब्दाशीं संबंध ठेवणारा,
**लफ़्ज़ीमानी**–शब्दार्थ. [शाब्दिक.
**लफना**–क्रि. अ. वांकणें, लचकणें.
**लफलफानि**–स्त्री. पाहा 'लपलपाना.'
**लफ़्ज़**–पु. शब्द.
**लब**–पु. ओंठ, थुंकी, लाळ, किनारा.
**लबड़खंदा**–पु. शरीर, साहसी युवक.
**लबड़चढ़ाई**–स्त्री. स्तन लुळे होणें.
**लबड़ धों धों**–स्त्री. आरडाओरड, गडबड, गोंधळ, अन्याय, खोटेपणा, बेइमानी,
**लबड़सबड़**–पु. वडबड, गप्पा. [घोटाळा.
**लबदा**–पु. जाड दंडा.

**लबरघट्टा**–वि. तिरसट.
**लबरेज़**–वि. तोंडापर्यंत भरलेला.
**लबलबा**–वि. लिबलिबित.
**लबलबी**–स्त्री. बंदुकीचा घोडा.
**लबवलहज़ा**–पु. बोलण्याची पद्धत.
**लबादा**–पु. डगलें, कापूस भरलेला पायघोळ अंगरखा, सटरफटर सामानाचें गाठोडें.
**लबार**–वि. लबाड, खोटा, थापेबाज.
**लबारी**–स्त्री. लबाडी.–वि. चुगलखोर, लबाड, खोटा.
**लबालब**–अ. कांठोकांठ ओसंडणारें.
**लबालेस**–स्त्री. तोंडदेखलेपणा.
**लबी**–स्त्री. साखरेचा पाक.
**लबेगोर**–वि. मरणासन्न.
**लबेजान**–वि. मरणाच्या दारीं पोहचलेला, म्हातारा.
**लबेड़ना**–क्रि. अ. भरविणें, (घाण करून).
**लबेद**–पु. चालीरीतीनें आलेली गोष्ट, [दंतकथा.
**लबेदा**–पु. सोटा.
**लब्धप्रतिष्ठ**–वि. प्रख्यात, प्रतिष्ठित.
**लमक**–वि. लंपट, कुकर्मी, उपपति.
**लमकना**–क्रि. अ. वेगानें धांवणें, झेपटाकणें, उत्कंठित होणें.
**लमछड़–र**–स्त्री. एक बंदूक, उंच व्यक्ति. –वि. उंच व सडपातळ.
**लमछोर**–वि. उभट.
**लमटंग–गा**–वि. लांबटांग्या, उंच.–पु. पक्षी. [सारस पक्षी.
**लमतडंगा**–वि. लांबटांग्या, उंच. –पु.
**लमधी**–पु. व्याह्याचा बाप.
**लमहा**–पु. पळ, क्षण.
**लमही**–स्त्री. क्षण

**लमाना, लँबाना**–क्रि. स. लांबविणें, पसरणें.–क्रि. अ. दूर जाणें.
**लम्प**–पु. दिवा.
**लय**–पु. गाण्याचा स्वर, लीनता, विनाश, विलीन होणे, गाण्याची सुंदर पद्धति. गाण्यांत स्वर आणि ताल यांचा मेळ, प्रेम, प्रलयकाल, विश्रांति, अलिंगन. [णारें.
**लयलीन**–वि. बुद्धिला आच्छादित कर-
**लरक(का)ई**–स्त्री. बालपण.
**लरकना**–क्रि. अ. पाहा 'लटकना.'
**लरकाना**–क्रि. स. वांकविणें, खालीं
**लरकिनी**–स्त्री. मुलगी. [सोडणें, लटकविणें.
**लरखराना**–क्रि. अ. पाहा 'लड़खड़ाना.'
**लरजना**–क्रि. अ. थरथरणें, जळफळणें,
**लरजा**–पु. कंप, भूकंप. [डोलणें. भिणें.
**लरझर**–वि. पुष्कळ, प्रचुर.
**लरना**–क्रि. अ. पाहा 'लड़ना.'
**लरनि, लराई**–स्त्री. लढाई.
**लरिक सलोरी**–स्त्री. मुलांचा एक खेळ.
**लरिकई**–स्त्री. पाहा 'लड़कपन.'
**लरिका**–पु. मुलगा.
**लरिकाइ**–स्त्री. बालपण.
**लरिकिनी**–स्त्री. मुली.
**लरी**–स्त्री. पहा 'लड़ी.' [चुळबुळ.
**ललक**–स्त्री. तीव्र अभिलाषा, तळमळ,
**ललकना**–क्रि. अ. उमाळा येणें,हांव धरणें.
**ललकार**–स्त्री. आव्हान. [उत्तेजन देणें.
**ललकारना**–क्रि. स. आव्हान देणें, लढण्यास
**ललकि**–अ. उत्साहपूर्वक.
**ललचना**–क्रि. अ. मोहित होणें, तळमळणें, लालचावणें. अधिर होणें.
**ललचाना**–क्रि. स. लोभ उत्पन्न करणें,

मोहविणें, आकर्षिणें.

**ललचौहाँ**–वि. लालची, लोभी.

**ललछौंह**–वि. लालसर.

**ललन**–पु. प्रिय बालक, प्रिय नायक किंवा पति, क्रीडा.

**ललना**–स्त्री. सुंदर स्त्री, जिव्हा, एक वर्ण वृत्त, विलासिनी स्त्री. [माया.

**ललनी**–स्त्री. बांबूची नळी, कुमारी,

**लला**–पु. लाडका मुलगा, प्रिय पति

**ललाई**–स्त्री. लाली. [किंवा नायक.

**ललाट**–पु. मस्तक, नशीब.

**ललाना**–क्रि. अ. मोहित होणें, तळमळणें, लोभ करणें.

**ललाम**–वि. सुंदर.–पु. अश्व (ज्याच्या ललाटावर पांढरें असतें), गंधाचा टिळा, दागिना, ललाट भूषण, ललाटावरील पांढरा ठिपका, श्रेष्ठ, खूण, निशाण, शेंपूट, घोडी, श्रृंग, प्रभाव.

**ललित**–वि. खेळणारें, विलासी, गोजिरवाणें, मनोहर, आनंददायक प्रेमार्द्र, सौम्य, कोमल, सुकुमार, कांपणारें, इच्छिलेलें, क्रीडा, विलास, सौंदर्य, साधेपणा, हार भेद, एक राग.

**ललितई ललिताई**–स्त्री. सुंदरता.

**ललिता**–स्त्री. विलासिनी स्त्री, कस्तूरी, दुर्गा, स्त्री, एक वर्णवृत्त, राधेची एक सखी.

**लली**–स्त्री. मुलगी, नायिका, बाळ.

**ललौहाँ**–वि. तांबडा.

**लल्ला**–पु. लाडका मुलगा, प्रियकर.

**लल्ली**–स्त्री. मुलगी, नायिका, बाळ.

**लल्लो**–स्त्री. जीभ.

**लल्लोचप्पो, लल्लोपत्तो**–स्त्री. तोंडपुजेपणा, गोडगोड थापा, लपवाछपवी, कांकू करणें, चांचरणें.

**लव**–पु. शेताची कापणी, तुकडा, बिंदू, अल्पांश, अंश, विध्वंस, लावा पक्षी, केस, लोंकर, सूक्ष्मकाल.

**लवण**-न–पु. मीठ, लवणासुर, लवण समुद्र, खारटपणा, उंट, सैंधव, लोणार, खार. –वि. खारट, सुंदर, रुचकर.

**लवणा**–स्त्री. सौंदर्य, तेज, लोणचें.

**लवना**–क्रि. स. कापणी करणें, कापणें, शेत कापणें.

**लवनाई**–स्त्री. लावण्य, सुंदरता.

**लवनि**–स्त्री. कापणी, लोणी.

**लवर**–स्त्री. ज्वाला.

**लवलासी**–स्त्री. प्रेमसंबंध.

**लवली**–स्त्री. राय आंवळा, एक वर्णवृत्त.

**लवलीन**–वि. तल्लीन, तन्मय.

**लवलेस**–पु. अत्यंत थोडें, थोडासा संसर्ग.

**लवा**–पु. लावापक्षी, लाही (साळीची),

**लवाई**–स्त्री. व्यालेली गाय, शेतकापणी, कापणीची मजुरी.

**लवाजमा**–पु. एकाद्याच्या बरोबर राहणारा सरंजाम, आवश्यक सामुग्री.

**लवाजिम**–पु. बरोबर राहणारी आव-

**लवारा**–वासरूं. [श्यक सामुग्री.

**लवासी**–वि. बडबड्या, थापाड्या.

**लशकर**–पु. सैन्य, दल, छावणी, जहाजांत काम करणाऱ्या माणसांचा समुदाय.

**लशुन, लसुन**-पु. लसूण.

**लषण**–पु. लक्ष्मण.

**लस**–पु. चिकटपणा, गोंद, आकर्षण. [होणें.

**लसकना**–क्रि. स. रसरसणें, बिलबिलीत

**लसदार**–वि. चिकट, लस असलेलें.

**लसना**–क्रि. स. चिकटविणें, जोडणें.–क्रि. अ. शोभणें, विराजणें.
**लसनि**–स्त्री. शोभा, स्थिति, अस्तित्व.
**लसम**–वि. दूषित.
**लसलसा**–वि. पाहा 'लसदार.'
**लसलसाना, लसियाना**–क्रि. अ. रसरसणें, बिलबिलित होणें. [भित.
**लसा**–स्त्री. हळद.–वि. चिकटलेलें, सुशो-
**लसी**–स्त्री. लस, संबंध, आकर्षण, लाभयोग, दुधांत पाणी घालून केलेलें
**लसीला**–वि. सुंदर, सरस. [सरबत.
**लसुनिया**–पु. वैडूर्यमणी, लसण्या. [करून.
**लस्टम पस्टम**–अ. उलटें सुलटें, कसें तरी
**लस्त**–वि. अशक्त, थकलेला.
**लस्सान**–वि. चांगला वक्ता.
**लस्सी**–स्त्री. ताक, लस, संबंध, आकर्षण, लाभयोग, दुधांत पाणी घालून केलेलें पेय.
**लहक**–स्त्री. ज्वाला, शोभा, चमक, झोका.
**लहकना**–क्रि. अ. झोका घेणें, पेटणें, प्रकाशणें, झळझळणें, वारा वाहणें,
**लहकाना, लहकारना**–क्रि स. प्रवृत्त करणें. आगीच्या ज्वाला पसरणें, झुकांडी खाणें,
**लहकीला**–वि. चकचकीत. [उत्कंठित होणें.
**लहकौर–रि**–पु. घांस देण्याची पद्धत (लग्नांत), वराला दहीं साखर
**लहँगा**–पु. परकर. [देण्याची पद्धत.
**लहजा**–पु. गाण्याची व बोलण्याची ढब, तऱ्हा, स्वर लय, उच्चारपद्धति, पळ,
**लहजाब,लहजा**–अ. क्षणोक्षणीं. [क्षण.
**लहडू**–पु. भिरकें.
**लहद**–स्त्री. कबर, समाधि. [फेसाळलेलें.
**लहनदार**–पु. सावकार, धनको.–वि.
**लहना**–क्रि. स. प्राप्त करणें, भोगणें.–पु. उधारी, कर्जाऊ दिलेली रक्कम, भाग्य.
**लहनी**–स्त्री. फळाचा उपभोग, प्राप्ति.
**लहबर**–पु. लांब अंगरखा, पताका, लांब
**लहमा**–पु. क्षण, पळ. [मानेचा एक पोपट.
**लहर**–स्त्री. लाट, उत्साह, तरंग, आवेश, लहर, मौज, नागमोड.
**लहरदार**–वि. नागमोडी.
**लहरना**–क्रि. अ. डोलणें, फडफडणें, लाट येणें, झुकांड्या खात चालणें, शोभणें, उत्कंठित होणें, भडकणें, –क्रि. स. हवेमुळें डोलणें, वक्रगतीनें नेणें.
**लहर पटोर**–पु. रेघाचें रेशमी वस्त्र.
**लहरबहर**–स्त्री. चैन, चंगळ.
**लहरा**–पु. तरंग, मौज, सर (पावसाची), गाण्याच्या पूर्वी ताल स्वर मिळविणें. ['लहरना'.
**लहराना**–क्रि. झिंगून चालणें, पाहा
**लहरिया**–पु. नागमोडी रेघांची साडी, नागमोडी चिन्ह, नागमोडी रेघा.–स्त्री. लाट, आवेश, आनंद, कळ.
**लहरी**–स्त्री. तरंग, लहर.–वि. आनंदी, मस्त. [धट्टाकट्टा.
**लहलहा**–वि. टवटवलेलें, प्रफुल्लित,
**लहलहाना**–क्रि. अ. बहरणें, टवटवीत होणें, हलणें, डोलणें.
**लहलहावना**–क्रि. अ. चमकणें, लाटा येणें.
**लहसून**–पु. लसूण.
**लहसुनिया**–पु. वैडूर्य, केतुरत्न, रुद्राक्ष.
**लहाछेद**–पु. नाचण्याची एक पद्धत, नाचण्यांतील चपलता. [धट्टाकट्टा.
**लहालह**–वि. टवटवलेलें, प्रफुल्लित,
**लहालोट**–वि. प्रसन्न, हसतां हसतां मुरकुंडी वळलेला, मोहित, आनंदपूर्ण.

**लहासी**–स्त्री. नाव ओढणारा दोर, [मोठा दोर.
**लहि**–अ. पर्यंत.
**लहु–पु**. आगीची ज्योत, दिव्याची ज्योत.–स्त्री. प्रेम, मनाची वृत्ति.
**लहुरा**–वि. लहान, नाजुक.
**लहुरी**–स्त्री. धाकटया भावाची बायको.
**लहू**–पु. रक्त. [–वि. वयानें लहान.
**लहूलुहान होना**–रक्तबंबाळ होणें.
**लहू-सूखना**–तोंडचें पाणी पळणें, घाबरणें.
**लहेरा**–पु. रंगारी. (लाखेचा रंग देणारा)
**लँक, लंक**–स्त्री. कंबर.
**लँग**–स्त्री. कासोटा, काचा.
**लांगूल**–पु. शेंपूट, शिस्न, धान्याचें कोठार.
**लँगूली**–पु. वानर. [झेप घेऊन ओलांडणें.
**लँघना**–क्रि. स. उल्लंघणें, ओलांडणें,
**लँच**–स्त्री. लांच, उत्कोच.
**लांछन**–पु. खूण, कलंक, दोष.
**लँबा**–वि. लांब.
**ला**–अ. निषेधात्मक शब्द शब्दाच्या आरंभीं येतो ( जसें–लामजहब-धर्महीन, ला-जवाब-अद्वितीय.)
**लाइ**–स्त्री. आग.
**लाइक**–वि. योग्य, लायक.
**लाई**–स्त्री. लाही, चुगली.
**लाईलुतरी**–चुगली, चुगलखोर स्त्री.
**लाकलाम**–वि. अगदीं बरोबर, निश्चित.
**लाक्षणिक**–वि. लक्षणयुक्त. –पु. ओळखणारा, लक्षण जाणणारा.
**लाख**–वि. एक लाख, अतिशय, हवें तेवढें. –स्त्री. लाखेचा किडा, लाख, लाही. –अ. पुष्कळ.
**लाख से लीख होना**–यथासांग घडून पुण्य गांठीं न पडणें, रावाचा रंक होणें.
**लाखना**–क्रि. अ. लाख भरणें. –क्रि. स. जाणणें, लाख लावून मोहोरबंद करणें.
**लाखी**–वि. मळकट लाल, लाखेचें बनविलेलें. –पु. लाल घोडा.
**लाग**–स्त्री. संबंध, रीति, प्रेम, चढाओढ, शत्रुत्व, युक्ति, सफाईदार नक्कल, जादूटोणा, व्यस्तता, वर्गणी, भूमिकर, दक्षिणा, एक प्रकारचा नाच.–अ. पर्यंत.
**लागडाँट**–स्त्री. वैर, स्पर्धा, नाच.
**लाग रखना**–मनांत ईर्षा ठेवणें, स्नेह करणें.
**लाग लपेट**–छळ, कपट, मुरवत. [रक्कम.
**लागत**–स्त्री. एकाद्या वस्तूसाठीं खर्च झालेली
**लागना**–क्रि. अ. लागणें.
**लागर**–वि. दुबळा, अशक्त. –स्त्री. दुबळेपणा, अशक्तपणा.
**लागि**–अ. नाद असलेला, निमित्त, साठीं, करणें, मुळें, पर्यंत.
**लागू**–वि. लागण्यास योग्य.
**लागे**–अ. करितां.
**लाघव**–पु. क्षुद्रता, लहानपणा, न्यूनता, हस्तकौशल्य, जलदी, आरोग्य. –अ. सहज.
**लाघवी**–स्त्री. चपलता.
**लाचार**–वि. अगतिक.–अ. अगतिक होऊन.
**लाचारी**–स्त्री. निरुपाय.
**लाची**–स्त्री. वेलदोडा.
**लाचीदाना**–पु. साखरफुटाणें, वेलदोडा.
**लाछन**–पु. लांछन, दोष, अपराध.
**लाज**–स्त्री. लाही, लज्जा, पत.
**लाजना**–क्रि. अ. लाजणें.
**लाजवर्द**–पु. एक मौल्यवान रत्न.
**लाजवाब**–वि. निरुत्तर, अद्वितीय. [असलेला.
**लाजवाल**–वि. अविनाशी, नेहमीं सारखाच
**लाजा**–स्त्री. भाजलेले भात, तांदूळ.
**लाजिमी**–वि. आवश्यक, उचित.

**लाट–ठ**–स्त्री. उंच मोठा खांब, मनोरा. –पु. लॉर्ड, गव्हर्नर, एक प्राचीन देश, या देशाचा निवासी.
**लाटी**–स्त्री. ओठ व तोंड सुकण्याची
**लाठी**–स्त्री. लाठी, काठी. [ अवस्था.
**लाठी चलना**–मारामारी होणें.
**लाठी सा मारना**–कठोर बोलणें.
**लाड़**–पु. लाड, स्नेह, ममता.
**लाड़ करना**–अभिमान करणें, स्नेह करणें.
**लाड़लड़ेता, लाड़ला**–वि. अति लाडका.
**लाढ़िया**–पु. दुकानदारानें नेमलेला दलाल.
**लाढ़ियापन**–पु. धूर्तता, चलाखी.
**लात**–स्त्री. लाथ, पाय.
**लात लगना**–नुकसान होणें, अपमान होणें.
**लात मारना**–लाथाडणें, सोडणें, तिरस्कार करणें.
**लाद**–स्त्री. आंतडी, पोट, लादण्याची क्रिया.
**लादना**–क्रि. स. लादणें, ओझें चढविणें,
**लादी**–स्त्री. गोणी. [देण्याचा भार घालणें.
**लादू**–वि. भारवाहक.
**लाधना**–क्रि. स. मिळणें, लाभणें. [निंदा.
**लानत, लानत मलामत**–स्त्री. धिक्कार,
**लाना**–क्रि. स. आणणें, पुढें ठेवणें, पेटविणें, नष्ट करणें, (हा धातु सकर्मक असून अकर्मकाप्रमाणें चालतो), लावणें.
**लाने**–अ. साठीं, कारणें.
**लापता, लापना**–वि. गुप्त, अदृश्य, पत्ता नसलेला.
**लापरवा, लापरवाह**–वि. बेपर्वा, बेसावध.
**लापरवाही**–स्त्री. बेफिकिरी, बेसावधपणा.
**लापसी**–स्त्री. लापशी, सांजा.
**लाफ़ज़नी**–स्त्री. बढाया मारणें.
**लाबर**–वि. लबाड, खोटाड्या, थापेबाज.
**लाबुद**–वि. आवश्यक. [उपभोग, द्रव्य.
**लाभ**–पु. प्राप्ति, फायदा, उपकार,
**लाभकारी**–वि. फायदेशीर, लाभदायक.
**लाम**–पु. फौज, गर्दी.
**लाम काफ़**–पु. वर्णमालेचीं अक्षरें, दुर्वचन.
**लामज**–पु. वाळयाच्या जातीचें एक गवत.
**लाय**–स्त्री. ज्वाला, आग.–अ. आणून.
**लायक़**–वि. योग्य, उपयुक्त, गुणवान, समर्थ.–पु. लाह्या.
**लायकी**–स्त्री. सामर्थ्य, विद्वत्ता, योग्यता.
**लायची**–स्त्री. वेलदोडा.
**लार**–स्त्री. लाळ, ओळ, चिकटपणा.–अ. मागें, बरोबर.
**लार चूना**–बालपण असणें.
**(मुँहसे) लार टपकना**–तोंडाला पाणी सुटणें, मिळविण्याची फार इच्छा होणें.
**लार लगाना**–लळा लावणें, अडकविणें, फसविणें.
**लारा लेरी करना**–बहाणा करणें.
**लारी**–स्त्री. मोठी मोटार (लॉरी).
**लाल**–पु. लहान व आवडता पुत्र, मुलगा, आवडता पुरुष, श्रीकृष्ण, लाड, लाळ, माणिक, एक पक्षी.–स्त्री. इच्छा, लालसा. –वि. तांबडे, रागावलेला, पहिला राजा (खेळांत). [ रागावणें.
**लाल पीला पड़ना या होना**–संतापणें,
**लाल होना**–पुष्कळ पैसा मिळाल्यानें प्रसन्न होणें, खेळांत जिंकणें, रागावणें.
**लालच**–पु. लोभ, लालसा.
**लालचमें आना**–लोभांत फसणें.
**लालच देना**–लोभ दाखविणें, फसविणें.
**लालचहा, लालची**–वि. लोभी, लोलुप.
**लालटेन, लालटैन**–स्त्री. कंदील.

**लालन**—पु. लाडका मुलगा, बालक, लाड.—क्रि. अ. लाड करणें.

**लालना**—क्रि. स. लाड करणें.

**लाल बुझक्कड़**—पु. अनर्थ करणारा (बोलण्याचा), मूर्ख.

**लालमन**—पु. श्रीकृष्ण, माणिक, एक पोपट.

**लालमिर्च**—स्त्री. तांबडी मिरची.

**लालमी**—पु. खरबूज.

**लालसर**—पु. बदकाची एक जात.

**लालस**—वि. अति उत्सुक, तत्पर, तल्लीन, आसक्त, मग्न, विव्हल.

**लालसा**—स्त्री. उत्कट इच्छा, उत्सुकता, विनंती, याचना, खेद.

**लालसिखी**—पु. कोंबडा.

**लाला**—पु. वैश्यजातिसूचक शब्द, बालकाकरितां संबोधन, महाराज, श्रीमान. —स्त्री. लाळ, एकप्रकारचें फूल, लालरंग. —वि. लाल रंगाचा. [आशाळभूत.

**लालायित**—वि. उत्कंठित, लोभावलेला,

**ललित**—वि. लाडका, पाळलेला.—पु. सुख, प्रेम. [प्रेमविलास.

**लालित्य**—पु. सुंदरता, कांति, उल्हास,

**लालिया**—स्त्री. लाली.

**लाली**—स्त्री. मुलगी, लालपणा, प्रतिष्ठा,

**लालुका**—स्त्री. माळ, गजरा. [पत, अब्रू.

**लाले**—पु. इच्छा, अभिलाषा, आशा.

**(किसी चीजके) लाले पड़ना**—पंचाईत पडणें, भ्रांत पडणें, वंचित होणें, एकाद्या वस्तूकरितां तडफडणें किंवा अधीर होणें.

**लाव**—स्त्री. आग, दोर.—पु. लाही, लावा पक्षी, गहाण ठेवून दिलें जाणारें कर्ज.

**लावक**—पु. लावा पक्षी.—वि. कापणारा, तोडणारा (फुलें इ.).

**लावदार**—वि. डागण्याकरितां तयार केलेली तोफ.—पु. तोफ डागणारा.

**लावण्य, लावन्य**—पु. सौंदर्य, खारटपणा.

**लावना**—क्रि. स. आणणें, लावणें, स्पर्शणें, पेटविणें, जाळणें.

**लावनि**—स्त्री. पाहा 'लावन्य'.

**लावनी**—स्त्री. ख्याल (गाणें), एक प्रकारचा छंद (कविता).

**लावल्द**—वि. निस्संतान.

**लावलाव**—पु. लोभ, तृष्णा.

**लावा**—पु. चंडोल, लाही.

**लावापरछन**—पु. लाजाहोम.

**लावारिस**—पु. बेवारसी, ज्याचा कोणी वारस नाहीं असा मनुष्य.

**लावारिसी**—वि. बेवारशी, अधिकारी नसलेली (वस्तु).

**लाश**—स्त्री. प्रेत, देह.

**लाषना**—क्रि. स. पाहाणें, न्याहाळणें.

**लास**—पु. उडचा मारणें, बागडणें, नाच, कामचेष्टा, मुरका, नखरा, कटवणी.

**लासक**—पु. मोर, नाच्या, शंकर, विलासी. —वि. खेळणारा, आळशी.

**लासा**—पु. लस, चीक. [पसरणें.

**लासा लगाना**—पाश टाकणें, कपटजाल

**लासानी**—वि. अद्वितीय, बिनतोड, निरुपम.

**लासिका**—स्त्री. नर्तकी, वेश्या.

**लाह**—स्त्री. लाख, शोभा.—पु. लाभ.

**लाहक़**—वि. मिसळलेला, आश्रित.

**लाहासिल**—वि. निरर्थक, अनावश्यक, ज्यापासून कांहीं लाभ नाहीं असा.

**लाही**—स्त्री. शेतांतील पिकाला लागणारी कीड, लाख.—वि. मळकट लाल रंगाचा.

**लाहु**—पु. लाभ, फायदा.

**लाहौल**–पु. तिरस्कार दाखविण्याकरितां किंवा भूतप्रेतादिकांना पळविण्याकरितां मुसलमान लोक वापरीत असलेला शब्द.

**लिंग**–पु. लक्षण, एकाद्यागोष्टीचें अनुमान, होण्याजोगी गोष्ट, मूळ प्रकृति, शिस्न, शिवाची एक विशेष प्रकारची मूर्ति.

**लिंगदेह**–पु. सूक्ष्म शरीर.

**लिंगी**–वि. चिन्ह असलेला, वेशधारी.–पु. ब्रह्मचारी, तपस्वी, ढोंगी साधु, शैव, हत्ती, पक्ष.

**लिओ**–अ. साठीं, कारणें, करितां.

**लिक्खाड़**–पु. खंदा लेखक (व्यंग).

**लिख लोढ़ा पड़ पत्थर**–अक्षरशून्य.

**लिखत**–स्त्री. लेख, लेखी गोष्ट, दस्तैवज.

**लिखना**–क्रि. स. लिहिणें, चित्र काढणें, चिन्ह करणें, पुस्तक, लेख किंवा कवितेची रचना करणें.

**लिखा**–पु. प्रारब्ध, दैव.–वि. लिहिलेलें.

**लिखाई**–स्त्री. लेख, लिहिण्याचें काम, लेखनशैली, लिहिण्याचा मोबदला, चित्र काढण्याची क्रिया, लिहिण्याची मजुरी.

**लिखाना**–क्रि. स. लिहविणें.

**लिखापढ़ी**–स्त्री. पत्रव्यवहार, एखादी निश्चित गोष्ट लिहून घेणें, खत, पत्र.

**लिखावट**–स्त्री.लेखनशैली, लिपी, लिखाण.

**लिखित**–वि. लिहिलेलें, लेखाच्या रूपांत असलेलें, प्रमाणपत्र.

**लिखितक**–पु. जुनें चौकोनी अक्षर.

**लिच्छवि**–पु. कोशल व मगध यांत राज्य करणारा एक राजवंश.

**लिटाना**–क्रि. स. निजविणें.

**लिट्ट**–पु. गाकर, आरोळी (जाड पोळी).

**लिड़ार**–पु. कोल्हा.–वि. भेदरट, भित्रा.

**लिथड़ना**–क्रि. अ. लडबडणें, अपमान [होणें.

**लिथड़ा**–वि. भरलेला, लिप्त.

**लिपटना**–क्रि. अ. गळीं पडणें, आलिंगन देणें, तनमनधन लावणें, चिकटणें.

**लिपटाना**–क्रि. स. चिकटविणें, आलिंगन देणें, जोडणें.

**लिपड़ा**–पु. कापड.–वि. ओलें, थबथबीत. –स्त्री. कपडालत्ता.

**लिपना**–क्रि. अ. लिंपलें जाणें, रंग किंवा ओली वस्तु पसरणें.

**लिपवाई, लिपाई**–स्त्री. लिंपण्याची मजुरी अथवा क्रिया. [ रंगवून घेणें.

**लिपवाना, लिपाना**–क्रि. स. लिंपविणें,

**लिपिबद्ध**–वि. लिखित, लिहिलेलें.

**लिप्सा**–स्त्री. लालुच, लोभ, हाव, इच्छा.

**लिफ़ाफ़ा**–पु. पाकिट ( कागदाचें ),मुलामा, दिखाऊ पोशाक, झिरझिरीत वस्त्र, वरपांगी देखावा, लवकर नाश पाव-णारी वस्तु. [ विणारा.

**लिफ़ाफ़िया**–वि. खोटें अवडंबर दाख-

**लिबड़ी**–स्त्री. कपडालत्ता.

**लिबड़ी बर्तन या बारदाना**–घरचें संसाराचें [ सामान.

**लिबास**–पु. आच्छादन, पोशाक.

**लिबासी**–वि. पोशाकी, नकली.

**लियाक़त**–स्त्री. योग्यता, विद्वत्ता, शील, [सामर्थ्य, गुण.

**लिये**–अ. साठीं, कारणें.

**लिरबिरीं**–बारीक, पिचपिचे.

**लिलाट**–पु. कपाळ, भाग्य, विहिरीची मोटेकडील बाजू. [करणें.

**लिलाना**–क्रि. स. गिळणें, इच्छिणें, लोभ

**लिल्लाह**–अ. ईश्वरासाठीं.

**लिवाना, लिवालाना**–क्रि. स. आणवून घेणें, बरोबर घेणें, घ्यावयास लावणें.

**लिवाल**–पु. गिन्हाइक.
**लिहाज़**–पु. मर्यादा, शील, कृपा दृष्टी, लज्जा, भीड, पक्षपात, व्यवहार दक्षता, लाज, संकोच, आत्मसन्मान.
**लिहाज़ा**–अ. याकरितां. [उपहास.
**लिहाड़ा**–वि. नीच, निकामी.–स्त्री. निंदा,
**लिहाड़ी**–स्त्री. निंदा, उपहास.
**लिहाड़ी लेना**–टर उडविणें. [रजई.
**लिहाफ़**–पु. लेप (पांघरण्याचा), मोठी
**लीक**–स्त्री. रेघ, चाकोरी, प्रथा, चाल, खूण, सीमा, बदनामी, लांछन, गणना.
**लीक करना, लीक खींचना**–दृढनिश्चय होणें. मर्यादा निश्चित करणें.
**लीक खींच करके**–प्रतिज्ञेनें.
**लीक पीटना**–जुन्याच मार्गानें जाणें.
**लीख**–स्त्री. ऊचें अडें, लीख.
**लीचड़**–वि. निकामी, आळशी, कुचकामाचा, चिवट, पिच्छा पुरविणारा, देवघेवीच्या कामांत अव्यवस्थित.
**लीचम**–वि. निरुपयोगी, आळशी, ओढग्रस्त, कंजूष, चिकट (माणूस).
**लीची**–स्त्री. लकूच वृक्ष व त्याचें पिवळें फळ, लीची फळ.
**लीझी**–वि. रद्दी, निरस.
**लीद**–स्त्री. पशूची विष्टा.
**लीन**–वि. तन्मय, एकाद्या वस्तंत सामावलेला, एकरूप, भक्त, निष्ठावंत.
**लीपना**–क्रि. स. लिंपणें, सारवणें.
**लीप पोतकर बराबर करना**–नाश करणें, धुळीस मिळविणें. [बाब लपविणें.
**लीपा पोती करना**–सारवण घालणें, सत्य
**लीबड़**–पु. डोळ्याचें चिपड, चिखल.
**लीम**–पु. एक वृक्ष.
**लीमू**–पु. लिंबू.
**लीर**–स्त्री. चिठ्ठी, चिंधी, कात्रण.
**लील**–पु. निळीचें झाड, निळा रंग.–वि. निळ्या रंगाचा.
**लीलना**–क्रि. स. गिळणें, घाईनें खाणें.
**लीला**–स्त्री. सोंग, अनादर, क्रिया, क्रिडा, खेळ, प्रेमविनोद, बिचित्र काम, सादृश्य, प्रियानुकरण, सौंदर्य, देवतांच्या चरित्राचा अभिनय.–पु. काळा घोडा.
**लुंगाड़, लुंगाड़ा**–पु. लुच्या, लफंगा.–वि. निळा. [प्रांतांत).
**लुंगी**–स्त्री. कमरेचें फडकें, फेटा (सीमा
**लुंज, लुंजा**–वि. लंगडालुळा, पर्णहीन झाडाचें खोड. [लुळा, पर्णहीन वृक्ष.
**लुंजपुंज**–वि. लोळागोळा, अपंग, लंगडा,
**लुंड, लुंडमुंड**–पु. डोकें नसलेलें शरीर.
**लुंडा**–वि. पंख झडून गेलेला पक्षी.–पु.
**लुआठा**–पु. जळकें लाकूड. [सुताची पिंडी.
**लुआब**–पु. चिकट पदार्थ.
**लुकंजन**–पु. सिद्धांजन (डोळ्यांत हें अंजन घालतांच मनुष्य अदृश्य होतो.)
**लुक**–पु. रोगण, ज्वाला, वार्निश.
**लुकठी**–स्त्री. जळतें लाकूड.
**लुकना**–क्रि. अ. लपणें, लोपणें.
**लुकमा**–पु. घास (अन्नाचा).
**लुकाट**–पु. पिवळें व वाटोळें फळ येणारें एक झाड व त्याचें फळ. [ठेवणें.
**लुकाना**–क्रि. स. दडविणें, लपविणें, आड
**लुखिया**–स्त्री. जारिणी, धूर्त स्त्री, वेश्या.
**लुगड़ा**–पु. वस्त्र, कापड, ओढणी.
**लुगत**–स्त्री. शब्दकोश, भाषा, अर्थ स्पष्ट नसलेला शब्द.

**लुगदी**–स्त्री. ओल्या वस्तूचा गोळा.
**लुगरी**–स्त्री. फाटकें धोतर.
**लुगाई**–स्त्री. पत्नी, स्त्री.
**लुग़ात**–स्त्री. 'लुग़त'चें अ. वचन.
**लुग़वी**–वि. शाब्दिक (जसें–लुग़वीमानी –शाब्दिक अर्थ).
**लुचई, लुचुई**–स्त्री. मैद्याची पातळ पुरी.
**लुच्चा**–वि. बदमाश, दुराचारी, नीच.
**लुजलुजा**–वि. लवचिक, निर्बळ.
**लुटकना**–क्रि. अ. लटकणें.
**लुटना**–क्रि. अ. लुटलें जाणें, नष्ट होणें, जमिनीवर आडवें होणें, लवंडणें.
**लुटवाना**–क्रि. स. लुटविणें (दुसऱ्या-कडून). [ विणें, फार दान देणें.
**लुटाना**–क्रि. स. उधळणें (धन), लुट-
**लुटिया**–स्त्री. लहान तांब्या, तपेली.
**लुटिया डुबोना**–सत्यानाश करणें.
**लुटेरा**–पु. डाकू, ठग, वाटमाऱ्या.
**लुठन**–पु. लोळण.
**लुठना**–क्रि. अ. लोळणें, लवंडणें.
**लुड़का**–पु. डूल. [ लवंडणें.
**लुढ़कना**–क्रि. अ. गिरकी खात जाणें,
**लुढ़काना**–क्रि. स. लवंडविणें.
**लुढ़ना**–क्रि. अ. पाहा 'लुढ़कना'.
**लुढ़ाना**–क्रि. स. पाहा 'लुढ़काना'.[मारणें.
**लुढ़ियाना**–क्रि. स. कपडा शिवणें, टीप
**लुतरा**–वि. चुगलखोर, लुबरा, हलकट.
**लुत्थ**–स्त्री. धड (देहाचें).
**लुत्फ़**–पु. मजा, स्वाद, दया, रोचकता.
**लुदकी**–स्त्री. दह्यांतील भाग.
**लुनना**–क्रि. स. पीक काढणें, नाश करणें.
**लुनाई**–स्त्री. सौंदर्य, लावण्य, शेतकापणी, त्या कामाची मजुरी.

**लुनियाँ**–स्त्री. लोणारी जात, निळवा.
**लुनेरा**–पु. शेत कापणीचें काम करणारा.
**लुपना**–क्रि. अ. लपणें, अदृश्य होणें.
**लुपलुप**–स्त्री. जनावरांचा गवत खातांना होणारा आवाज.
**लुपलुप करना**–अत्यंत आतुर होणें.
**लुबुधना**–क्रि. अ. लुब्ध होणें.–क्रि. स. लुब्ध करणें.
**लुब्ध**–वि. लोभावलेला, मोहित झालेला.
**लुब्धक**–पु. व्याध, पारधी, उत्तर गोला-र्धांतील एक तेजस्वी तारा.
**लुब्बे लुबाब**–गोष्टीचा सारांश, तात्पर्य.
**लुभाना**–क्रि. अ. मोहित होणें, आसक्त होणें, लालचावणें, भुरळणें, देहभान नसणें.–क्रि. स. मोहून टाकणें, लालुच दाखविणें, देहभान विसरविणें.
**लुरकी**–स्त्री. बाळी.
**लुरना**–क्रि. अ. झुलणें, आकर्षित होणें, वाकणें, कुठून तरी एकदम येणें.
**लूरी**–स्त्री. व्यालेली गाय.
**लुवार**–स्त्री. उष्ण वाऱ्याची झुळुक.
**लुहंडा**–पु. लोखंडी हंडा.
**लुहना**–क्रि. स. मोहून जाणें.
**लुहान**–वि. रक्तबंबाळ.
**लुहार**–पु. लोहार.
**लुहारी**–स्त्री. लोहारीण, लोहाराचें काम.
**लू**–स्त्री. उष्ण वायूचा झोत.
**लू मारना या लगना**–झळ लागणें.
**लूक**–स्त्री. ज्वाला, झळ, पेटतें लाकूड, उन्हाळ्यांतील गरम हवा, उलका, तुटलेला तारा.
**लूक लगाना**–आग लावणें.
**लूकटी**–स्त्री. कोल्ही.

**लूकना**–क्रि. स. पेटविणें, लपविणें.– क्रि. अ. लपणें. [किंवा वासा.
**लूकबाही**–पु. होळींत रोवण्याचा एरंड
**लूका**–पु. ज्वाळा, झळ, जळतें लाकूड.
**लूकी**–स्त्री. ठिणगी, जळतें लाकूड.
**लूकी लगाना**–भांडण लावून देणें.
**लूख**–स्त्री. ज्वाला, झळ, पेटतें लाकूड, उल्का, तुटलेला तारा.
**लूखा**–वि. रुक्ष.
**लूगा**–पु. वस्त्र, धोतर.
**लूटक**–पु. लुटारू, डाकू, निस्तेज करणारा.
**लूटखसोट**–स्त्री. लूटफाट.
**लूटना**–क्रि. स. लुटणें, अयोग्य रीतीनें घेणें, फसवून घेणें, मोहित करणें, हिसकणें.
**लूटपाट, लूटमार**–स्त्री. लुटालूट.
**लूत**–स्त्री. कोळी (किडा).
**लूता**–पु. उष्ण वायूचा झोत.–स्त्री. कोळी (किडा), कांतीण, विषारी कीट, मुंगी, रोग (चर्मव्रण), टिटवी.
**लूती**–स्त्री. ठिणगी. [घायाळ केलेला.
**लून**–पु. शेंपूट, मीठ.– वि. कापलेला,
**लूनना**–क्रि. स. पाहा 'लुनना'.
**लूनिया**–स्त्री. लोणारी जात, निळवा.
**लूनी**–पु. लोणी, हरभऱ्याची आंब, राज-
**लूम**–पु. शेंपूट. [पुतान्यांतील एक नदी.
**लूमना**–क्रि. अ. लटकणें, झुलणें.
**लूरना**–क्रि. अ. पाहा 'लुरना'.
**लूला**–वि. लुळा, असमर्थ, हात तुटका.
**लूलू**–वि. मूर्ख, बागुलबुवा.
**लूह, लूहर**–स्त्री. उष्ण वायूचा झोत.
**लेंड**–पु. लेंडुक.
**लेंडी**–स्त्री. लेंडी (उंट, बकरी इ. ची).
**लेहंड-डा**–पु. झुंड, समूह, कळप (गुरा-

**ले**–पासून, आरंभ होऊन, [ढोरांचा).
**लेई**–स्त्री. गिलावा, खळ, सुर्खी (चुना), लापशी, लसदार चिकट पदार्थ.
**लेई पूंजी**–सर्वस्व.
**लेकिन**–अ. परंतु.
**लेख**–पु. लिपी, लेख, दस्तऐवज, देव.– वि. लिहिण्यायोग्य.– स्त्री. पक्की गोष्ट.
**लेखक**–पु. लिहिणारा, ग्रंथकार.
**लेखन**–पु. लिहिण्याची क्रिया, लिहिण्याची कला, चित्रकला.
**लेखना**–क्रि. स. लिहिणें, आकडे मोडणें, हिशेब करणें, विचार करणें, अनुमानणें,
**लेखनी**–स्त्री. लेखणी. [समजणें.
**लेखा**–पु. हिशेब, नोंदवही, रजिस्टर, खर्चाचें विवरण, अनुमान.
**लेखा डेवढ़ा या बराबर होना**–हिशोब चुकता होणें, तळपट करणें.
**लेखा डेवढ़ा या बराबर करना**–हिशेब चुकता करणें.
**(किसीके) लेखे**–एकाद्याच्या विचाराप्रमाणें, कोणाच्या समजुतीप्रमाणें.
**लेजुर, लेजुरी**–स्त्री. दोरा, सुतळी.
**लेज़म, लेज़िम**–स्त्री. लेझीम.
**लेटना**–क्रि. अ. आडवें होणें, निजणें, पहुडणें, लवंडणें, कलंडणें.
**लेटाना**–क्रि. स. आडवें करणें, निजविणें.
**लेदी**–स्त्री. एक जलाशयाजवळ राहणारा पक्षी. [परत मिळणारी रक्कम.
**लेन**–पु. घेणें, कर्जाऊ दिलेली रक्कम,
**लेनदार**–वि. घेणारा, सावकार.
**लेनदेन**–पु. सावकारी, देवघेवीचा व्यवहार, संबंध.
**लेनहार**–वि. घेणारा, सावकार.

**सरसरी**–अ. सरसर, झटपट, सामान्य-रीतीनें.
**सरसरी निगाह**–विहंगम दृष्टि.
**सरसाई**–स्त्री. शोभा, विपुलता, सरसपणा.
**सरसाना**–क्रि. स. सरसावणें, टवटवीत करणें, रसपूर्ण करणें, भावोद्दीपन करणें. –क्रि. अ. शोभणें.
**सरसाम**–पु. सन्निपात (ज्वर).
**सरसार**–वि. मग्न, नशेंत चूर.
**सरसावना**–क्रि. स. पाहा 'सरसाना'.
**सरसिज**–पु. कमळ, तलावांत होणारें.
**सरसी**–स्त्री. तलाव, तळें.
**सरसेटना**–क्रि. स. रागानें बोलणें.
**सरसों**–स्त्री. मोहरी.
**सरह्**–पु. पतंग (दिव्याचा), टोळ.
**सरहज**–स्त्री. मेहुण्याची बायको.
**सरहटी**–स्त्री. मुगूसवेल.
**सरहद**–स्त्री. हद्द, सीमा.
**सरहरा**–वि. सरळ, उंच.
**सरा**–स्त्री. चिता, धर्मशाळा.–वि. नासकें.
**सराइंध**–स्त्री. दुर्गंधी.
**सराई**–स्त्री. काडी, सळई, दिवा.
**सराग**–पु. सळई.
**सराध**–पु. श्राद्ध.
**सराध पाख**–पु. पितृपक्ष.
**सराना**–क्रि. स. संपादणें, पूर्ण करणें, करविणें.
**सराप, श्राप**–पु. शाप, शिवी.
**सरापना**–क्रि. स. शाप देणें, शिवी देणें.
**सरापा**–अ. डोक्यापासून पायापर्यंत, पूर्णपणें. –पु. एकाद्याचें नखशिखांत वर्णन असलेली कविता.
**सराफ़**–पु. सोन्याचांदीचा व्यापारी.
**सराफ़ा**–पु. सराफी, सराफबाजार, बँक.
**सराब**–पु. मृगजळ, कपट.–स्त्री. दारू.
**सराबखोरी**–दारूबाजी.
**सराबोर**–वि. पूर्णपणें भिजलेलें.
**सराय**–स्त्री. धर्मशाळा.
**सरायत**–स्त्री. प्रवेश, प्रभाव.
**सराव**–पु. दारूचा पेला, प्याला, दिवा.
**सरावग-गी**–पु. श्रावक, जैन.
**सरावन**–पु. कुळव, भूमि सपाट करण्याचें काम व हत्यार.
**सरावना**–क्रि. स. सडविणें.
**सरास**–पु. भुस्सा.
**सरासन**–पु. धनुष्य.
**सरासर**–अ. एका टोकापासून दुसऱ्या टोकापर्यंत, पूर्णपणें, प्रत्यक्ष.
**सरासरी**–स्त्री. सोपेपणा, शीघ्रता, साधारण अंदाज.–अ. गडबडीमध्यें, साधारणपणें.
**स(श)रासुर**–पु. बाणासुर राक्षस.
**सराह**–स्त्री. प्रशंसा.
**सराहत**–स्त्री. टीका, स्पष्टपणा, विशुद्धता.
**सराहन**–स्त्री. स्तुति, स्तवन.
**सराहना**–स्त्री. स्तुति.–क्रि.स. प्रशंसा करणें.
**(भाग्यको) सराहना**–आनंद मानणें.
**सराहनीय**–वि. स्तुत्य, चांगलें.
**सरि**–स्त्री. नदी, समानता.–वि. सारखें.
**सरित-ता**–स्त्री. नदी, प्रवाह.
**सरिया**–स्त्री. सळई.
**सरियाना**–क्रि. स. क्रमानें ठेवणें, मारणें.
**सरिवन**–स्त्री. शालपर्ण नांवाचें झाड.
**सरिवर**–स्त्री. बरोबरी.
**सरिवरि**–स्त्री. समता.
**सरिश्त**–स्त्री. स्वभाव, गुण.–वि. मिश्रित.
**सरिश्ता**–पु. कचेरी, कार्यालयाचा विभाग, नोकर चाकर संबंध, मिलाफ.
**सरिश्तेदार**–पु. एकाद्या भागाचा मुख्य अधिकारी, शिरस्तेदार.
**सरिहन**–अ. समक्ष.

सरीअ–वि. उतावळा.–पु. एक प्रकारची [छंदोबद्ध रचना.
सरीक–वि. भागीदार.
सरीकता–स्त्री. हिस्सा, वांटा.
सरीखा–वि. सारखा.
सरीन–पु. खत्री जात.
सरीफ–वि. सज्जन.
सरीफा–पु. सीताफळ.
सरीर–पु. शरीर.
सरीह–वि. स्पष्ट.
सरीहन्–अ. सडेतोड, उघड.
सरुज–वि. रोगी.
सरुष–वि. क्रोधयुक्त.
सरुहाना–क्रि. स. रोमांचित करणें.
सरूर–पु. आनंद, किंचितशी आलेली धुंदी.
सरेखना–क्रि. अ. पाहा 'सहेजना'.
सरेखा–वि. समजदार, शहाणा.
सरेदस्त–अ. आतां, यावेळीं.
सरेनौ–अ. सुरवातीपासून. [रस्त्यावर.
सरेबाजार–अ. लोकांसमोर, सर्वांसमोर,
सरेरह–पु. मोठा रस्ता.–अ. रस्त्यावर.
सरो–पु. सुरुचें झाड. [संबंध.
सरोकार–पु. संबंध, परस्पर व्यवहाराचा
सरोज–पु. कमळ.
सरोजना–क्रि. स. मिळविणें.
सरोपा–पु. होरा.
सरोरुह–पु. कमळ.
सरोवर–पु. मोठा तलाव.
सरोसामान–पु. सामुग्री.
सरोही–स्त्री. सिरोहीची तलवार.
सरौता–पु. अडकित्ता.
सर्गना–पु. सरदार, नेता.
सर्जन–पु. उत्पत्ति, रचना, त्याग.
सर्द–वि. आळशी, थंड, मंद, निर्वीर्य.
सर्दमिजाज–वि. निरुत्साही, शुष्क, कठोर हृदयी.
सर्दी–स्त्री. थंडपणा, सर्दी (रोग), हिंवाळा.
सर्प–पु. साप, एक म्लेच्छ जात, सरपटण्याची
सर्फ–पु. व्याकरण, अपव्यय. . [क्रिया.
सर्फा–पु. खर्च, मितव्यय, वृद्धि.
सर्बस–पु. सर्वस्व.
सर्म, शर्म–स्त्री. लाज.
सर्राफ–पु. सराफ.
सर्राफा–पु. सराफ बाजार.
सर्व–वि. सर्व.–पु. शंकर, विष्णु, पारा.
सर्वकाम–पु. सर्व इच्छा असणारा, इच्छा
सर्व ग्रास–पु. खग्रास. [पूर्ण करणारा, शंकर.
सर्व जनीन–वि. सार्वजनिक.
सर्वत्र–अ. सर्व जागीं.
सर्वतोभाव–अ. चांगल्याप्रकारें, बरोबर.
सर्वथा–अ. अगदीं, सर्व प्रकारें, सर्व तऱ्हेचें, सर्व. [देव, बुद्ध, शंकर.
सर्वज्ञ–वि. सर्व कांहीं जाणणारा–पु. ईश्वर,
सर्वरी–पु. रात्र.
सर्वस्व–पु. सार, सर्व मालमत्ता.
सर्वस –पु. सर्वस्व.
सर्वसम्पद–पु. कॉमनवेल्थ. [असलेला.
सर्वाधिकारी–पु. हुकुमशहा, सर्व अधिकार
सर्षप–पु. मोहरी, मोहरी इतकें प्रमाण किंवा
सलकी–स्त्री. कमळाचा देंठ. [वजन.
सलग–पु. नवलकोल. [आराम.
सलतनत–स्त्री. राज्य, साम्राज्य, व्यवस्था,
सलना–क्रि. अ. छिद्र पाडणें, छिद्रांत अडकविणें. [लोक.
सलफ–वि. गत, व्यतीत.–पु. जुन्याकाळचे
सलब–वि. नाश.
सलभ–पु. पतंग (दिव्याचा).

**सलमा**–पु. सोन्याचांदीची तार.
**सलवट**–स्त्री. सुरकुती. [पाणी मुरणें.
**सलसलाना**–क्रि. अ. घामानें डबडबणें,
**सलहज**–स्त्री. मेहुण्याची बायको.
**सला**–स्त्री. आमंत्रण.
**सलाई**–स्त्री. धातूची बारीक सळई.
**सलाई फेरना**–सळई गरम करून डोळे फोडण्याकरितां डोळ्यांत घालणें.
**सलाख**–स्त्री. सळई. [लोणचें.
**सलाद**–पु. कांदे,मुळे इत्यादिकांच्या पानांचें
**सलाबत**–स्त्री. दृढता, भय.
**सलाम**–पु. वंदन. [न जाणें.
**(दूरसे) सलाम करना**–वाईट गोष्टीजवळ
**सलाम बोलना**–हजर होणें. [सलाम करणें.
**सलाम देना**–बोलावण्याची सूचना देणें,
**सलाम अलैकुम**–स्त्री. सलाम.
**सलामत**–वि. सुरक्षित, कायम, जिवंत व निरोगी.–अ. ठीक. [मितव्यय.
**सलामतरवी**–स्त्री. मध्यम मार्गानें वागणें,
**सलामती**–स्त्री. रक्षण, बचाव,निरोगीपणा, कुशल, क्षेम, अस्तित्व.
**सलामी**–स्त्री. नमस्कार करण्याची क्रिया, सैनिकांची सलामी.
**सलामी उतरना या दागना**–स्वागतार्थ तोफांची किंवा बंदुकांची सलामी देणें.
**सलाह**–स्त्री. सदाचार, सल्ला, इच्छा.
**सलाहकार**–पु. सल्ला देणारा, नीतिपूर्वक
**सलि**–स्त्री. चिता. [आचरण करणारा.
**सलिल**–पु. पाणी.
**सलीक़ा**–पु. रीत, कुशलता, सभ्यता, वर्तन.
**सलीक़ामंद**–वि. वाकबगार, तज्ञ, सभ्य,
**सलीता**–पु. फार जाड सुती कापड. [हुन्नरी.
**सलीब**–स्त्री. सूळ, ख्रिस्ताचा क्रॉस.
**सलीम**–वि. योग्य, ठीक, निरोगी, शुद्ध हृदय, शांत, गंभीर. [बुद्धिमान.
**सलीमुत्तबा**–वि. कोमल मनाचा, गंभीर,
**सलीस**–वि. सुगम, सरळ व वाक्प्रचारयुक्त (भाषा). [संबंध.
**सलूक**–पु. सरळमार्ग, रीतभात, भलाई,
**सलूका**–पु. गारोडी, पोलकें, बंडी.
**सलूना**–वि. तिखटमिठाचें, स्वादिष्ट.
**सलूनी**–स्त्री. राखी पौर्णिमा.
**सलूप**–वि. स्वल्प, थोडें.
**सलैला**–वि. शेवाळलेली (जागा), निसरडी.
**सलोक, श्लोक**–वि. लोकासह,यश, श्लोक.
**सलोतर**–पु. पशुरोगाची चिकित्सा.
**सलोतरी**–पु. पशु वैद्य.
**सलोना**–वि. खारट, सुंदर.
**सलोने**–वि. मजेदार, सुंदर, चमचमित.
**सलौना**–पु. श्रावणी, राखी पौर्णिमा.
**सल्ख**–स्त्री. शुक्ल पक्षाची द्वितीया, कातडी ओढून काढण्याची क्रिया.
**सल्लभ**–पु. टोळ, पतंग (कीटक).
**सल्लम**–स्त्री. खादी.
**सव, शव**–पु. प्रेत.
**सवत, सवति**–स्त्री. सवत.
**सवन**–पु. प्रसव, यज्ञस्नान, यज्ञ,चंद्र, अग्नि.
**सवरी, शबरी**–स्त्री. एक भिल्लीण.
**सवाँग**–पु. सोंग, नक्कल.
**सवा**–वि. सव्वा.
**सवाई**–वि. जयपूरच्या महाराजांची एक पदवी.–स्त्री. कर्जाच्या एक चतुर्थांश व्याज देण्याचा कर्जाचा एक प्रकार.–वि. सव्वा.

**सवाद, स्वाद**–पु. स्वाद.
**सवादिक**–वि. स्वादिष्ट.
**सवानह**–पु. घटना. 'सानहा' चे अ. व.
**सवानह उम्री**–जीवन चरित्र.
**सवाब**–पु. पुण्य, चांगुलपणा.
**सवाया**–पु. सव्वा, सवायकी.
**सवार**–पु. स्वार, घोडेस्वार (सैनिक).–वि. एकाद्या वस्तूवर चढलेला.
**सवारी**–स्त्री. वाहन, मिरवणूक, स्वार.
**सवारी गाँठना**–प्रभाव पाडणें,स्वारी भरणें.
**सवाल**–पु. प्रश्न,मागणी,प्रार्थना, गणिताचा
**सवाल जवाब**–पु. वादविवाद,हुज्जत. [प्रश्न.
**सवाल लगाना**–प्रश्न सोडविणें.
**सवाली**–वि. मागणी करणारा.
**सविनय अवज्ञा**–स्त्री. सविनय कायदेभंग.
**सवेरा**–पु. सकाळ. [पाढा, एक छंद.
**सवैया**–पु. सवाशेराचें वजन, सवायकीचा
**सस**–पु. चंद्र, उभें पीक.
**ससंक**–वि. शंकित, भयानक.
**ससक**–पु. ससा.
**ससकना**–क्रि. अ. स्फुंदणें. [पु. चंद्र.
**ससधर, ससहर, ससांक, ससि, ससिहर**–
**ससुर**–पु. सासरा. [सासर.
**ससुरा**–पु. सासरा, एक प्रकारची शिवी,
**ससुराल**–पु. सासर. [वस्तु, साधारण.
**सस्ता**–वि. स्वस्त, भाव कमी झालेली
**सस्ती**–स्त्री. स्वस्ताई. [श्रमांत काम होणें.
**सस्ते छूटना या निबटना**–थोड्याशा परि-
**सस्त्र, शस्त्र**–पु. शस्त्र, हत्यार, पोलाद,
**सस्त्रीक**–वि. स्त्रीसहित. [लोखंड.
**सस्य, शस्य**–पु. धान्य, फळ, गुण, तृण.–वि. स्तुत्य, उत्तम.

**सह**–अ. तुल्य, सोसून, एकेकाळीं, बरोबर, सहित.–वि. हजर, सहनशील, समर्थ, योग्य.–पु. मार्गशीर्ष, नख, सामर्थ्य.
**सहका**–पु. फूस. [पदार्थ, मदतनीस.
**सहकार**–पु. सहकार्य, आंबा, सुगंधित
**सहकार(रि)ता**–स्त्री. सहायता.
**सहकारी**–पु. सहयोगी, मदतनीस.
**सहगवन, सहगौन**–पु. सहगमन,सती जाणें.
**सहगामिनी**–स्त्री. सती जाणारी स्त्री, पत्नी, सहचरी. [मित्र.
**सहचर**–पु. बरोबर चालणारा, नोकर,
**सहज**–पु. सख्खा भाऊ, स्वभाव.–वि. स्वाभाविक, साधारण, सोपें, बरोबर
**सहजन**–पु. शेवगा. [उत्पन्न होणारा.
**सहजिया**–पु. वैष्णव संप्रदायाचा अनुयायी.
**सहजै**–अ. अनायासें.
**सहत**–पु. मध.–क्रि. सहन करतो.
**सहतरा**–पु. पित्तपापडी.
**सहताना**–क्रि. अ. विश्रांति घेणें.
**सहतूत**–पु. तुतीचें झाड व फळ.
**सहदानी**–स्त्री. चिन्ह, खूण.
**सहदेई**–स्त्री. चिकणीचें झाड.
**सहन**–पु. सोसण्याची क्रिया, क्षमा, आंगण, सुंदर रेशमी कापड.
**सहना**–क्रि. स. सहन करणें,परिणाम भोगणें,
**सहनाई**–स्त्री. सनई. [ओझें सहन करणें.
**सहनायन**–स्त्री. सनई वाजविणारी स्त्री.
**सहनीय**–वि. सहन करण्याजोगें.
**सहभोज**–पु. सहभोजन.
**सहभोजी**–पु. सहभोजन करणारा.
**सहम**–पु. भय, संकोच.
**सहमना**–क्रि. अ. भिणें.
**सहयोग**–पु. सहकार्य, सोबत, मदत.

**सहयोगी**–वि. सहकारी, समकालीन.
**सहर**–पु. सकाळ, जादू, शहर.–अ. मंद-
**सहरखेज**–वि. घोर. [गतीनें.
**सहर गही**–स्त्री. निर्जळी व्रताच्या आधीचें
**सहरा**–पु. मैदान, जंगल. [पहाटेचें भोजन.
**सहराती**–वि. नागरिक.
**सहराना**–क्रि. स. थोपटणें, गोंजारणें.– क्रि. अ. भीतीनें कांपणें.
**सहरावनि**–स्त्री. गुदगुली.
**सहरी**–स्त्री. मासा, निर्जळी व्रताच्या आधीचें पहाटेचें भोजन.
**सहरोष**–अ. रागानें.
**सहल**–वि. सोपें.
**सहलाना**–क्रि. स. गोंजारणें, चोळणें, गुदगुल्या करणें.–क्रि. अ. खाजविणें.
**सहवासिनी**–वि. बरोबर राहणारी, पत्नी.
**सहवासी**–वि. बरोबर राहणारा, पति.
**सहवैय्या**–वि. सहनशील.
**सहस, सहस्र**–वि. हजार.
**सहसगो**–पु. सूर्य.
**सहस नयन**–पु. इंद्र.
**सहस बाहु**–पु. शंकर, हैहय राजा.
**सहस सीस**–पु. विष्णु, शेष नाग.
**सहसा**–अ. एकाएकीं.
**सहसाखी**–पु. इंद्र.–अ. साक्षीसहित.
**सहसानन**–पु. शेष.
**सहाइ-ई**–पु. मदतगार.–स्त्री. मदत.
**सहाउ**–पु. मदत. [सहानुभूति.
**सहानुभूति**–स्त्री. दुसऱ्याबद्दलचा कळवळा,
**सहाबा**–पु. मित्र, महम्मदाचा मित्र.
**सहाय**–पु. मदत, मित्र, सोबती, सेवक, चक्रवाक.
**सहायक**–वि. मदत करणारा, मोठ्या नदीला मिळणारी लहान नदी.
**सहायता**–स्त्री. मदत.
**सहार**–पु. सहनशीलता. [वाहणें.
**सहारना**–क्रि. स. सहन करणें, भार
**सहारा**–पु. मदत, आश्रय, भरंवसा.
**सहालग**–पु. लग्न सराई.
**सहावना**–क्रि. स. सहन करविणें.
**सहावल**–पु. ओळंबा, पाटबंधारा
**सहिजन**–पु. शेवगा.[ खात्यांतील अधिकारी.
**सहिजानी**–स्त्री. ओळख, चिन्ह.
**सहित**–अ. बरोबर.
**सहिथी**–स्त्री. बरछी.
**सहिदान**–पु. चिन्ह, साक्षी.
**सहिदानी**–स्त्री. चिन्ह, साक्षी.
**सहिय-या**–पु. साहायक, आश्रय, भरंवसा.
**सही**–वि. खरें, प्रामाणिक, शुद्ध, हस्ताक्षर.
(न) **सही**–नसेना का.
(यही) **सही**–एवढें तर एवढें.
**सही भरना**–कबूल करणें. [स्थितींत.
**सही सलामत**–जसाच्या तसा, शाबूत
**सही सालिम**–वि. बरोबर, पूर्ण.
**सहुँ**–अ. समोर, कडे.
**सहूलत**–स्त्री. सवलत, मर्यादा.
**सहूलियत**–स्त्री. सवलत, मर्यादा.
**सहेजना**–क्रि. स. संभाळणें, सांगून सवरून स्वाधीन करणें.
**सहेजवाना**–क्रि. स. संभाळविणें.
**सहेली**–स्त्री. मैत्रीण, दासी. [जागा.
**सहेत**–पु.प्रेमी जनांची भेटण्याची निश्चित
**सहैया**–वि. सहन करणारा.
**सहो**–पु. चूक, भूलचूक.
**सहोदर**–पु. सख्खी भांवडें.–वि. सख्खा.

**सहोटी**–स्त्री. द्वार, उंबरठा.
**सह्य**–पु. सह्याद्रि.-वि. सहन करण्याजोगें.
**साँई, साइयाँ**–पु. स्वामी, प्रभु, फकीर, पति.
**साँउणी**–स्त्री. गाडीतळ.
**साँक**–स्त्री. शंका, भय, दमा.
**साँकड़ा**–पु. पायांतील एक दागिना (तोडे).
**साँकर**-स्त्री. सांखळी.-पु. संकट.-वि. संकुचित,
**साँकरा**–पु. कष्ट.-वि. संकुचित. [दुःखमय.
**साँग**–स्त्री. एक प्रकारची बरची, भाला.
**साँगी**–स्त्री. बरची.–पु. सोंगाड्या.
**साँघर**–पु. पहिल्या नवऱ्याचा मुलगा.
**साँघरच**–पु. सत्य, यथार्थ, योग्य.
**साँच**–वि. सत्य, ठीक.
**साँचला**–वि. सत्यवादी.
**साँचा**–पु. साचा, नमूना, कपड्यावर फुलें छापण्याचा लाकडी साचा.
**साँचेमें ढला होना**–सर्वांग सुंदर असणें.
**साँची**–पु. एक प्रकारचें थंड पेय, पोथीच्या आकाराची छपाई.–वि. सत्य.
**साँझ**–स्त्री. संध्याकाळ.
**साँझा**–पु. संध्याकाळ. [फुलांचा गालिचा.
**साँझी**–स्त्री. श्रावणांत देवासमोर काढलेला
**साँट**–स्त्री. छडी, चाबूक, वळ.
**साँटना**–क्रि. स. चिकटविणें, जोडणें,
**साँटा**–पु. चाबूक, ऊस. [मिसळणें.
**साँटिया**–पु. दौंडीवाला.
**साँटी**–स्त्री. लहान चाबूक, गांठी भेटी,
**साँठ**–पु. ऊस, पायांतील दागिना. [सूड.
**साँठ गाँठ**–स्त्री. भेट, मेलमिलाफ.
**साँठना**–क्रि. स. अडकून राहणें, गुप्त
**साँठी**–स्त्री. संपत्ति, भांडवल. [संबंध ठेवणें.
**साँड़**–पु. सांड, पोळ. –वि. उडाणटप्पू,
**साँडनी**–स्त्री. उंटीण, सांडणी. [सशक्त.
**साँडा**–पु. एक जंगली प्राणी. [स्वार.
**साँडिया**–पु. वेगानें चालणारा उंट, सांडणी-
**साँढ**–पु. पोळ. [संतुष्ट.
**सांत**–वि. ज्याचा अंत होतो तें, स्थिर,
**साँति**–स्त्री. शांति.–अ. ऐवजीं, साठीं.
**साँध**–पु. लक्ष, वेध. [पूर्ण करणें, जोडणें.
**साँधना**–क्रि. स. नेम धरणें, मिश्रण करणें,
**सांधा**–क्रि. मिळविलें, जोडलें.
**साँप**–पु. साप, फार दुष्ट मनुष्य.
**(कलेजे पर) साँप लोटना**–अतिशय दुःख होणें (ईर्षेमुळें).
**साँप सूँघ जाना**–मरणें, गप्प बसणें.
**साँप छछूंदरकी दशा**–गोंधळलेली स्थिति.
**(आस्तीनका) साँप**–घरभेद्या.
**(आस्तीनमें) साँप पालना**–दुष्ट माणसाला
**साँप धरन**–पु. महादेव. [आश्रय देणें.
**साँपिन-नी**–स्त्री. सर्पिण.
**सांब**–पु. जांबुवंतीचा व श्रीकृष्णाचा मुलगा.
**साँभर**–पु. राजपुतान्यांतील एक सरोवर, सांबर सरोवराच्या पाण्यानें बनलेलें मीठ, हरणाची एक जात, प्रवासांतील फराळ.
**साँमुहे**–अ. समोर, समक्ष.–पु. एक प्रकारचें
**सांमुहें**–पु. वऱ्या. [अस्त्र.
**साँवत**–पु. सामंत, वीर.
**साँव करन**–पु. शाम कर्ण.
**साँवर-रा-रो**–वि. सांवळा.–पु. श्रीकृष्ण, प्रेमी किंवा पति यांचें सूचक नांव
**साँवल–ला**– पाहा 'साँवर.'
**साँवलताई**–स्त्री. सावळेपणा.
**साँवलिया**–पु. श्रीकृष्ण.
**साँवाँ**–पु. वऱ्या, एक अन्न.
**साँस**–स्त्री. श्वास, दम्याचा रोग.

**साँस उखड़ना या टूटना**–मरणाच्या वेळचा श्वास लागणें.
**साँस तक न लेना**–गपचूप रहाणें, मौन धारण करणें. [दम लागणें.
**साँस फूलना**–जलद श्वासोच्छ्वास होणें,
**साँस रहते**–जिवांत जीव असेपर्यंत.
**गहरी, ठंडी या लंबी साँस लेना**–दुःखामुळें दीर्घश्वास घेणें.
**साँस न मिलना, साँस न होना**–उसंत नसणें.
**साँस पूरी करना**–खितपून मरणें.
**साँस भरना**–वारा भरणें.
**साँस लेना**–विश्रांति घेणें.
**साँसोका तार**– श्वासोच्छ्वास.
**साँसत-ती**–स्त्री. कोंडल्यामुळें होणारा त्रास, फार कष्ट, बखेडा.
**साँसत घर**–पु. अंधार कोठडी.
**साँसना**–क्रि. स. शासन करणें, धमकावणें, दुःख देणें. [भीति.
**साँसा**–पु. श्वास, आयुष्य, प्राण, संशय,
**सांसारिक**–वि. लौकिक, ऐहिक.
**सा**–स्त्री. गौरी, लक्ष्मी.–अ. सारखा, प्रमाण वाचक शब्द (जसें :–थोडासा).
**साइक, सायक**–पु. बाण, तलवार.
**साइका**–स्त्री. वीज.
**साइ(य)त**–स्त्री. एक तास, पळ, मुहूर्त.
**साइद**–पु. दंड, बाहू, मनगट.
**साइयाँ**–पु. स्वामी, परमेश्वर.
**साइर, सायर**–पु. कवि.
**साई**–स्त्री. बयाणा.–पु. उद्योगी.
**साईस**–पु. मोतद्दार, साईस.
**साईसी**–स्त्री. मोतद्दाराचें काम.
**साउज**–पु. वनजंतु, शिकार.
**साऊ, साहू**–पु. सावकार. [स्त्री. एक देवी.
**साकंभरी**–पु. सांबर सरोवराचा प्रदेश.–
**साक**–स्त्री. पोटरी.–पु.-भाजी.–अ. सहित.
**साकट-त**–वि. शाक्तमतानुयायी, दुष्ट, कोणत्याच गुरूजवळून दीक्षा न घेतलेला.
**साका**–पु. संवत, स्मारक, प्रसिद्धि, यश, धाक, संधि.
**साका चलाना या बांधना**–दरारा बसविणें.
**साकिन**–वि. रहिवासी.
**साक़ी**–पु. दारू पाजणार,हुक्का पाजणारा. –अ. हे प्रिय, हे प्रिये.
**साकेत, साकेतन**–पु. अयोध्या नगरी.
**साक्षात्**–पु. मुलाखत, भेट.–अ. समोर.– वि. साकार. [होणारें ज्ञान.
**साक्षात्कार**–पु. भेट, इंद्रियद्वारा पदार्थाचें
**साक्षी**–पु. साक्षीदार,पाहुणारा.–स्त्री. साक्ष.
**साक्ष्य**–पु. साक्ष.
**साख**–पु. साक्ष, पत, दरारा, मर्यादा देण्याघेण्यांतील प्रामाणिकपणा.
**साख उठना**–पत जाणें.
**साखना**–क्रि. स. साक्ष देणें.
**साखर, साक्षर**–वि. साक्षर, विद्वान.
**साखा**–स्त्री. फांदी, हात व पाय, विभाग, अंग, एकाद्या मूळ वस्तूपासून निघालेले भाग. [पद.
**साखी**–पु. साक्षीदार, वृक्ष.–स्त्री. साक्ष,
**साखी पुकारना**–धांवा करणें, साक्ष देणें.
**साखू**–पु. शालवृक्ष. [उच्चार (लग्नांत).
**साखोचार, साखोचारन**–पु. गोत्राचा
**साख्त**–स्त्री. बनावट गोष्ट, बनविण्याची
**साख्य**–पु. साक्ष. [क्रिया.
**साग**–पु. भाजी, शिजविलेली भाजी.
**सागपात**–पु. मीठ भाकरी, साधें जेवण.
**सागर**–पु. दारूचा प्याला, पेला.

**सागर चलना**–मद्यपान होणें.
**सागू, सागूदाना**–पु. साबूदाणा.
**सागौन**–पु. सागाचें झाड, सागवान.
**साचिक**–पु. लग्नांत सोहळ्याचा दिवस.
**साज**–पु. थाट, सजविण्याचें सामान, वाद्य, मिलाफ, लढाईचीं हत्यारें.–वि. बनविणारा.
**साजगार**–वि. शुभ, बरोबर.
**साजन**–पु. स्वामी, ईश्वर, सज्जन, प्रेमी.
**साजबाज**–पु. तयारी, घनिष्ठ संबंध.
**साज व सामान**–पु. सरंजाम, थाटमाट.
**साजिंदा**–पु. वाद्यें वाजविणारा, कलावंतीणीच्या गाण्याला वाद्याची साथ देणारा.
**साजिश**–स्त्री. मेळ, कारस्थान.
**साझा**–पु. भागीदारी, हिस्सा.
**साझी**–पु. भागीदार.
**साझेदार**–पु. भागीदार.
**साट**–पु. वळ (अंगावर).
**साटक**–पु. भुस्सा, तुच्छ वस्तु, एक वृत्त.
**साटन**–पु. साटीण कपडा.
**साटना**–क्रि. स. जोडणें, वळविणें, ठोकाठोकी करणें.
**साठनाठ**–वि. निर्धन, रुक्ष, विखुरलेलें.
**साठा**–पु. सांठा, एक सबंध ऊस.–वि. साठ वर्षांचा.
**साठा गाँठा**–पु. युक्ति, उपाय.
**साठा सो पाठा**–साठ वर्षांचा तरुण असतो.
**साठी बुद्धि नाठी**–साठ वर्षांचा झाला म्हणून बुद्धि नाहींशी झाली.
**साड़ी**–स्त्री. लुगडें, साडी.
**साढसाती**–स्त्री. साडेसाती.
**साढ़ी**–स्त्री. आषाढी पेरणी, साय, साडी, लुगडें.
**साढ़ू**–पु. साडू, मेहुणीचा पति.
**साढ़े**–वि. अर्धा (उदा. साढ़ेचार.).
**साढ़ेसाती**–स्त्री. साडेसाती.
**सात**–वि. सात (संख्या).
**सात पाँच**–लुच्चेगिरी.
**सात पाँच करना**–मागेंपुढें करणें.
**सात राजाओंकी साक्ष देना**– भराभर शपथा घेणें.
**सात फेरी**–स्त्री. सप्तपदी.
**सातला**–पु. एक झाड.
**सातवाँ**–वि. सातवा, साती.
**साता**–वि. सात.–स्त्री. शांति.
**सातिग, सात्विक**–वि. सत्त्वगुणी, सत्त्वगुणापासून उत्पन्न.–पु. सत्त्व गुणापासून उत्पन्न होणारे विकार. (जसें घाम, रोमांच, कंप, अश्रु, वगैरे.)
**साथ**–पु. सोबत, सहचर, घनिष्ठता.–अ. सह, विरुद्ध, करितां, द्वारा.
**साथ ही, साथ साथ**–शिवाय, त्याबरोबर.
**साथ ही साथ**–बरोबर.
**(एक) साथ**–एकदम.
**साथरा**–पु. **साथरी**–स्त्री. चटई, गवताचें अंथरुण.
**साथिन,साथिनी**–स्त्री. सोबतीण.
**साथिया**–रांगोळी (काढलेली).
**साथी**–पु. मित्र, सहाय्यक.
**सादगी**–स्त्री. साधेपणा, निष्कपटपणा.
**सादर**–अ. आदरपूर्वक.
**सादा**–वि. साधा, निर्भेळ, निष्कपट, मूर्ख.
**सादापन**–पु. साधेपणा.
**सादिक**–वि. खरा, सत्यनिष्ठ, उपयुक्त.
**सादिर**–वि. चालू.
**सादी**–स्त्री. एक पक्षी, पुरी, लग्न.–वि. भोळी. –पु. घोडा, शिकार.
**सादूर**–पु. हिंस्र पशु, सिंह.
**सादृश्य**–पु. सारखेपणा, बरोबरी.
**साध**–पु. साधु, सज्जन, योगी, फरुकाबाद व कनोजच्या आसपास राहणारी एक जात.–स्त्री. इच्छा, ध्येय.–वि. उत्तम.
**साधक**–वि. उपासना करणारा.

**साधन**–पु. उपाय, उपासना, उपकरण, शोध, कारण, युक्ति.

**साधना**–स्त्री. उपासना, ध्येय, सिद्धि.–क्रि. स. साधणें, नेम मारणें, शोधणें, मोजणें, संवय करणें, पक्कें करणें, शुद्ध करणें, ताब्यांत घेणें. [समान.

**साधारण**–वि. सामान्य, सरळ, सार्वजनिक,

**साधारणतः**–अ. सामान्यतः, बहुधा.

**साधी**–वि. ठरविलेली, बनविलेली.

**साधु**–पु. कुलीन, महात्मा, सज्जन.

**साधुवाद**–पु. 'साधु साधु' म्हणून एकाद्याची प्रशंसा करणें, आभार, वाहवा.

**साध्य**–वि. सिद्ध करण्यायोग्य, सिद्ध होण्याजोगें, सोपें.–पु. देवता, शक्ति, न्यायामध्यें अनुमान करण्याजोगी गोष्ट.

**सान**–पु. सहाण, अहंकार, धार.

**सान देना, धरना या रखना**–धार लावणें.

**सान रखना या चढ़ाना**–उत्तेजन देणें.

**सानना**–क्रि. अ. धार लावविणें, मिसळणें, गुंफणें, जबाबदार धरणें.

**सानिअ**–पु. रचणारा, कारागिर.

**सानिअ कुदरत मुतलक**–पु. सृष्टिकर्त्ता, [ईश्वर.

**सानिहा**–पु. दुर्घटना.

**सानी**–स्त्री. पाण्यांत कालवून द्यावयाचें पशूचें खाणें.–वि. तोडीचा, दुसरा.

**सानी न रखना सानी न होना**–जोड नसणें, अद्वितीय असणें. [जंगल, मार्ग.

**सानु**–पु. शिखर, अंत, चौरस जमीन,

**सानुकूल**–वि. अनुकूल, इच्छानुसार.

**साप**–पु. शाप.

**सापना**–क्रि. स. शाप देणें, शिव्या देणें.

**साफ**–वि. स्वच्छ, स्पष्ट, सुवाच्य, उज्वल, निष्कपट, समतल, साधा, निःसत्त्व, चुकतें.–अ. अगदीं, त्रासाशिवाय.

**साफ़ करना**–नष्ट करणें, हत्या करणें, कर्ज फेडणें.

**साफ़ा**–पु. पगडी, मुंडासे, रोजचे कपडे साबण लावून साफ करणें.

**साफ़ी**–स्त्री. हातरुमाल, चिलमीच्या खालीं गुंडाळण्याचें कापड, भांग चाळण्याचें कापड.

**साबर**–पु. टिकाव (खोदण्याचा), सांबर, सांबरी विद्या, सांबराचें कातडें.

**साबाल**–स्त्री. कालडी छप्पर.

**साबिक**–वि. पूर्वीचें, जुनें.

**साबिक दस्तूर**–अ. पूर्ववत.

**साबिक़ा**–पु. ओळख, संबंध.–वि. जुनें.

**साबित**-वि. शाबूत, बरोबर, शाबित, स्थिर.

**साबिर**–वि. संतोषी, धैर्यवान.

**साबुत**–वि. शाबूत, ठीक, स्थिर.

**साबुन**–पु. साबू.

**साबूदाना**–पु. साबूदाणा.

**सामंजस्य**–पु. मेळ, समन्वय, सारखेपणा, औचित्य, उपयुक्तता, अनुकूलता.

**सामंत**–पु. वीर, योद्धा, सरदार, राजा.

**साम**–पु. संधि, यज्ञाच्यावेळीं म्हणावयाचें वेद मंत्र, सामवेद, मधुर भाषण, सामान, शाम, काठीच्या टोकावर लावलेलें लोखंड. [वस्तु, साधन.

**सामग्री**–स्त्री. सामुग्री, सामान, आवश्यक

**सामर्थ**–स्त्री. शक्ति.

**सामर्थ्य**–पु. स्त्री. शक्ति, योग्यता, भाव प्रगट करण्याची शक्ति.

**सामद**–वि. शांतिदाता, समजूत घालणारा.

**सामना**–पु. समोरासमोर येणें, भेट,

मुलाखत, विरोध, स्पर्धा दृष्टा, दृष्ट, वस्तूचा दर्शनी भाग.

**सामने**–अ. समोर, तुलनेंत विरुद्ध.

**सामने होना**–स्त्रियांनीं पडदा न करतां समोर येणें.

**सामयिक**–वि. प्रचलित, समयानुसार, वेळे [संबंधीं.

**सामयिक पत्र**–वर्तमानपत्र.

**सामरिक**–वि. युद्धासंबंधीं.

**सामसाली**–वि. राजनितिज्ञ.

**सामहि**–अ. समोर.

**सामाँ**–पु. श्रोता.

**सामाजिक**–वि. समाजाचा, सभेशीं संबंध ठेवणारा.

**सामान**–पु. साधन सामुग्री, माल, बंदोबस्त.

**सामान्य**–वि. साधारण.–पु. समानता, साहित्यांतील एक अलंकार, सर्व वस्तूंत समान रूपानें आढळणारा गुण. (जसें– माणसांत मनुष्यत्व ) [सह.

**सामिष**–वि. अमिषासहित, मांस, मासे इ.

**सामी**–पु. स्वामी, पति.–स्त्री. शेंबी (काठीची).–वि. सयामचा राहणारा.

**सामुझि**–स्त्री. बुद्धि, ज्ञान, समज.

**सामुहाँ-हें-हैं**–अ. समोर, पुढें.

**साम्प्रदायिक**–वि. एकाद्या सम्प्रदायाशीं संबंध ठेवणारा.

**साम्प्रदायिक निर्णय**–जातीय निर्णय.

**साम्य**–पु. समानता.

**साम्यवाद**–पु. समाजवाद, समाजसत्तावाद.

**साम्राज्य**–पु. सार्वभौम राज्य, पूर्ण अधिकार.

**सायंकाल**–पु. संध्याकाळ. [पांचाची संख्या.

**सायक**–पु. बाण, तरवार, एक वर्णवृत्त,

**सायत**–पु. तास, पळ, शुभ मुहुर्त.

**सायबान**–पु. घराच्या पुढलें छप्पर.

**सायर**–पु. सागर, वरचा भाग, कर न देणारी उत्पन्नाची जमीन, फुटकळ, मजामारणारा, जकात.

**सायल**–पु. प्रश्नकर्ता, मागणारा, भिकारी, प्रार्थना करणारा, उमेदवार.

**साया**–पु. छाया, पडछाया, भूतप्रेत, स्त्रियांच्या परकरासारखें एक वस्त्र, प्रभाव.

**सायामें रहना**–आश्रयास राहणें.

**सायुज-ज्य**–पु. एकजीव, मुक्ति.

**सारंग**–पु. एक प्रकारचें हरीण, कोकिला, सूर्य, सिंह, हंस, मोर, चातक, हत्ती, घोडा, छत्र, शंख, कमळ, सोनें, दागिना, तलाव, भुंगा, मधमाशी, कापूर, श्रीकृष्ण, चंद्र, समुद्र, पाणी, बाण, दिवा, शंकर, साप, चंदन, जमीन, केस, शोभा, स्त्री, रात्र, दिवस, तलवार, ढग, हात, नक्षत्र, बेडूक, आकाश, पक्षी, ईश्वर, कामदेव, वीज, फूल, सारंगी.–वि. रंगलेले, सुंदर, सरस.

**सार**–पु. तत्त्व, निष्कर्ष, अर्क, पाणी, गीर, मलई, साय, परिणाम, धनदौलत, लोणी, अमृत, शक्ति, मज्जा, जुगाराचा फांसा, तलवार, एक प्रकारचें वर्णवृत्त, एक अर्थालंकार, मैना, पालनपोषण, पलंग, बायकोचा भाऊ.–वि. उत्तम, मजबूत.

**सारगर्भित**–वि. उद्बोधक, भरीव.

**सारथि**–पु. रथ चालविणारा, समुद्र.

**सारद**–स्त्री. सरस्वती, वाणी.–पु. शरद-ऋतु.–वि. शरद संबंधीं.

**सारदा**–स्त्री. शारदा.

**सारदी**–वि. शरद ऋतूंतील.

**सारदूल**–पु. वाघ, सिंह.

**सारना**–क्रि. स. पूर्ण करणें, दुरुस्त करणें, सुंदर बनविणें, सांभाळणें, डोळ्यांत

अंजन घालणें, चालविणें (शस्त्र).
**सारबान**–पु. उंटावर बसणारा.
**सारभाटा**–पु. लाट.
**सारस**–पु. एक पक्षी, हंस, चंद्र, कमल.
**सारसुता**–स्त्री. यमुना नदी.
**सारसुती**–स्त्री. सरस्वती. [–वि. पूर्ण.
**सारा**–पु. काव्यांतील एक अलंकार, मेहुणा.
**सारिखा, सारखा**–वि. सारखा, तुल्य.
**सारी**–स्त्री. मैना, सोंगटी, फासा, निवडुंग, साडी.–वि. संपूर्ण.
**सारु**–पु. सार, तत्त्व, अर्क, रस.
**सारो**–वि. सर्व.–स्त्री. मैना.–पु. मेहुणा.
**सारौं**–स्त्री. मैना.
**सार्थ**–वि. अर्थसहित.
**सार्थक**–वि. अर्थसहित, सफळ, गुणकारी.
**सार्वजनिक**–वि. सर्वसाधारण लोकासंबंधीं.
**साल**–स्त्री. छिद्र, जखम, दुःख, खाटेच्या पायांत केलेलें चौकोनी छिद्र.–पु. मूळ, वृक्ष, वर्ष, तांदुळ, ऊस, धूप, शालवृक्ष,
**सालक**–वि. दुःखदायक. [घर, जागा.
**साल खुर्दा**–वि. जुना, पुष्कळ, दिवसांचा,
**साल गिरह्**–स्त्री. वाढदिवस. [वृद्ध.
**सालन**–पु. मसाला घालून शिजविलेली भाजी.
**सालना**–क्रि. अ. सलणें, टोंचणें.–क्रि. स.
**सालरस**–पु. धूप, राळ [दुःख देणें, टोंचणें.
**सालस**–पु. पंच.
**सालसा**–पु. रक्तशुद्धि करणारा काढा.
**सालहा साल**–अ. वर्षानुवर्षे.
**सालाना**–वि. वार्षिक.
**सालाना जलसा**–वार्षिकोत्सव.
**सालार**–पु. नेता.
**सालारजंग**–सेनापति, मेहुणा.
**सालिक**–पु. यात्रेकरू, धर्मनिष्ठ माणूस.
**सालिम**–वि. संपूर्ण, निरोगी.
**सालियाना**–वि. वार्षिक.
**सालिस**–वि. तिसरा.–पु. पंच.
**सालिसनामा**–पु. पंचनामा.
**साली**–स्त्री. बायकोची बहीण.
**सालु**–पु. दुःख, त्रास, ईर्षा.
**सालू**–पु. शालू, एक प्रकारचा लाल कपडा.
**सालूर**–पु. लुगडें, शालू, शिंपला. [वर्ष.
**सालेक बीसा**–पु. अधिक महिना असलेलें
**सालेह्**–वि. भला, सदाचारी, नशीबवान.
**साले हाल**–पु. चालू वर्ष.
**साव**–पु. सज्जन, सावकार, बालक, पुत्र.
**सावक**–पु. छावा.
**सावकरन**–पु. अश्वमेधांतील घोडा, काळे
**सावचेत**-वि. सावध. [कान असलेला घोडा.
**सावज**–पु. एक शिकारी पशु.
**सावत**–पु. सवती मत्सर.
**सावधान**–वि. सावध.
**सावधानता**–स्त्री. सावधपणा, हुशारी.
**सावधानी**–स्त्री. सावधपणा, काळजी.
**सावन**–पु. श्रावण, श्रावण महिना.
**सावनी**–स्त्री. श्रावणी पौर्णिमा, श्रावण महिन्यांत वर पक्षाकडून वधूगृहीं पाठविलेली भेट. –वि. श्रावण संबंधीं.
**साबर**–पु. टिकाव (खोदण्याचा), सांबर,
**सावाँ**–पु. वऱ्या, सावा. [शांबरी विद्या.
**साष्टांग**–वि. आठ अंगासहित.
**सास-सू**–स्त्री. सासू.
**सासति**–स्त्री. दंड, शिक्षा. [पांढरें कापड.
**सासन लेट**–पु. एक प्रकारचें जाळीदार
**सासना**–स्त्री. आज्ञा, शास्त्र, शिक्षा, अधिकार, इंद्रियनिग्रह, ताबा, राजानें दान दिलेली भूमि.

**सासा**–पु. श्वास, शंका.
**सासुर**–पु. सासर. [तस्व.
**सास्वत**–वि. कायमचें.–पु. स्वर्ग, शाश्वत
**साह**–पु. शेट, सावकार, साधु, बादशहा, मुसलमान फकीरांची पदवी.–वि. मोठा.
**साहनी**–स्त्री. सैन्य, सहचर, परिषद.
**साहब**–पु. मित्र, मालक, ईश्वर, साहेब, मानाचें संबोधन.
**साहबज़ादा**–पु. पुत्र, श्रीमंताचा मुलगा.
**साहब सलामत**–स्त्री. प्रणाम.
**साहबा**–स्त्री. बाईसाहेब.
**साहबाना**–वि. साहेबासारखें.
**साहबी**–वि. साहेबाचें.
**साहस**–पु. हिंमत, द्वेष, अत्याचार, शिक्षा, दंड, क्रूरता, वाईट काम.
**साहसिक**–वि. डाकू, निर्भय, पराक्रमी.
**साहा**–पु. लग्न किंवा शुभ कार्याकरितां निश्चित केलेला मुहूर्त.
**साहित्य**–पु. एकत्र होणें, लिपीबद्ध विचार किंवा ज्ञान, लोकहितसंबंधीं विचार असलेले गद्यापद्याचें ग्रंथ.
**साहित्यिक**–पु. लेखक, कवि इत्यादि.
**साहिब**–पु. साहेब.
**साहियाँ**–पु. ईश्वर.
**साहिर**–पु. जादुगार.
**साहिल**–पु. किनारा.
**साही**–स्त्री. सायल नांवाचा प्राणी (ज्याच्या आंगावर टोंकदार कांटे असतात त्यांचा कोणी कोणी लिहिण्याकरितां लेखणी सारखा उपयोग करितात).
**साहु-हू**–पु. साधू, सावकार.
**साहुल**–पु. ओळंबा.
**साहूकार**–पु. सावकार, व्यापारी.
**साहूकारा**–पु. रुपयांची देवघेव, सावकारांचा व्यवहार चालतो ती पेठ.–वि. सावकारांचा.
**साहूकारी**–स्त्री. सावकारी.
**साहैं**–स्त्री. बाहू, हात.–अ. समोर.
**सिंकना**–क्रि. अ. शेकलें जाणें.
**सिंगरौर**–पु. शृंगबेरपुर.
**सिंगा**–पु. रणशिंग.
**सिंगार**–पु. शृंगार, शोभा, शृंगाररस.
**सिंगारदान**–पु. शृंगार पेटी.
**सिंगारना**–क्रि. स. सजविणें, रचणें.
**सिंगारहाट**–पु. वेश्या राहण्याचें ठिकाण, चकला.
**सिंगारहार**–पु. पारिजातकाचें फूल.
**सिंगारिया**–पु. पुजारी.
**सिंगारी**–पु. शृंगार करणारा, सजविणारा.
**सिंगाल**–पु. एक प्रकारचा पहाडी बकरा.
**सिंगिया**–पु. एक प्रकारचें विष.
**सिंगी**–पु. रणशिंग.–स्त्री. एक प्रकारची मासळी, शरीरांतून रक्त काढण्याची नळी. [वरचें एक आभूषण.
**सिंगौटी**–स्त्री. शृंगार पेटी, बैलांच्या शिंगा-
**सिंघल**–पु. सिंहल, लंका.
**सिंघाडा**–पु. शिंगाडा, या आकाराची शिलाई, समोसा नांवाचें एक पक्वान्न.
**सिंघासन**–पु. सिंहासन.
**सिंचाई**–स्त्री. जमिनीवर पाणी शिंपडण्याची क्रिया किंवा मजूरी.
**सिंचाना**–क्रि. स. पाणी शिंपडविणें.
**सिंजाफ़**–पु. कपड्याची किनार, काळसर पांढरा घोडा. [जाणें, रथ, वायु.
**सिबन**–पु. थेंब थेंब गळणें, वितळणें,

**सिंदूर**–पु. एक लाल रंग, शेंदूर.
**सिंदूरतिलका**–स्त्री. सौभाग्यवती स्त्री.
**सिंदूरदान**–पु. कुंकवाची डबी, विवाहांत वरानें वधूचा भांग कुंकवानें भरण्याचा विधि. [ फुलझाड.
**सिंदूरिया**–वि. खूप लाल.–स्त्री. एक
**सिंदो (धो) रा**–पु. कुंकवाची डबी.
**सिंधु**–पु. समुद्र, नदी, हत्तीचा मद, चाराची संख्या, साताची संख्या, सिंधप्रांत, सिंधू नदी, एक राग.
**सिंधुर**–पु. हत्ती, आठाची संख्या.
**सिंधूरा**–पु. एक राग.
**सिंसप-पा**–पु. शिशवीचें झाड.
**सिंह**–पु. सिंह, सिंहरास, वीरता दर्शक
**सिंहनी**–स्त्री. सिंहीण. [शब्द.
**सिंहपौर**–पु. सिंहाची मूर्ति बसविलेला
**सिंहाड़ा**–पु. शिंगाडा. [ मोठा दरवाजा.
**सिंहावलोकन**–पु. सिंहाप्रमाणें मागें पाहात पुढें चालणें, पुढें जाण्यापूर्वी मागील गोष्टी संक्षेपानें सांगणें.
**सिंहासन**–स्त्री. सोन्याचें बनविलेलें राजाचें आसन, देव बसविण्याची बैठक.
**सिअना**–क्रि. स. शिवणें. [ शिवणारा.
**सिअनि**–स्त्री. शिवण, शिलाई. –वि.
**सिअरा**–पु. छाया, पडछाया.–वि. थंड.
**सिआर, सियार**–पु कोल्हा.
**सिकंजबीन**–स्त्री. शिक्यांत किंवा लिंबाच्या रसांत शिजविलेलें सरबत.
**सिकंजा**–पु. पिळण्याचें एक यंत्र, घाणा, कापूस दाबण्याचें यंत्र, पुस्तकाचें कव्हर
**सिकंदरा**–पु. सिग्नल. [ दाबण्याचें यंत्र.
**सिकचा**–पु. काडी, सळई.
**सिकटा**–पु. खापराचा किंवा मातीच्या भांड्याच्या तुकडा.
**सिकड़ा**–पु. साखळी. [ करगोटा.
**सिकड़ी**–स्त्री. दरवाजाची कडी, साखळी,
**सिकता**–स्त्री. रेताड जमीन, वाळू, साखर.
**सिकत्तर**–पु. सेक्रेटरी, मंत्री.
**सिकन**–स्त्री. सुरकुती.
**सिकना**–क्रि. अ. भाजलें जाणें.
**सिकरा**–पु. एक शिकारी पक्षी, ससाणा.
**सिकली**–स्त्री. धार देण्याची क्रिया.
**सिकलीगर**–पु. हत्याराला पाणी व धार
**सिकहर-रा**–पु. शिंकें. [देणारा कारागिर.
**सिकहरपर चढ़ना**–शेफारणें, हरबऱ्याच्या झाडावर चढणें.
**सिका**–पु. विश्वासू व्यक्ति, मातबर मनुष्य.
**सिकार**–पु. शिकार.
**सिकुड़न**–स्त्री. संकोच, सुरकुती. [पडणें.
**सिकुड़ना**–क्रि. अ. संकोच होणें, सुरकुत्या
**सिकोड़ना**–क्रि. स. पाहा 'सिकुड़ना'.
**सिकोरा**–पु. मातीचा वाडगा.
**सिकोही**–वि. गर्विष्ठ, वीर.
**सिक्कड़**–पु. शितोडा, थेंब.
**सिक्कर**–स्त्री. साखळी.
**सिक्का**–पु. मोहोर, पैसे, छाप, पदक.
**सिक्का बैठना या जमना**–अधिकार स्थापित
**सिक्ख**–स्त्री. शीख, शिष्य. [होणें.
**सिखंड**–पु. श्रीखंड, चंदन.
**सिख**–स्त्री. शिकवण, शिखर, शेंडी.– पु. शिष्य, नानकपंथी.
**सिखरन**–स्त्री. दह्यांत साखर घालून केलेलें सरबत, शिकरण, कोशिंबीर.
**सिखलाना**–क्रि. स. शिकविणें, उपदेश देणें.
**सिखा, शिखा**–पु. शेंडी.
**सिखाई**–स्त्री. शिकवण.

**सिखाना पढ़ाना**–शिकवून चतुर करणें.
**सिखावन**–पु. उपदेश.
**सिखावना**–क्रि. स. शिकविणें.
**सिखि**–पु. मोर, शेंडी असलेला.
**सिखी**–पु. मोर, अग्नि, इंद्र, बगळा, एक नाग, एक प्रकारचें विष, पर्वत, मेथी, घोडा, केतु ग्रह, वृक्ष, कोंबडा, बाण, शेंडे [नक्षत्र.
**सिग़र**–पु. बालपण.
**सिग़रसिन**–अल्पवयी.
**सिगरा-री-रो**–वि. संपूर्ण.
**सिचान**–पु. बाजपक्षी.
**सिचाना**–क्रि. स. शिंपडविणें.
**सिच्छा**–स्त्री. शिक्षण, विद्येचा अभ्यास, दक्षता, उपदेश, धडा, शिक्षा.
**सिजदा**–पु. दंडवत.
**सिजावर**–पु. नावेच्या शिडाची दोरी.
**सिझना**–क्रि. अ. शिजणे.
**सिझाना, सिझावना**–क्रि. स. शिजविणें, तपश्चर्या करणें. [कडी.
**सिटक (कि) नी**–स्त्री. दरवाजाची लोखंडी
**सिटपिटाना**–क्रि. अ. दबणें, किंकर्तव्य मूढ होणें, संकोचणें.
**सिट्टा**–पु. ज्वारी, बाजरीचें कणीस.
**सिट्टी**–स्त्री. वाक्पटुता.
**सिट्टी भूलना, सिट्टी बिट्टी भूलना**–गडबडून जाणें. [याच्या शिव्या.
**सिठना-नी**–स्त्री. विवाहांत गाण्यांत धाव-
**सिठाई**–स्त्री. नीरसता, मंदपणा.
**सिड़**–स्त्री. उन्माद, वेड, ध्यास.
**सिड़पन**–पु. वेडेपणा.
**सिड़ी**–वि. वेडा, ध्यास घेतलेला, बावचळ-
**सितंबर**–पु. सप्टेंबर महिना. [लेला.
**सित**–पु. चांदी, मूळ, चंदन, शुक्राचार्य, शुक्ल पक्ष, साखर, तीळ.–वि. पांढरा,
**सितम**-पु. अनर्थ, जुलुम. [चमकदार, स्वच्छ.
**सितमगर**–पु. जुलमी. [आहे असा.
**सितमज़दा**–वि. ज्याच्यावर जुलुम झाला
**सितमणि**–पु. स्फटिक.
**सितम रसीदा**-वि. ज्याच्यावर जुलुम झाला
**सितरा**–स्त्री. घाम. [आहे असा.
**सितला**–स्त्री. देवी.
**सिता**–स्त्री. साखर, चांदी, गोरोचन, एक फूल, शुक्ल पक्ष, चांदणें.
**सिताइश**–स्त्री. शाबासकी, आधार.
**सिताब**–अ. लवकर.
**सितार**–पु. सतार.
**सितारा**–पु. तारा, बिंदी, नशीब, सतार.
**सितारा चमकना या बलंद होना**–नशीब उघडणें.
**सितारा गर्दिशपर होना**–दिवस बरे नसणें.
**सितारा शनास**–जोतिषी.
**सितारे हिन्द**–पु. ब्रिटिश सरकारकडून मिळत असलेली पदवी.
**सितारिया**–पु. सतार वाजविणारा.
**सितारी**–स्त्री. लहान सतार.
**सितुई**–स्त्री. शिंप, संक्रांत.
**सिथिल**–वि. शिथिल.
**सिदक़**–पु. सत्यता. [किंवा व्हरांडा.
**सिदरी**–स्त्री. तीन दरवाजे असलेली खोली
**सिदौसी**–अ. तात्काळ.
**सिद्दीक़**–वि. सत्यनिष्ठ.
**सिद्ध**–पु. महात्मा, ज्ञानी, व्यवहार, काळा धोत्रा, सैंधव.–वि. प्रसिद्ध, संपन्न, प्राप्त, सफळ, तयार, शोधलेला, शिजविलेला, निश्चित केलेला. [प्राप्त होते तें स्थळ.
**सिद्धपीठ**–पु. ज्या ठिकाणीं लवकर सिद्धि

**सिद्धरस**–पु. पारा.
**सिद्धहस्त**–वि. निपुण, हातखंडा.
**सिद्धाई**–स्त्री. सिद्धता.
**सिद्धांत**–पु. विचार करून स्थिर केलेलें मत, मुख्य उद्देश्य. [झालेला.
**सिद्धार्थ**–पु. गौतम बुद्ध.-वि. सर्व इच्छा पूर्ण
**सिद्धि**–स्त्री. निकाल, दुर्गा, खडावा, भाग्योदय, मोक्ष, धनदौलत, कौशल्य, प्रभाव, निर्णय, दक्ष प्रजापतीची एक कन्या, प्राप्ति, सफलता, शाबित होणें.
**सिधाई**–स्त्री. सरळपणा.
**सिधाना, सिधारना**–क्रि. अ. जाणें, मरणें.–
**सिधार**–जाण्याची क्रिया. [क्रि. स. सुधारणें.
**सिधि**–स्त्री. सिद्धि.
**सिन**–पु. वय.
**सिनक**–स्त्री. शेंबुड. [शिंकरणें.
**सिनकना**–क्रि. अ. शेंबूड काढणें, नाक
**सिनबुलूग़त**–पु. तारुण्य. [एक वैदिक देवी.
**सिनीवाली**–स्त्री. शुक्ल पक्षाची प्रतिपदा,
**सिन्नी**–स्त्री. मिठाई, प्रसाद म्हणून वाटावयाची मिठाई. [वाटणें, आनंदित होणें.
**सिन्नी चढाना, सिन्नी मानना**–खडी साखर
**सिपर**–स्त्री. ढाल. [पेशा.
**सिपहगिरी, सिपाहागिरी**-स्त्री. शिपाईगिरी.
**सिपह सालार**–पु. सेनापति.
**सिपाड़ा-रा**—पु. कुराणांतील अध्याय.
**सिपास**–स्त्री. आभार.
**सिपाह**–स्त्री. सेना, फौज.
**सिपाहियाना**–वि. शिपायाप्रमाणें.
**सिपाही**–पु. सैनिक, चपराशी, पोलिस कान्स्टेबल. [स्त्री. अमानत.
**सिपुर्द**–वि. सोपविलेला, ताब्यांत दिलेला.–
**सिप्पर**–स्त्री. ढाल.
**सिप्पा**–पु. युक्ति, खुणेवर केलेला वार, प्रभाव.
**सिप्पा जमाना**–एकादें कार्य पूर्ण करण्याची युक्ति लढविणें.
**सिप्पा बांधना**–दरारा बसविणें.
**सिप्पा बैठना**–युक्ति लागू पडणें.
**सिफ़त**–स्त्री. विशेषता, स्वभाव, लक्षण.
**सिफ़र**–पु. शून्य.
**सिफ़ला**–वि. नीच, तुच्छ.
**सिफ़ारत**–स्त्री. राजदूताचें काम.
**सिफ़ारिश**–स्त्री. शिफारस.
**सिफ़ारिशी**–वि. शिफारस झालेला.
**सिफ़ारिसी टट्टू**–शिफारशीमुळें कामावर
**सिबा**–पु. संतति. [ठेवलेला मनुष्य.
**सिबिका**–स्त्री. मेणा, पालखी.
**सिमंत**–पु. भांग (केसांचा).
**सिमटना**–क्रि. अ. संकुचित होणें, सुरकुत्या पडणें, एकत्र होणें, व्यवस्थित होणें, पूर्ण होणें, लज्जित होणें, भिणें.
**सिमर**–पु. शेवरीचें झाड.
**सिमरन**–पु. स्मरण.
**सिमरना**–क्रि. स. स्मरण करणें.
**सिमाना**–पु. मर्यादा.–क्रि. स. शिवणें.
**सिमिटना**–क्रि. स. आकुंचन पावणें, लाजणें, भिणें, एकत्र करणें, सुरकुती पडणें.
**सिमेटना**–क्रि. स. पाहा 'सिमिटना'.
**सिय**–स्त्री. जानकी. [बनविणें, शिवणें.
**सियना**–क्रि. अ. उत्पन्न करणें, रचणें,
**सियरा**–वि. थंड, कच्चा.
**सियराना**–क्रि. अ. थंड होणें, जुळणें, व्यतित
**सिया**–स्त्री. सीता. [होणें, संपणें.
**सियाई**–स्त्री. शिलाई.

**सियावत**–स्त्री. सरदारी, अधिकार, राज्य-कारभार, सैयद (मुसलमान).
**सियाना**–क्रि. स. शिवविणें.
**सियापा**–पु. कोणी मेल्यानंतर स्त्रियांचें उर बडवून रडणें (कांहीं जातींत).
**सियार-ल**–पु. कोल्हा.
**सियारा**–पु. नांगरलेली जमीन सारखी करण्याचा पावडा.
**सियाला**–पु. हिवाळा.
**सियाबडी**–स्त्री. बुजगावणें.
**सियासत**–स्त्री. राज्यव्यवस्था, धमकी, भीति, राजनीति.
**सियासी**–वि. राजकीय.
**सियाह**–वि. काळें, अशुभ.
**सियाहगोश**–पु. रान मांजर.
**सियाहत**–स्त्री. प्रवास.
**सियाहा**–पु. रोजखर्डा, सरकारी रजिष्टर.
**सियाही**–स्त्री. शाई, अंधार, काजळ, कलंक.
**सिर**–पु. डोकें.
**सिर आँखो पर बैठाना**–सत्कार करणें.
**सिर आँखोपर होना**–सहर्ष स्वीकार करणें.
**(भूत प्रेत या देवी देवता का) सिर पर आना**–अंगांत येणें.
**सिर उठाना**–विरोध करणें.
**सिर ऊँचा करना या होना**–प्रतिष्ठेनें वागणें.
**सिरके बल जाना**-आदर पूर्वक सामोरें जाणें.
**सिर खाना**–डोकें उठविणें.
**सिर उठना**–विरोध असणें.
**सिर करना**–वेणी घालणें.
**सिर कटना**–मान मुरगाळणें.
**सिर काढ़ना**– नांव काढणें.
**सिर खपाना**–कामांत डोकें घालणें, व्यर्थ त्रास करून घेणें.
**सिर खाली करना**–डोकें पिकविणें, व्यर्थ बडबडणें.
**सिर चकराना**–डोकें भणभणणें, किंवा फिरूं लागणें.
**सिर चढ़ाना**–अत्यंत पूज्य मानणें.
**सिर धरना, सिर माथे लेना**–शिरसावंद्य मानणें.
**सिर धुनना**–कपाळ बडविणें.
**सिर नीचा करना**–मान खालीं घालणें.
**सिर पटकना**–कपाळ बडविणें, फार धडपड करणें, पस्तावणें.
**सिर पर चढ़ कर बोलना**–पापाला वाचा फुटणें.
**होना**–सूडानें वेडावणें.
**सिरपर खून चढ़ना, सिर पर खून सवार (मृत्यु) सिरपर खेलना, (मृत्यू) सिर पर नाचना**–यमाचे पाश पडणें.
**(किसीके) सिर पड़ना**–माथीं मारलें जाणें.
**सिरपर लेना**–डोक्यावर बसविणें, डोक्यावर घेणें.
**सिर पर सवार रहना**–छातीवर उभें असणें.
**सिर पर सींग होना**–वैशिष्टय असणें.
**सिर ओखली में देना**–संकटांत सांपडणें.
**सिर जोड़ना**–एक होणें, संप करणें.
**सिर मारना**–युक्ति लढविणें.
**सिरसे खेल जाना**–प्राण देणें.
**सिरसे पैर तक**–पूर्णपणें.
**सिर से पैर तक आग लग जाना**–अंगाचा भडका होणें.
**सिर पर छप्पर रखना**–जबाबदारी लादणें.
**सिर पर पाँव रखना**–उद्धट होणें.
**सिर पर पाँव रखकर भागना**–जीव घेऊन पळणें.
**सिर पर हाथ फेरना**–वश करणें.
**सिरसे कफ़न बांधना**–मरण्यास तयार होणें.
**सिर होना**–मागें लागणें, गळीं पडणें, झगडणें.
**सिर पर सेहरा होना**–एकाद्या कामाचें श्रेय मिळविणें.
**सिर कटा**–वि. अपशकुनी, डोकें उडविलेला, दुसऱ्याचें अनिष्ट करणारा.

**सिरका**–पु. शिरका.
**सिरकी**–स्त्री. बांबूची चटई.
**सिरखप-पा**–वि. मनस्वी, लहरी.
**सिरखपी**–स्त्री. डोकेफोड, जोखीम, परिश्रम.
**सिरगा**–पु. घोड्याची एक जात.
**सिरचंद**–पु. हत्तीच्या डोक्यावरील अर्ध चंद्राकार अलंकार.
**सिरजक**–पु. परमेश्वर, उत्पन्नकर्ता.
**सिरजनहार-री**–पु. सृष्टिकर्ता.
**सिरजना**–क्रि. स. उत्पन्न करणें, बनविणें, रचणें, संचय करणें.
**सिरताज**–पु. मुकुट, शिरोमणी, सरदार.
**सिर-ता-पा**–अ. डोक्यापासून पायापर्यंत, आदीपासून अंतापर्यंत.
**सिरदार**–पु. सरदार.
**सिरनामा**–पु. शीर्षक, पाकिटावर लिहिला जाणारा पत्ता.
**सिरनेत**–पु. पगडी, क्षत्रियांची एक शाखा.
**सिरनेत्र**–पु. टोपी, पगडी. [ पोशाख.
**सिरपाव**–पु. डोक्यापासून पायापर्यंतचा
**सिरपेच**–पु. पगडी, पगडीवरील एक आभूषण. [भूषण, टोप.
**सिरपोश**–पु. डोक्यावरील आवरण, शिरो
**सिरफेंटा**–पु. फेटा, पागोटें.
**सिर फोडौवल**–स्त्री. मारपीट, ठोकाठोकी.
**सिरबंद**–पु. फेटा, पागोटें.
**सिरबंदी**–स्त्री. डोक्यांतील एक दागिना.
**सिरमनि**–पु. श्रेष्ठ व्यक्ति, डोक्यावरील
**सिरमौर**–पु. मुकुट, श्रेष्ठ व्यक्ति. [रत्न.
**सिरवा**–पु. धान्य उफणतांना वारा घालाव-यास वापरतात तें वस्त्र. [णतांना.
**सिरवा मारना**-वस्त्रानें वारा घालणें (उफ-

**सिर(रि)स**–पु. शिसवाप्रमाणें एक उंच झाड.
**सिर (ह) हाना**–पु. बिछान्याचा उशा-
**सिरौंचा**–पु. बेत. [ कडील भाग.
**सिरा**–पु. टोंक, शेवटचा भाग, आरंभाचा भाग, वरचा भाग.
**सिरेका**–पहिल्या दर्जाचा.
**(परेल) सिरेका**–कमालीचा, सर्वांत उत्तम.
**सिराज**–पु. सूर्य, दिवा.
**सिराजी**–पु. सूर्याच्या रथाचा घोडा.
**सिरात**–वि. गार, थंड.
**सिराना**–क्रि. अ. थंड होणें, मंद होणें, संपणें, दूर होणें, जाणें, सुटी मिळणें.–क्रि. स. थंड करणें, पूर्ण करणें, घालविणें.
**सिरावना**–क्रि. स. पाहा 'सिराना'.
**सिरिश्क**–पु. अश्रु.
**सिरिश्ता**–पु. कचेरी, विभाग.
**सिरिश्तेदार**–पु. मुकदम्याचें कागदपत्र ठेवणारा कोर्टांतील मनुष्य.
**सिरिस**–पु. पाहा 'सिरस.' [शिरोभूषण.
**सिरी**–स्त्री. श्री, लक्ष्मी, शोभा, एक
**सिरोपाव**–पु. पोशाख (राजाकडून मिळ-
**सिरोमनी**–पु. पाहा 'सिरमनि'. [णारा).
**सिरोही**–स्त्री. एक प्रकारचा काळा पक्षी. –पु. तलवारीकरितां प्रसिद्ध असलेलें राजपुतान्यांतील एक ठिकाण, तलवार.
**सिर्फ़**–अ. केवळ, मात्र.–वि. एकटा, शुद्ध.
**सिल**–स्त्री. पाटा, दगड.–पु. क्षयरोग.
**सिलई**–पु. एक बदक.
**सिलक**–स्त्री. लडी, हार, पंक्ति, दोरा.
**सिलकी**–पु. वेल.
**सिलखड़ी-री**–स्त्री. संगजिऱ्याचा दगड,
**सिलगना**–क्रि. अ. पेटणें. [खडू.

**सिलप**–स्त्री. शिल्प, कारागिरी. [सत्यानाश.
**सिलपट**–वि. घासलेलें, सपाट, चौरस,
**सिलपोहनी**–स्त्री. विवाहांतील एक रीत.
**सिलफची, सिलबची**–स्त्री. हात धुण्याचें
**सिलबट्टा**–पु. पाटावरवंटा. [भांडें.
**सिलबिल**–वि. गबाळग्या, बावळट.
**सिलवट**–स्त्री. सुरकुत्या.
**सिलवाई**–स्त्री. शिलाई.
**सिलवाना, सिलाना**–क्रि. स. शिववणें.
**सिलसिला**–पु. श्रेणी, परंपरा, साखळी, व्यवस्था, वंशपरंपरा.–वि. ओला, बुळबुळित, गुळगुळित.
**सिलसिला बंदी**–स्त्री. क्रम लावण्याचें काम.
**सिलसिली**–वि. निसरडी.
**सिलसिलेवार**–वि. क्रमानुसार.
**सिलह**–पु. हत्यार.
**सिलहखाना**–पु. शस्त्रागार.
**सिलहपोश**–पु. शस्त्रधारी. [वेंचणारा.
**सिलहारा**–पु. शेतांतील उरलें सुरलें धान्य
**सिलहिला**–वि. बुळबुळीत, निसरडी.
**सिला**–पु. कापणी झाल्यानंतर वेंचलेले शेतांतील दाणे.–स्त्री. शिळा, शिलाजीत, दगडाचा चौकोनी तुकडा.
**सिलाई**–स्त्री. शिवण, शिवणाची मजुरी,
**सिलावट**–पु. शिलाई. [शिवण्याचें काम.
**सिलाह**–पु. हत्यार, कवच.
**सिलाहर**–पु. पाहा 'सिलहारा'.
**सिलाही**–पु. शिपाई.
**सिलिप**–पु. पाहा 'सिलप'.
**सिली**–स्त्री. शिळा, दगड, सहाण.
**सिलीमुख**–पु. भुंगा.
**सिलौट-टा**–पु. पाटावरवंटा.
**सिल्क**–पु. मोत्याची लड.
**सिल्प**–पाहा 'सिलप'. [इत्यादि.
**सिल्ला**–पु. शेतांतील पडलेले दाणे, कणसें
**सिल्ली**–स्त्री. सहाण, दगडी पाटी.
**सिव**–पु. शंकर, मंगल, पाणी, पारा, मोक्ष, वेद, देव, रुद्र, वसु, लिंग.
**सिवई**–स्त्री. शेवया.
**सिवसैल, शिवशैल**–पु. कैलास पर्वत.
**सिवा**–अ. शिवाय.–वि. अधिक.– स्त्री. दुर्गा, पार्वती, मोक्ष, कोल्ही.
**सिवाइ**–अ. शिवाय.
**सिवाई**–स्त्री. एक प्रकारची माती.
**सिवान-ना**–पु. सीमा.
**सिवार-ल**–स्त्री. शेवाळ.
**सिवाला**–पु. शिवालय, महादेव.
**सिविका**–स्त्री. मेणा, पालखी.
**सिवी**–पु. शिबी राजा.
**सिसकना**–क्रि. अ. आंतल्या आंत रडणें, हुंदके देऊन रडणें, जीव घाबरणें, मरणकाळ येणें, तरसणें.
**सिसकारना**–क्रि. अ. सुस्कारा टाकणें.
**सिसकारी, सिसकी**–स्त्री. हुंदका, शिटी-
**सिसिर**–पु. शिशिर ऋतु. [सारखा आवाज.
**सिसु**–पु. शिशु, बालक.
**सिसो(सौ)दिया**–पु. रजपुतांची एक शाखा.
**सिहरन**–स्त्री. थरकांप.
**सिहरना**–क्रि. अ. थरथरणें (थंडी मुळें),
**सिहरा**–पु. मुंडावळ. [थरथरणें, भिणें.
**सिहरी**–स्त्री. कंप, रोमांच, थंडीताप, भीतीनें होणारा थरकाप.
**सिहान्त**–क्रि. अ. ईर्षा करणें, स्पर्धा करणें, लोभ करणें, मोहित होणें.–क्रि. स. द्वेषानें पाहाणें, लालचावलेल्या नजरेनें पाहाणें.

**सिहारना**–क्रि. स. शोध करणें, जमविणें.
**सिहिटि**–स्त्री. सृष्टि.
**सिहुंड़**–पु. एक झाड.
**सिहोड़**–पु. एक झाड.
**सींक**–स्त्री. गवताची बारीक काडी, गवताची काडी, शंकु, नाकांतील चमकी.
**सींक खड़ी होना**–नाक वर होणें.
**सींका**–पु. शिंकें, टहाळा.
**सींकिया**–पु. रेघांचें रंगीत कापड.–वि. गवताच्या काडीसारखा बारीक.
**सींकिया जवान**–काडी पहिलवान.
**सींग**–पु. शिंग, शिंगाचें बनविलेलें वाद्य.
**(कहीं) सींग समाना**–जागा मिळणें.
**(किसीके सिरपर) सींग होना**–विशेषता असणें. [असून मुलांत मिसळणें.
**सींग काटकर बछड़ोंमें मिलना**–म्हातारा
**सींगना**–क्रि. स. शिंगावरून चोरीची जनावरें ओळखणें.
**सींगरी**–स्त्री. एक प्रकारची शेंग.
**सींगी**–स्त्री. शिंग (वाद्य), एक प्रकारचा मासा, दूषित रक्त काढण्याची तुंबडी.
**सींच**–स्त्री. शिंपण.
**सींचना**–क्रि. स. शिंपडणें, भिजविणें.
**सींचाई**–स्त्री. शिंपडण्याची क्रिया.
**सींवँ-व**–पु. सीमा.
**सींवँ चरना या कांडना**-अधिकार गाजविणें.
**सी**–अ. समान.–स्त्री. हुश्श, स्फुंदन, 'सूं सूं' असा ध्वनि.
**(अपनी) सी**–आपल्या कडून होईल तितकें,
**सीउ**–पु. थंड. [मनाप्रमाणें
**सीकर**–स्त्री. साखळी.–पु. पाण्याचा थेंब, घाम. [हत्यारावर चढलेला गंज काढणें.
**सीकल**–पु. झाडावर पिकलेला आंबा.–स्त्री
**सीकस**–पु. रेताड जमीन.
**सीका**–पु. मुकुट, शिंकें.
**सीकाकाई**–स्त्री. शिकेकाई.
**सीकी**–पु. भोंक, छिद्र.–स्त्री. लहान शिंकें.
**सीकुर**–पु. धान्याचा कणसावरील फुलोरा.
**सीख**–स्त्री. शिक्षण, शिकवण, सल्ला, लोखंडी छड, मांस भाजण्याची लोखंडी सळई. [ण्याची क्रिया, लोखंडी गज.
**सीखचा**–पु. लोखंडी सळईवर मांस भाज-
**सीखना**–क्रि. स. शिकणें, एकादी गोष्ट समजावून घेणें.
**सीखपर**–पु. बदकाच्या जातीचा एक पक्षी.
**सीग़ा**–पु. भाग, खातें, व्यापार, पेशा, सांचा.
**सीझ**–स्त्री. उकड, शिजण्याची क्रिया.
**सीझना**–क्रि. अ. शिजणें, उष्णतेनें वितळणें किंवा मऊ पडणें, कष्ट सोसणें, तपश्चर्या करणें, मिसळण्याजोगें होणें, गारठणें, कर्जाची फेड होणें.
**सीटना**–क्रि. स. बढाई मारणें.
**सीटपटाँग**–स्त्री. दर्पोक्ति.
**सीटी**–स्त्री. शीळ, शिटी (आवाज व वाजविण्याचें साधन).
**सीठना**–पु. विवाह प्रसंगीं स्त्रिया गातात तें अश्लील गीत.
**सीठनी**–स्त्री. पाहा 'सीठना'.
**सीठा**–वि. निरस, बेचव.
**सीठी**–स्त्री. चोथा, निःसत्व भाग, बेचव
**सीड़**–स्त्री. ओल. [पदार्थ.
**सीढ़ी**–स्त्री. शिडी, हळू हळू पुढें जाण्याची
**सीत**–पु. थंड. [परंपरा.
**सीत पकड़**–पु. हत्तीला गारठल्यामुळें होणारा रोग. [धारीदार कापड.
**सीतल पाटी**–स्त्री. एक प्रकारची चटई,

**सीतला**–स्त्री. देवी, कांजण्या.
**सीता**–स्त्री. नांगरताना जमिनीवर पडणारी रेघ, सीता, एक वर्णवृत्त.
**सीताफल**–पु. सीताफळ, कोहळा.
**सीत्कार**–पु. दुःखोद्गार.
**सीथ**–पु. शीत (अन्न).
**सीद**–पु. व्याज घेणें.
**सीदना**–क्रि. अ. दुःखी होणें.
**सीध**–स्त्री. लक्ष, निशाण, समोरची जागा.
**सीधा**–वि. सरळ, भोळा, शांत आणि सुशील, ध्येयाकडे असलेला.
**सीधासाधा**–वि. भोळा, सरळ. [आणणें.
**(किसीको) सीधा करना**–ताळ्यावर
**(काम) सीधा करना**–कार्य सफल करणें.
**सीधापन**–पु. सरळपणा.
**सीधे**–अ. सरळ रीतीनें.
**सीन**–पु. नाटकांतील दृश्य, देखावा.
**सीना**–क्रि.स. शिवणें, टांके मारणें–पु. छाती.
**सीना जोरी करना**–रगेलपणा करणें.
**सीना पिरोना**–कशीदा काढणें.
**सीने से लगाना**–मिठी मारून भेटणें,
**सीना जोर**–वि. शिरजोर. [आलिंगन देणें.
**सीना बंद**–पु. चोळी.
**सीना बाँह**–पु. एक प्रकारचा व्यायाम.
**सीना सिपर होना**–क्रि .स. संकटांत उभें
**सीप**–पु. शिंपला. [राहणें.
**सीप(पि)ज**–पु. मोती.
**सीपर**–पु. ढाल.
**सीपसुत**–पु. मोती.
**सीपी**–स्त्री. शिंपला.
**सीबी**–स्त्री. हुंदका.
**सीम-मा**–पु. सीमा.–स्त्री. चांदी, धनदौलत.
**सीमा कॉडना या चरना**–दडपशाही करणें.
**सीमासे बाहर जाना**–मर्यादेबाहेर जाणें.
**सीमान्त**–पु. सरहद्द, सिमाप्रांत.
**सीमाप्रांत**–पु. सरहद्दीवरील प्रांत.
**सीमाब**–पु. पारा.
**सीमी**–वि. चांदीचें. [प्रांत
**सीमोत्तर प्रांत**–वायव्य सरहद्दी पलीकडील
**सीय**–स्त्री. सीता.
**सीयरा**–वि. पाहा 'सियरा'.
**सीर**–पु. नांगर, नांगराला जुंपलेला बैल, सूर्य.–स्त्री. जमीनदार स्वतः करीत असलेली जमीन.–पु. नाडी.–वि. थंड, शांत.
**सीरत**–स्त्री. प्रकृति, गुण, स्वभाव.
**सीरा**–पु. साखरेचा पाक, हलवा.–वि. थंड.
**सील**–स्त्री. जमिनींतील ओलावा.-पु. शील, स्वभाव, उत्तम आचरण.–वि. तत्पर.
**सीला**–पु. गरीब व तपस्वी लोक शेतांतून वेचून घेतात ते दाणे, शेतांतून दाणे वेचून त्यावर निर्वाह करण्याची साधूंची
**सीव**–स्त्री. सीमा. [वृत्ति.–वि. ओलें.
**सीवन**–पु. शिलाई, शिवणामुळें पडलेली
**सीस**–पु. डोकें. [ रेघ, जोड.
**सीसक**–पु. शिसें.
**सीसकार**–पु. कांच काम करणारा कारागीर.
**सीस ताज**–पु. शिकारी जनावरांची टोपी.
**सीस महल**–पु. आरसे महाल.
**सीसा**–पु. शिसें, आरसा, कांच.
**सीसी**–स्त्री. थंडी, दुःख किंवा आनंदाच्या वेळीं तोंडांतून निघणारा शब्द, बाटली.
**सीसों-सौं**–पु. शिसवाचें झाड.
**सीह**–स्त्री. गंध.–पु. सिंह.
**सुं**–प्रत्य. द्वारा, कडून.
**सूंघना**–क्रि. अ. वास घेणें.

**सुंघनी**–स्त्री. तपकीर.
**सुंघाना**–क्रि. स. वास घेवविणें.
**सुंडा**–पु. सोंड.
**सुंडाल**–पु. हत्ती.
**सुंदर**–वि. सुंदर, देखणा.
**सुंधावट**–स्त्री. खरपूस वास, मातीचा वास. –पु.-स्पंज, तोफेची नळी साफ करण्याचा गज, गरम लोखंडांत भोंक पाडण्याचें लोहारांचें हत्यार, डागलेल्या तोफेची किंवा बंदुकीची गरम नळी थंड करण्या-करितां त्यावर घातलेलें ओलें कापड.
**सु**–नामाला जोडून यावयाचें उपपद.
**सुअंजन**–पु. चांगलें अंजन.
**सुअन**–पु. पुत्र.
**सुअना**–क्रि. अ. उगवणें, उत्पन्न होणें.–पु. [पोपट.
**सुअर**–पु. डुक्कर.
**सुआउ**–वि. दीर्घायु.
**सुआन**–पु. कुत्रा.
**सुआना**–क्रि. स. उत्पन्न करणें.
**सुआमी**–पु. स्वामी.
**सुआर**–पु. स्वैंपाकी.
**सुआसिन-नी**–स्त्री. सौभाग्यवती स्त्री.
**सुक**–पु. पोपट, शिरीष वृक्ष.
**सुकचाना**–क्रि. अ. लागणें, संकोचणें.
**सुकटा**–पु. तोटा.–वि. दुर्बळ, काटकुळा.
**सुकटी**–स्त्री. पोपटाची मादी, बोंबील.–वि. सुंदर, दुर्बळ.
**सुकड़ना**–क्रि. अ. आखडणें.
**सुकर्कस**–वि. कठोर, चिडखोर, भांडखोर.
**सुकरति**–स्त्री. सत्कर्म, चांगुलपणा.
**सुकरात**–पु. साक्रेटिस.
**सुकवा**–पु. शुक्र.
**सुकवाना**–क्रि. अ. आश्चर्यचकित होणें.
**सुकाना**–क्रि. स. सुकवणें.
**सुकाल**–पु. सुकाळ.
**सुकित**–पु. शुभ कर्म, मंगल कार्य, सत्कार्य.
**सुकिया, सुकीया**–स्त्री. बायको, स्वकीया.
**सुकी**–स्त्री. पोपटाची मादी.
**सुकुमार**–वि. नाजूक, कोमल.–पु. उत्तम बालक, वनचाफा, तंबाखूचें पान.
**सुकुरना**–क्रि. अ. पाहा 'सिकुड़ना'.
**सुकुलाइत**–स्त्री. श्रेष्ठ, कुलीन स्त्री, शुक्ल ब्राम्हणाची बायको.
**सुकुवाँ(वा)र**–वि. सुकुमार.
**सुकून**–पु. स्थिरता, मनाची शांति.
**सुकूनत**–स्त्री. राहण्याची जागा, निवास [स्थान.
**सुकेत, सुकेतु**–पु. सूर्य.
**सुक्षम**–वि. सूक्ष्म.
**सुक्र**–पु. शुक्र.
**सुक्ल, शुक्ल**–पु. ब्राम्हण, पक्ष, विष्णु, कपिल मुनि.–वि. पांढरा, शुद्ध, सात्विक, यशस्कर, प्रकाशमय.
**सुक्कान**–पु. सुकाणू.
**सुक्ति-क्ती**–स्त्री. शिपला. [धर्मशील.
**सुकृत**–पु. पुण्य, दान.–वि. भाग्यवान,
**सुकृति**–स्त्री. चांगलें काम.
**सुखंडी**–वि. अशक्त.–स्त्री. मुलांना होणारा एक रोग, या रोगांत मुलें अशक्त [होत जातात.
**सुखद**–वि. सुखदायी.
**सुख**–पु. सुख, आराम, एक प्रकारचें वृत्त, आरोग्य, स्वर्ग, पाणी.–अ. स्वभावतः, [सुखपूर्वक.
**सुखक**–वि. शुष्क,
**सुखकारी**–वि. सुखकारक, सुखदायक.
**सुखकरन**–वि. सुख देणारे.
**सुख दानिया**–वि. सुख देणारी. [वृत्त.
**सुखदानी**–वि. सुख देणारी.–स्त्री. एक वर्ण

**सुखवास**–पु. एक उत्तम तांदुळ.
**सुख देनी, सुख दैन**–वि. सुखदायक.
**सुख(खु)न**–पु.कथन, बोल, वचन, कविता,
**सुखनिन्दिया**–स्त्री. साखर झोंप. [म्हण.
**सुखपाल**–पु. एक प्रकारची पालखी.
**सुखमन**–स्त्री. शरीरांतील तीन मुख्य नाड्या पैकीं टाळूंतील नाडी (योगांत).
**सुखमा**–स्त्री. शोभा, सौंदर्य, दहा अक्षरांचें
**सुखरास**–वि. सर्वस्वी सुखमय. [एक वृत्त.
**सुखलाना, सुखाना**–क्रि. स. सुकविणें.
**सुखवन**–पु. एकादी वस्तु सुकल्यामुळें तिच्यांत होणारी घट, शाई सुक-
**सुखवार**–वि. सुखी. [विण्याची वाळू.
**सुखसाध्य**–वि. सोपें, सुकर.
**सुखसार**–पु. मोक्ष.
**सुखसीकर**–पु. आनंदाश्रु.
**सुखांत**–पु. आनंदपर्यवसायी.
**सुखाना**–क्रि. स. सुकविणें.
**सुखागर**–वि. सुखाचें आगर.
**सुखारा-री**–वि. सुखी, सुखद.
**सुखाला**–वि. सुखदायक, सहज.
**सुखासन**–पु. पालखी, डोली, सुखद आसन.
**सुखिर**–पु. सापाचें वारुळ.
**सुखी**–वि. आनंदित.
**सुखेन**–पु. विष्णु, वरुणाचा पुत्र जो वानर होता, परीक्षितीच्या एका पुत्राचें नांव.
**सुखैना**–वि. आनंद देणारा.
**सुगना, सुग्गा**–पु. पोपट.
**सुगबु**–स्त्री. चुळबुळ.
**सुगम**–वि. गमन करण्यास सोपें, सहज,
**सुगल**–पु. सुग्रीव. [सरळ.
**सुगसुग**–स्त्री. कुणकुण, पत्ता, बोली.
**सुगाई**–स्त्री. कामधेनु.
**सुगाना**–क्रि. अ. शंका घेणें, नाराज होणें.
**सुगुरा**–पु. गुरुपासून मंत्र घेतलेला मनुष्य.
**सुगैया**–स्त्री. चोळी.
**सुग्रीव**–पु. वानरांचा राजा व वालीचा भाऊ, इंद्र, शंख.–वि. सुंदर मानेचा.
**सुघट-ट्ट**–वि. सुंदर, सुसाध्य.
**सुघटित**–वि. चांगल्या तऱ्हेनें घडविलेला.
**सुघड़-र**–वि. सुंदर, निपुण.
**सुघड़ई**–स्त्री. निपुणता, डौलदारपणा.
**सुघड़ता**–स्त्री. सौंदर्य, निपुणता.
**सुघड़पन**–पु. कुशलता, सौंदर्य. [निपुणता.
**सुघड़ाई**–स्त्री. सुंदरता, डौलदारपणा,
**सुघरी**–स्त्री. सुमुहुर्त.–वि. सुंदर.
**सुचना**–क्रि. स. संचय करणें, एकत्र करणें.
**सुचा**–वि. पवित्र, स्त्री.–ज्ञान, समज.
**सुचाना**–क्रि. स. सुचविणें, दाखविणें, लक्ष वेधणें.
**सुचारू**–वि. मनोहर, अतिशय सुंदर, श्रीकृष्णाच्या एका पुत्राचें नांव.
**सुचाल**–स्त्री. सदाचार.
**सुचाली**–वि. सदाचारी, चारित्र्यवान.
**सुचिंतन**–पु. चांगला विचार.
**सुचि**–पि. पवित्र, शुद्ध, निर्दोष, शुद्ध हृदयी.–स्त्री. स्वच्छता. [एकाग्र.
**सुचित**–वि. कामापासून निवृत्त, बेफिकीर,
**सुचितई**–स्त्री. निश्चितपणा, एकाग्रता,
**सुचिती**–वि. स्थिरचित्त, निश्चित. [फुरसत.
**सुचिमंत**–पु. सदाचारी.
**सुचेत**–वि. सावध.
**सुच्छ**–वि. स्वच्छ.
**सुच्छम**–वि. सूक्ष्म.
**सुछंद**–वि. स्वच्छंद.
**सुजन**–पु. सज्जन, परिवारांतील माणसें.

**इस घरका बाबा आदमही निराला**—यांचें सगळें निराळेंच.
**ईटकी लेनी पत्थरकी देनी**—ठोश्यास ठोसा.
**ईख तक खेती, हाथी तक बनिज**—उसान्त शेती, गजान्त व्यापार.
**ईश्वरकी माया, कहीं धूप कहीं छाया**—ईश्वराची करणी, नारळांत पाणी.
**उँगली पकड़कर पहुँचा पकड़ना**—भटाला दिली ओसरी, भट हळूहळू हातपाय पसरी.
**उखलीमें सिर दिया तो मूसलोंका क्या डर**—उखळींत डोकें घातलें आतां मुसळाच्या घावाला कोण भितो. [लाज बाळगायची ?
**उतर गई लोई तो क्या करेगा कोई**—एकदां अब्रू गेली आतां कोणाची
**उत्तम खेती, मध्यम बान, नीच चाकरी, भीख निदान**—उत्तम शेती, मध्यम व्यापार, कनिष्ठ नोकरी, शेवटीं भीक मागणें.
**उधारका खाना, फूसका तापना**—उधारीचें खाणें व गवताची आग दोन्ही सारखीच, म्हणजे फार वेळ टिकत नाहीं.
**उधार दिया गाहक खोया**—उधार दिलें आणि गिऱ्हाइक घालविलें.
**उपजहिं एक संग जलमाहिं, जलज, जोंक जिमि गुण बिलगाहिं**—कमळ व जळू जरी एकाच पाण्यांत उत्पन्न होतात तरी दोघांचे गुण
**उलटा चोर कोतवालको डाँटे**—चोराच्या उलटया बोंबा. [वेगळेच असतात.
**उलटी गंगा पहाड़को चली**—वळचणींचें पाणी आढ्याला गेलें.
**उलटे बाँस बरेलीको**—प्रयागलाच गंगा नेणें. (जेथें भरपूर आहे तेथेंच नेणें.)
**ऊँघतेको ठेलतेका बहाना**—आपला दोष झांकण्यास दुसऱ्याचें निमित्त.
**ऊँची दुकान, फीके पकवान**—नांव मोठें लक्षण खोटें.
**ऊँट किस करवट बैठता है**—काय होतें तें पाहावें.
**ऊँटकी चोरी और झुके झुके**—मोठी कामें गुपचुप होत नाहींत.
**ऊँटके ऊँट ही रहे**—पाण्यांत राहून कोरडा.
**ऊंटके मुँहमें जीरा**—दर्यामें खसखस.
**ऊँटरे ऊँट तेरी कौनसी कल सीधी**—रोमरोमांत खोटेपणा असणें. (उंटा तुझें काय वांकडें ! सर्वांग वांकडें.)
**ऊख करे सब कोई, जो बीचमें जेठ न होई**—मध्यें जेष्ठ महिना नसता तर सर्वांनीं ऊसच पेरला असता.
**ऊधोका लेना न माधोका देना**—कोणाचें घेणें नाहीं व कोणाचें देणें नाहीं.

**एक अंडा वह भी गंदा**—एकुलता एक मुलगा तोही वाईट.
**एक अनार सौ बीमार**—वस्तु थोडी व मागणी फार.
**एक आमकी दो फाँके**—एकाच माळेचे मणी, एका डहाळीवरचीं दोन फुलें.
**एक और एक ग्यारह होते हैं**—एक आणि एक अकरा होतात.
**एक कहो और दस सुनो**—एक बोला आणि दहा ऐका.
**एकके दूनेसे सौके सवाये भले**—थोडक्यांत गोडी.
**एक चुप हज़ारको हरावे**—मौनं सर्वार्थ साधनं.
**एक तन्दुरुस्ती हज़ार नियामत**—आरोग्य सर्व सुखाचें मूळ आहे.
**एक तवेकी रोटी, क्या पतली क्या मोटी**—उडदामाजी काळे गोरे, काय निवडावें निवडणारें.
**एक तो करेली दूसरे नीम चढी**—आधींच मर्कट तशांतहि मद्य प्याला.
**एक तो चोरी दूसरे सीनाजोरी**—चोर तर चोर आणि वर शिरजोर.
**एक तो भीख, दूसरे पछोर पछोर**—अन्नछत्रीं जेवणें आणि वर मिरपुड [ मागणें.
**एक ही थैलीके चट्टेबट्टे**—एकाच माळेचे मणी.
**एक दममें हजार दम**—एकाच्या जिवावर बरींच माणसें अवलंबून असणें.
**एक दिन मेहमान दो दिन मेहमान, तीसरे दिन बलाए जान**—एक दिवस पाहुणा, दुसऱ्या दिवशीं पाहुणा तिसरे दिवशीं लाजलावणा.
**एक न शुद, दो शुद**—संकटें एकटीं येत नाहींत.
**एक नागिन अरु पंख लगाई**—आधींच मर्कट तशांतहि मद्य प्याला.
**एक पंथ दो काज**—एका दगडानें दोन पक्षी मारणें. [सर्व आंबे नासवतो.
**एक मछली सारे जलको गंदा करती**—एक नासका आंबा आढींतील
**एक म्यानमें दो तलवारें नहीं समा सकतीं**—एका म्यानांत दोन तलवारी राहूं शकत नाहींत.
**एकसे इक्कीस होते हैं**—एकाचे एकवीस होतात.
**एक हाथसे ताली नहीं बजती**—एका हातानें टाळी वाजत नाहीं.
**ऐब करनेको भी हुनर चाहिए**—खोड्या करायलाही डोकें लागतें.
**ऐसे गये, जैसे महफिलसे जूता**—गुपचुप पसार झाले.
**ऐसे बूढे बैलको कौन बाँध भुस देय**—असल्या म्हाताऱ्या बैलाला बांधून ठेवून कोण कडबा घालणार ? [ भीत नाहीं.
**ओखलीमें सिर दिया तो मूसलोंका क्या डर**—मेलें कोंबडें आगीला

**ओछा पात्र उबलता है**—उथळ पाण्याला खळखळाट फार.

**ओछेकी प्रीत, बालूकी भीत**—हलक्या माणसाची प्रीति व वाळूची भिंत टिकाऊ नसतात.                [ म्हणजे आपली अब्रू घालविणें.

**ओछेके मुँह लगना, अपनी इज्जत खोना**—हलकटाच्या तोंडीं लागणें

**ओस चाटे प्यास नहीं बुझती**—दांत कोरून पोट भरत नाहीं.

**औंधे घड़ेका पानी, मूरखकी कहानी**—पालथ्या घागरीवर पाणी नि मूर्खांची कहाणी.                [ व सणाच्या दिवशीं एकादशी.

**और दिनोंको खीरपुरी, पर्वके दिन दाँत निपोरी**—इतर दिवशीं चैन

**और बात खोटी, सही दालरोटी**—इतर गोष्टी खोट्या, खरी डाळ रोटी.

**औसरका चूका आदमी और डालका चूका बंदर नहीं संभलता**—संधि घालविलेला माणूस आणि फांदीवरून निसटलेलें माकड सांवरत नाहीं.

**ककड़ीके चोरको फाँसी नहीं दी जाती**—काकडी चोरणाऱ्याला फांशी

**कंगालीमें आटा गीला**—संकटें एकेकटीं येत नाहींत.                [ देत नाहींत.

**कड़ाहीसे निकला चूल्हेमें गिरा**—कढईंतून निघून चूलींत पडला.

**क़द्र खो देता है हर बारका आना जाना**—अतिपरिचयानें मान राहात नाहीं.

**क़ब्रका मुँह झाँककर आये हैं**—काळाच्या जबड्यांतून परत आले आहेत.

**कभी घी घना, कभी मुट्ठी चना, कभी वह भी मना**—कधीं तुपाशीं, कधीं मुठभर चणें, तर कधीं उपाशीं.

**कभी नाव गाड़ीपर, कभी गाड़ी नावपर**—कधीं नाव गाडीवर तर

**कम खर्च बालानशीन**–थोड्या खर्चांत उत्तम काम होणें. [कधीं गाडी नावेवर.

**कमानका निकला तीर और मुँहसे निकली बात वापिस नहीं आते**–सुटलेला बाण व बोललेला शब्द परत येत नाहीं.

**करघा छोड़ जुलाहा जाय, नाहक़ मार बिचारा खाय**—घरचें खाऊन लष्करच्या भाकरी भाजणें आणि तोंड्यांत पडणें.

**करनी खाककी, बात लाखकी**—करणी कवडीची गोष्ट लाखाची.

**करम प्रधान विश्व रचि राखा, जो अस करहिं सो तस फल चाखा**—विश्व हें कर्म प्रधान आहे, जसें करावें तसें भरावें.

**करमहीन खेती करे, मरे बैल या सूखा पड़े**—अभागी मनुष्य शेती करण्यास निघाला तर त्याचा बैल मरतो किंवा अवर्षण पडतें.

**कर सेवा, पा मेवा**—सेवा कर नि मेवा खा.

**करे कल्लू भरे लल्लू**—एकानें करावें दुसऱ्यानें भरावें.

**कलालकी दूकानपर पानी पीओ तो भी शराबका शक होता है**—कलालाच्या दुकानीं ( दूध ) पाणी प्यालें तरी दारू प्याल्याची शंका येते. (माडाखालीं बसून दूध प्यालें तरी माडी प्याल्याचा आळ येतो.)

**कहते हैं ऊदपुरको, जाते हैं महमूदपुरको**—बोलणें एक करणें भलतेंच.

**कहनेसे करना भला**—सांगण्यापेक्षां करणें बरें. [शामभट्टाची तट्टाणी.

**कहाँ राजा भोज, कहाँ गंगा तेली**—कुठें इंद्राचा ऐरावत आणि कुठें

**कहींकी ईंट कहींका रोड़ा, भानुमतीने कुनबा जोड़ा**—कुठली तरी वीट कुठला तरी रोडा घेऊन भानुमतीनें घर बनविलें.

**कहेसे कुम्हार गधेपर नही चढ़ता**—हट्टी माणूस कोणाचें ऐकत नाहीं.

**कागज़की नाव आज न डूबी कल डूबी**—कागदाची होडी आज नाहीं तर उद्यां बुडणारच.

**कागज़की नाव नहीं चलती**—कागदाची नाव चालत नाहीं.

**काजलकी कोठड़ीमें धब्बेका डर**—असंगाशीं संग आणि प्राणाशीं गांठ.

**क़ाज़ीजी दुबले क्यों? शहरके अंदेशेसे**—काजी ( न्यायाधीश ) असे सुकलांत कां तर म्हणे गांवाच्या चिन्तेनें.

**काटा और उलट गया**—वचनभंग करणें. [फसत नाहीं.

**काठकी हाँडी बार बार नहीं चढ़ती**—एकदां फसला म्हणून पुन्हां पुन्हां

**काबुल गये, मुगल बनि आये, बोलन लागे बानी, आब आब करि पूता मार गये, सिरहानेमें पानी**—जेथें जी भाषा बोलली जाते तीच बोलावी नाहींतर फजिती होते.

**कान छिदाय सो गुड़ खाय**—कष्ट करील तो फळ चाखील.

**कामका न काजका, दुश्मन अनाजका**—खायला काळ आणि भूमीला भार.

**कामको काम सिखाता है**—जात्यावर बसलें कीं ओवी सुचते.

**काम जो आवे कामरी, का ले करे कुमाच**—कांबळ्यानें काम भागतें तेथें रेशमी वस्त्र कशाला.

**काम न धंदा, तीन रोटी बँधा**—खायला काळ आणि भूमीला भार.

**काम प्यारा है चाम प्यारा नहीं**—काम आवडतें असतें कातडें नाहीं.

**का वर्षा जब कृषी सुखाने, समय चूकि पुनिका पछताने**—वेळ निघून गेल्यावर पश्चात्ताप होऊन काय उपयोग ! ( बैल गेला नि झोपा केला.)

**कालके हाथ कमान, बूढ़ा बचे न जवान**—काळाला वृद्ध, तरुण सारखेच.

**काला अक्षर भैंस बराबर**—अक्षरशत्रु.

**काला दीजै, वासा न दीजै**—अपरिचिताला पाहिजे तर जेवायला घाला [ पण घरांत थारा देऊं नका.

**किया चाहे चाकरी सोया चाहे घर**—नोकरीही करूं इच्छितो आणि आरामांत झोंपही घेऊं इच्छितो.

**किया चाहे चाकरी, राखा चाहे मान**—चाकर म्हणून राहणें आणि [ म्हणें मला राव म्हणा.

**किस खेतीकी मूली**—कोणत्या झाडाचा पाला.

**किस बिरतेपर तित्ता पानी**—कोणाच्या जिवावर उडतां.

**किसीकी कुछ नहीं चलती कि जब तक़दीर फिरती है**—दैव फिरलें कीं, कोणाचेंच कांहीं चालत नाहीं. (घर फिरलें कीं घराचे वांसेही फिरतात.)

**कुएँकी मिट्टी कुएँमेंही लगती है**—विहिरीची माती विहिरीच्याच कामाला येते.

**कुचाल संग हाँसी, जीव जानकी फाँसी**—असंगाशीं संग, प्राणाशीं गांठ.

**कुछ कमान झुके कुछ गोसा**—भांडण मिटण्यासाठीं दोघांनाही थोडा थोडा त्याग करावा लागतो.

**कुछ खोकर ही सीखते हैं**—ठोकर लागल्याशिवाय अक्कल येत नाहीं.

**कुत्ता भी जब बैठता है तो दुम हिलाकर**—जनावरांनाही स्वच्छता आवडते.

**कुत्ता भूँके क़ाफ़िला सिधारे**--कोणी निंदा अथवा वंदा । आपुला स्वहिताचा धंदा.

**कुतिया चोरोंसे मिल गई, पहरा किसका दे**—कुंपणच शेत खाऊं [ लागलें तेथें राखण कोण करणार ?

**कुत्तेकी दुम बारह वर्ष नलमें रक्खी तो भी टेढ़ी की टेढ़ी**--कुत्र्याचें शेपूट बारा वर्षें नळींत घालून ठेवलें तरी वांकडें तें वांकडेंच.

**कुत्तेको घी हज़म नहीं होता**—माकडाच्या हातीं कांकडा.

**कुत्तोंके भौंकनेसे हाथी नहीं डरते**—कुत्र्याच्या भुंकण्याला हत्ती भीत नाहीं.

**कुनबेवालोंके चारों पल्ले कीचड़में हैं**—मोठ्या कुटुंबांत प्रतिदिनीं सोयर, सुतक, भांडण वगैरे चालू असावयाचेंच.

**कुम्हार अपना घड़ा ही सराहता है**—कुंभार आपल्याच घड्याची [ प्रशंसा करतो.

**कुलियामें गुड़ फोड़ना**—गुपचुप काम करणें.

**कूकर भूँकैं लाख हज़ार, हाथी घूमैं हाट बजार**—कुत्रीं कितीही भुंकलीं तरी हत्ती त्यांना न भितां बाजारांत फिरत असतो.

**कै हंसा मोती चुगे, कै भूखे मर जाहिं**—थोर लोक विपन्नावस्थेंतसुद्धा आपला मोठेपणा सोडीत नाहींत. [ हृदयानें आंधळा.

**कोई आँखका अंधा, कोई हियेका अंधा**—कोणी डोळ्यानें आंधळा कोणी

**कोइरीके गांव धोबी पटवारी**—कोयरी गांवांत धोबी तलाठी.

**कोई मरे कोई जीवे, सुथरा घोल बतासे पीवे**—कोणी मरो नाहींतर जगो, हा आपली मजा मारतो.

**कोउ नृप होउ हमें का हानी, चेरी छाँड नहिं होईब रानी**—कोणीही राजा होवो, आपलें काय जाणार, मीं दासी आहें ती कांहीं राणी होत नाहीं.

**कोठीवाला रोवे, छप्परवाला सोवे**—श्रीमंत रडतो पण गरीब स्वस्थ झोंप घेतो. [ धुतला तरी कोळसा काळा तो काळाच रहाणार.

**कोयला होय न ऊजला, सौ मन साबुन धोय**—शंभर मण साबणानें

**कोयलेकी दलालीमें हाथ काले**—कोळशाच्या दलालींत हात काळे.

**कौआ चला हंसकी चाल, अपनी चाल भी भूल गया**—हेंहि गेलें आणि तेंहि गेलें. [ ( अतिशय लठ्ठ माणसास म्हणतात. )

**कौनसी चक्कीका पीसा खाया है**—कुठल्या जात्यानें दळलेलें खातात.

**क्या पानी मथनेसे घी निकलताहै**—पाणी घुसळून तूप थोडेंच निघतें.

**क्या पिद्दी क्या उसका शोरबा**—चिमणीचें पिल्लूं तें किती आणि त्याचें कालवण किती होणार.

**क्या मुँहसे फूल झड़ते हैं**—तोंडांतून जणूं कांहीं फुलें पडताहेत.

**खग ही जाने खगकी भाषा**—पक्ष्याला पक्ष्याची भाषा कळते.

**खरको गंग न्हवाइये, तऊ न छाँडे छार**—मूळ स्वभाव जाईना.

**खर गुड़ एकही भाव**—गवत आणि गुळ एकाच भावांत.

**ख़रबूज़ेको देखकर ख़रबूजा रंग पकड़ता है**—एकाचें पाहून दुसरा

**खरी मजूरी चोखा काम**—दाम तसें काम. [ तसेंच करूं लागतो.

**खरा खेल फरुखाबादी**—स्पष्टवक्ता माणूस.

**ख़ल्ककी ज़बान ख़ुदाका नक़ारा**—पांचामुखीं परमेश्वर. [आवडेल तें त्यांचें.

**खाइये मनभाता, पहनिये जगभाता**—आपल्याला आवडेल तें खावें, लोकांना

**खाते हो तो पानी यहाँ पीना**—जेवत असाल तर पाणी येथें येऊन प्या.

**ख़ाक डाले चाँद नहीं छिपता**—चंद्रावर थुंकलें तर तें स्वतःच्याच

**खात निबोरी दाख बतावे**—मिशीला तूप लावून हिंडणें. [तोंडावर पडतें.

**खानेके दाँत और, दिखानेके और**—हत्तीचे खायचे दांत निराळे व दाखवायचे निराळे.

**खानेको पीछे नहानेको पहले**—प्रथम स्नान मग भोजन. [तोही पस्तावेल.

**खाय सो पछताय न खाय सो पछताय**—खाईल तो पस्तावेल न खाईल

**खाल ओढ़ाये सिंहकी, स्यार सिंह नहीं होत**—सिंहाचें कातडें पांघरून कोल्हा कांहीं सिंह होत नाहीं. [मित्र—दहीं, पापड, तूप आणि लोणचें.

**खिचड़ी के चार यार, दहीं, पापड, घी, अचार**—खिचडीला चार

**खिलायेका नाम नहीं, रुलायेका नाम**—दुसऱ्याच्या मुलाला खायला घातलें त्याचें नांवही नाहीं, पण तो रडला तर रडविलें म्हणून ओरड.

**खिसियानी बिल्ली खंभा नोचे**—रागावलेलें मांजर खांबाला ओरबडतें.

**खीरमें नोन डालना**—दुधांत मिठाचा खडा टाकणें. [ कधींही मिळूं नये.

**खुदा गंजेको नाखून न दे**—सुखांत लोळत असलेल्या अधमाला सत्ता

**खुशामदसे आमद**—पुढें पुढें करून आपला स्वार्थ साधणें.

**खून लगाकर शहीदोंमें मिलना**—अंगाला रक्त लावून घेऊन हुतात्मा म्हणून मिरविणें.

**खूँटेके बल बछड़ा कूदे**—श्रीमंताच्या ( समर्थाच्या ) घरचें श्वान.

**खूब गुज़रेगी जो मिल बैठेंगे दीवाने दो**—समानशील भेटले कीं त्यांचा वेळ आनंदानें जातो.

**खेती खसम सेती**—धनी स्वतः लक्ष देईल तरच शेती वाढेल.

**खेती, पाती बीनती औ घोड़ेका तंग, अपने हाथ सँभालिये चाहे लाख हो संग**—शेती, पत्र, प्रार्थना व घोड्याचा तंग हीं दुसऱ्यावर न सोपवितां स्वतः केलीं तरच चांगलीं होतात. [घमेंड दाखवावयाची.

**खैरातके टुकड़े बज़ारमें डकार**—भीक मागून आणावयाचे आणि वर

**खोटा पैसा और खोटा बेटा भी समयपर काम आता है**—खोटा पैसा व वाईट मुलगासुद्धां कठिण प्रसंगीं उपयोगी पडतात.

**खोदा पहाड़ और निकली चुहिया**—डोंगर पोखरून उंदीर काढला.

**गंगा गये गंगादास, जमुना गये जमुनादास**—वारा येईल तशी पाठ देणें.

**गंजी यार किसके, दम लगाया खिसके**—गांजेकस कोणाचा मित्र, झुरका मारला कीं पसार झाला. ( स्वार्थी कोणाचाच मित्र नसतो. )

**गई सो गई, अब राख रहीको**—गेलें तें गेलें, आहे तें सांभाळ. राहिली ती गंगा राहिलें तें तीर्थ.

**गधा खेत खाय, और जुलाहा मारा जाय**-चोर सोडून संन्याशाला सुळी.

**गया वक्त फिर हाथ नहीं आता**—गेलेली संधी पुन्हां येत नाहीं. गेली वेळा येईल अशी गोष्ट पुन्हां कधीं न व्हायाची.

**गये थे रोज़ा छुड़ाने, नमाज गले पड़ी**—उपास नको म्हणून सांगायला गेले पण उपासाच्याबरोबर प्रार्थनाही केली पाहिजे असे काजी साहेबांनीं सांगितलें. [ नवरा घालवून आली.

**गई माँगने पूत, खो आई भरतार**—पुत्र मागायला गेली ( देवाजवळ )

**ग़रीबकी हाय बुरी है**—गरिबांचा तळतळाट वाईट.

**ग़रीब तेरे तीन नाम, झूठा, पाजी, बेईमान**—गरिबाला जगांत मान नाहीं.

**ग़रीबने रोज़े रक्खे तो दिन ही बड़े हो गये**—दारिद्य सर्व अडचणीचें कारण आहे. [ असणारच.

**गवाह चुस्त, मुद्दई सुस्त**—साक्षीदार पक्का असल्यावर वादी निश्चित

**गाँठमें जमा रहे तो खातिर जमा रहे**—गांठीला धन असल्यावर चिंता कशाचीहि नसते. [ न ओळखणें.

**गाँवका जोगी जोगड़ा, बाहरका जोगी सिद्ध**—आपल्या माणसाचे गुण

**गाडर पाली ऊनको, लागी चरन कपास**—लोकरीसाठीं मेंढी पाळली ती कापूस चरायला लागली. लभासाठीं एखादी गोष्ट करतांना हानि होते तेव्हां म्हणतात.

**गाल कट आये पर चावल न उगलें**--गाल कापला तरी भात थुंकणार नाहीं. ( नुकसान करूनसुद्धां हट्ट न सोडणें. )

**गीदड़की शामत आये तो गाँवकी तरफ भागे**-विनाशकाले विपरीत बुद्धि.

**गुड़ खाय, गुलगुलोंसे परहेज**--गूळ खातो आणि गुलगुल्यांचे पथ्य करतो. ( ढोंगी माणसाविषयीं सांगतात. )

**गुड़ दिये मरे तो ज़हर क्यों दें**—गूळ दिल्यानें मरतो तर विष कां द्यावें !

**गुड़ न दे, गुड़की सी बात तो करे**—गूळ देऊं नका, गोड तर बोला.

**गुरु गुड़, चेला चीनी**—गुरुपेक्षां शिष्य सरस.

**गुरू कीजे जान, पानी पीजे छान**—गुरु करावा पारखून पाणी प्यावें गाळून.

**गेहूँके साथ घुन भी पीसा जाता है**--सुक्याबरोबर ओलें जळतें.

**गोकुलसे मथुरा न्यारी**—गोकुळाहून मथुरा वेगळी आहे.
**गोदमें बैठकर आँखमें उँगली**—उपकाराची फेड अपकारानें करणें.
**गोदमें लड़का, शहरमें ढिंढोरा**—काखेंत कळसा गांवाला वळसा.
**गोबर गिरा तो मिट्टी लेकर ही उठेगा**—शेण जमिनीवर पडलें तर तें माती घेऊनच उठणार.
**गोबर, मैला, नीमकी खली, याते खेती दूनी फली**—शेण, सोनखत व लिंबोण्याची पेंड यानें पीक दुप्पट होतें. [ ठेवत नाहीं.
**ग्वालिन अपने दहीको खट्टा नहीं कहती**—आपल्या वस्तूला कोणी नांवें
**घड़ीभरकी बेशर्मी दिनभरका आराम**—आधीं कडू मग गोड.
**घड़ीमें घर जले ढाई घड़ी भद्रा**—वेळ चालली निघून आणि कामाला दिरंगाई.
**घड़ीमें तोला घड़ीमें माशा**—घटकेंत तोळा घटकेंत मासा. ( अस्थिर चित्त. )
**घरकी आधी भली, बाहरकी सारी कुछ नहीं**—घरची अर्धी चांगली बाहेरची सबंध नको. ( आळशी म्हणतात. )
**घरका जोगी जोगना बाहरका जोगी सिद्ध**—पिकतें तेथें विकत नाहीं.
**घर आये कुत्तेको भी नहीं निकालते**—घरीं आलेल्या गरीबाचा पण सत्कार केलाच पाहिजे.
**घरका भेदी लंका ढावे**—घरभेद्या माणूस राष्ट्राचा नाश करतो.
**घरकी खाँड किरकिरी लागे, चोरीका गुड़ मीठा**—घरची साखर अळणी चोरीचा गुळ गोड. [ किम्मत नाहीं.
**घरकी मुर्गी दाल बराबर**—घरची कोंबडी वरणासमान. आपल्या वस्तूची
**घरके पीरोंको तेलका मलीदा**—घरच्या देवाला कसला तरी नैवेद्य.
**घर खीर तो बाहर खीर**—घरीं द्रव्य आहे तर बाहेर पण सुख आहे.
**घर घर यही लेखा**—घरोघरीं त्याच परी. [ त्याच परी.
**घर घर शादी, घर घर गम**—घरोघर आनंद आणि दुःख आहे. ( घरोघरीं
**घरपर फूस नहीं, नाम धनपत**—नांव सोनूबाई हातीं कथलाचा वाळा.
**घरमें चिराग नहीं बाहरमें मसाल**—घरांत पणतीसुद्धां नाहीं पण बाहेर मशाल लावली आहे. ( घरांत नाहीं खायला तेल नि बाहेर जातांना
**घरमें चूहे डंडात करते हैं**—घरांत खायला नाहीं. [ मिशीला तूप.
**घरमें दिया तो मंदिरमें दिया**—आधीं प्रपंच मग परमार्थ. [रिकामा डौल.
**घरमें नहीं दाने, बुढ़िया चली भुनाने**—घराला नाहीं कौल आणि

**घी कहाँ गया, खिचड़ीमें**—तूप काय झालें ? खिचडींत गेले. ( आपली वस्तु आपल्याच साठीं खर्च झाली तर म्हणतात.)

**घी खाया बापने, सूँघो मेरा हाथ**—वडिलांची कीर्ति सांगणें.

**घी भी खाओ और पगड़ी भी रखो**—आब राखून खर्च करावा.

**घोड़ा घाससे यारी करे तो खाय क्या**—घोडा गवताशीं मैत्री करील तर काय खाईल. ( भीड न ठेवता मजूरी मागताना म्हणतात. )

**घोड़ा घुड़सालमेंही बिकता है**—योग्य जागींच वस्तूला मोल येतें.

**घोड़ेका गिरा सँभल सकता है, नज़रोंका गिरा नहीं सँभलता**—घोड्यावरूस पडला तर पुन्हा सांवरला जातो, मनांतून उतरला तर तो सांवरला जात नाहीं. ( मानभंग होण्यासारखें काम करूं नये. )

**घोड़ोंको घर कितना दूर**—काम करणारांना वेळ लागत नाहीं.

**चंदनकी चुटकी भली, गाड़ी भरा न काठ**—चिमुटभर चंदन गाडीभर लाकडापेक्षां जास्त मोलाचें.

**चक्कीमें कौर डालोगे तो चून पाओगे**—पेरलें तर उगवेल.

**चढ़ते बरसे आर्द्रा, उतरत बरसे हस्त, कितने राजा डाँड ले, आनंद रहे गृहस्थ**—प्रारंभीं अर्द्रा नक्षत्राचा पाऊस पडतो व शेवटीं हस्ताचा, राजा कितीही मागो, गृहस्थ सुखीच असतो.

**चना और चुगल मुँह लगे अच्छे नहीं**—चणे व चहाड जर तोंडीं लागलीं [ तर सुटत नाहींत.

**चमगीदड़ोंके घर मेहमान आये, हम भी लटके तुम भी लटको**—वटवाघुळाच्या घरीं पाहुणे आले, आम्ही उलटे लटकतों तसे तुम्ही लटका. परिस्थिति पाहून कामें करावीं.

**चमड़ी जाय पर दमड़ी न जाय**—चामडी देईन पण दमडी देणार नाहीं.

**चलतीका नाम गाड़ी है**—चालते तिचें नांव गाडी आहे.

**चलती गाड़ीमें रोड़े अटकाना**—चालत्या गाड्यांना खीळ घालणें.

**चाँदको भी ग्रहण लगता है**—मोठ्यांना सुद्धां ग्रहदशा येते.

**चाकरीमें नाकरी क्या**—नोकरींत आवड निवड कसली.

**चार दिनकी चाँदनी फिर अँधेरी रात**—चार दिवस चांदणें मग अंधारी रात्र. ( माणसाला सर्व सुख नेहमीं मिळत नाहीं. )

**चिउँटीपर तोप चलाना**—मुंगीवर तोफ डागणें.

**चिउँटीके पर आये हैं**—क्षुद्र माणूस मोठमोठ्या गोष्टी सांगूं लागला आहे.

**चिकने घड़ेपर पानी नहीं ठहरता**—गुळगुळीत घागरीवर पाणी रहात नाहीं.

**चिकने मुँहको सब चूमते हैं**—मोठ्यांच्या पुढें सर्व गोंडा घोळतात.

**चिराग़ तले अँधेरा**—दिव्याखालीं अंधेर.

**चिराग़में बत्ती और आँखमें पट्टी**—दिवा लावला आणि झोंप आली.

**चींटी चाहे सागर थाह**—मुंगी सागराचा ठाव पाहाणार.

**चीलके घोंसलेमें माँस कहाँ**—एकादशीच्या घरीं शिवरात्र.

**चुपड़ी और दो दो**—सगळ्या बाजूंनीं स्वतःचा फायदा झाला पाहिजे.

**चुल्लूमें उल्लू, लोटेमें गड़गप**—चुळकाभर घेतली कीं गडबड माजवितो आणि तांब्यावर घेतली कीं गुपचुप पडतो.

**चूल्हा फूँकना और डाढ़ी रखना**—चूल फुंकायची व दाढी राखायची दोन्ही गोष्टी बरोबर जमत नाहींत.

**चूल्हेकी है न चक्कीकी**—घर कामाला निरुपयोगी स्त्री.

**चूहेके चामसे कहीं नगाड़े मढ़े जाते हैं**—उंदराच्या कातड्यानें नगारा मढविला जात नाहीं. ( लहान माणसें मोठीं कामें करूं शकत नाहींत.)

**चूहोंकी मौत बिल्लीका खेल**—मांजराचा खेळ होतो उंदराचा जीव जातो.

**चोट्टी कुतिया जलेबियोंकी रखवाली**—चोराच्या हातीं जामदाराच्या किल्ल्या.

**चोरकी दाढ़ीमें तिनका**—चोराच्या दाढींत गवताची काडी, चोराच्या बिचकण्यानेंच तो ओळखूं येतो.

**चोरके ख्वाबमें बुचके**—चोराला स्वप्नांतही गांठोडींच दिसतात.

**चोरके पैर नहीं होते**—अपराध्याला नेहमीं भीति वाटते.

**चोर चोर मौसेरे भाई**—उंदराला मांजर साक्ष.

**चोर चोरीसे गया तो क्या हेरा फेरीसे भी गया**—चोरानें चोरी केली नाहीं तरी उलथा पालथ करीलच. ( संवय सुटत नाहीं )

**चोर पर मोर**—चोरावर मोर. ( एक चलाख दुसरा फसवतो. )

**चोरसे कहे चोरी करो, शाहसे कहे जागते रहो**—एकाला म्हणतो पळ दुसऱ्याला म्हणतो पाठी लाग.

**चोरीका धन मोरीमें जाय**—हपापाचा माल गपापा.

**चौबे गये छब्बे बनने, दुब्बेही रह गये**—लाभासाठीं काम केलें उलट हानि झाली.

**छछूँदरके सिरमें चमेलीका तेल**—भिकाऱ्याला भरजरी आंगरखा !

**छटाँक चून चौबारे रसोई**—तुच्छ बाबीला मोठें रूप.

**छुरी खरबूजेपर गिरी तो खरबूजेको ज़रर खरबूजा छुरीपर गिरा तो खरबूजेका जरर**—सुरी खरबुजावर पडली तरी किंवा खरबुज सुरीवर पडले तरी इजा खरबुजालाच.

**छोटा सींग व छोटी पूँछ, पैसेको लेलो बेपूछ**—आंखुड शिंगें व लहान शेपूट असलेला बैल कोणाचेंही मत न घेतां विकत घ्या. [जास्त वाईट.

**छोटे मियाँ सो छोटे मियाँ, बड़े मियाँ सुभान अल्लाह**—लहानापेक्षां मोठ

**छोटे मुँह बड़ी बात**—लहान तोंडीं मोठा घांस घेणें.

**छोड़े खाद खेत गहराई, तब खेतीका मजा उठाई**—खत घातलें खोल नांगरलें तर शेतांत चांगलें पीक होईल.

**छोड़े गाँवसे नाता क्या**—जी गोष्ट सोडली तिच्याशीं संबंध कां ठेवावा.

**जगमें देखत ही का नाता**—जगांत प्राण आहे तोंपर्यंतच नातें आहे.

**जड़ काटते जायँ, पानी देते जायँ**—वरून गोड आंतून कडू.

**जब चने थे तब दाँत न थे, जब दाँत भये तो चने नहीं**—जेव्हां धन होतें तेव्हां खाणारे नव्हते, खाणारे झाले तर धन नाहीं. [आहे.

**जब तक जीना तब तक सीना**—जिवंत आहोंत तोंपर्यंत उद्योग करायचा

**जब अपनी लाज उतार ली तो दूसरेकी उतारनेमें क्या लगता है**—ज्यानें स्वतः लाज सोडली त्याला दुसऱ्याच्या अब्रूची काय चाड.

**जब तक साँसा तब तक आसा**—श्वास आहे तोंपर्यंत आशा आहे.

**जब दाँत न थे तब दूध दियो, अब दाँत दिये कहा अन्न न दैहे**—ईश्वरानें जेव्हां दांत नव्हते तेव्हां दूध दिलें आतां दांत दिले, तर अन्न देणार नाहीं काय ? [यासें धन मिळतें.

**जब देता है तो छप्पर फाड़कर देता है**—ईश्वर इच्छितो तेव्हां अना-

**ज़बरदस्तका ठेंगा सरपर**—बळी तो कान पिळी.

**ज़बरदस्त मारे और रोने न दे**—बलवान मारतो आणि वर रडूंही देत

**ज़बरदस्त सबका जमाई**—बळी सर्वांचा जांवई. [नाहीं.

**ज़बानही हाथी चढ़ावे, जबानही सिर कटावे**—जीभेनें गोड बोलून मनुष्य हत्तीवर चढतो आणि जीभेनेंच कडू बोलून मनुष्य फांसावर

**जमात करामात**—संघशक्तीनें सगळीं कामें होतात. [चढतो.

**ज़र, ज़मीन, ज़न झगड़े की जड़ हैं**—सोनें, जमीन आणि स्त्री हें भांड-

णाचें मूळ आहे. [ आहे नाहींतर तो नुसता पंखाविहीन पक्षी आहे.

**ज़र है तो नर है, नहीं तो पंछी बेपर है**—जवळ धन आहे तर माणूस

**जलकी मछली जलमेंही भली**—पाण्यांतला मासा पाण्यांतच बरा.

**जलमें रहकर मगरसे बैर**—पाण्यांत राहून मगराशीं वैर.

**जसं दूल्हा तस बनी बरात**—जसा नवरदेव तशी वरात. नोकर मालका-बिरुद्ध वागला तर नुकसान होतें.

**जहँ जहँ चरण पड़ें सन्तनके तहँ तहँ बंटाढार करैं**—या संताचे-दुष्ट माणसाचे-पाय जेथें लागतील तेथें सुखसमृद्धी नाहींशी होईल.

**जहाँकी मिट्टी वहीं ले जाती है**—जेथें मरण असेल त्या ठिकाणींच माणसाला दैव ओढून नेतें. [ ( जेथें धन असेल तेथें लोक जमतीलच)

**जहाँ गुड़ होगा वहीं चींटियाँ होंगी**—गूळ असेल तेथेंच मुंगळे येतील

**जहाँ गुल होगा वहाँ काँटा भी होगा**—जेथें सद्‌गुण आहेत तेथें एकादा दुर्गुण पण असणारच. [ तेथें तक्रार होणारच.

**जहाँ चार बासन होंगे वहाँ खटकेंगे भी**—जेथें चार माणसें आहेत

**जहाँ देखे तवा परात वहाँ गुज़ारे सारी रात**—जेथें खायला मिळण्याची आशा असते तेथें मनुष्य अपमान सहन करूनसुद्धां बसतो.

**जहाँ मुर्गा नहीं होता वहाँ क्या सवेरा नहीं होता**—एकादा मनुष्य नसला म्हणून कोणाचें काम अडत नाहीं. कोंबडें झांकलें म्हणून उजाडावयाचें थोडेंच रहातें.

**जाकी रही भावना जैसी, प्रभु मूरत देखी तिन तैसी**—( मनुष्य स्वतः जसा असतो तसाच दुसऱ्याला समजतो. ( जशी भावना तसें प्रभुरूप त्याला दिसतें. )

**जाके पाँव न फटी बिवाई, सो क्या जाने पीर पराई**—ज्याला स्वतःला कष्ट सोसावे लागले नाहींत त्याला दुसऱ्याच्या दुःखाची काय कल्पना येणार.

**जाको राखे साइयाँ मारि न सकि है कोय**—देव तारी त्याला कोण मारी.

**जादू वह, जो सिरपर चढ़कर बोले**—उघड प्रभाव दाखवितें तेंच खरें सामर्थ्य.

**जानि न जाय निशाचर माया**—दुष्ट माणसाची माया कांहींच कळत नाहीं.

**जान बची लाखों पाये**—प्राण वांचले म्हणजे जणूं कांहीं लाख रुपये मिळविले. [ उघाडतो आणि चोर ओळखून मारतो.

**जान मारे बनिया, पहचान मारे चोर**—वाणी ओळखीच्या गिऱ्हाइकाला
**जानवरोंमें कौवा और मनुष्यमें नौवा**—पक्ष्यांत कावळा व माणसांत
**जान है तो जहान है**—जीव आहे तर जग आहे. [ न्हावी, लुच्चे असतात.
**जाना अपने बस, आना पराये बस**—जाणें आपल्या हातीं येणें दुस-
ऱ्याच्या हातीं. [ करूं नये.
**जाय लाख रहे साख**—इभ्रतीसाठीं लाखाची हानी झाली तरी चिंता
**जितना गुड़ डालोगे उतना ही मीठा होगा**—जशी किंमत देणार तशीच
वस्तु मिळेल. [ ( शक्ति बाहेर काम करूं नये)
**जितनी चादर देखो उतने ही पैर पसारो**—अंथरुण पाहून पाय पसरावे.
**जितने मुँह उतनी बातें**—जितकीं तोंडें तितक्या गोष्टी ( एका गोष्टीबद्दल
अनेक रित्या वर्णन.)
**जिसका ब्याह उसीके गीत**—ज्याचें लग्न त्याच्यासाठींच गाणीं.
**जिसकी उतर गई लोई, उसका क्या करेगा कोई**—ज्यानें लाज सोडली
त्याचे कोण काय करूं शकणार.
**जिसकी लाठी उसकी भैंस**—ज्याचे हातीं ससा तो पारधी.
**जिसके पास नहीं पैसा वह भला मानस कैसा**—गरिबाला कोणीही
चांगला म्हणत नाहीं. [ त्याच्या सेवेला सर्व तयार असतात.
**जिसके हाथ लोई उसके सब कोई**—ज्याच्याजवळ अधिकार आहे
**जिसको पिया चाहे वही सुहागिन**—जिच्यावर पतीचें प्रेम आहे तीच
खरी सौभाग्यवती. [ देतो तेव्हां म्हणतात.
**जिस डालपर बैठे उसीको काटे**—आपल्या आश्रयदात्याला कोणी त्रास
**जिस बरतनमें खाना उसीमें छेद करना**—खाल्या घराचे वासे मोजणें.
**जीभ भी जली और स्वाद भी न आया**—जीभही भाजली आणि
चवही कळली नाहीं. ( फार कमी वस्तु मिळाली असतांना म्हणतात.)
**जूँके डरसे गुदड़ी नहीं फेंकी जाती**—उवांच्या भीतीनें गोधडी फेंकून
देत नाहीं. ( कोणाच्या भीतिनें आपलें काम सोडूं नये. )
**जूठा खाय मीठेके लालच**—गोडाच्या लाभानें उष्टें खातो. ( स्वार्थी
मनुष्य अपमान सोसतो )
**जूते तो अवश्य मारे पर वे लाल थे**—शालजोडींत गुंडाळून जोडे मारणें.
**जे न मित्र दुख होहिं दुखारी, तिनहिं बिलोकत पातक भारी**—जो

मित्र संकटांत मित्राला उपयोगी पडत नाहीं त्याचें तोंड पहाणें पाप आहे.

**जैसा दाम वैसा काम**—दाम तसें काम.

**जैसे कन्ता घर रहे वैसे रहे विदेश**—घरीं दारीं कांहींच उपयोग नाहीं, निरुपयोगी माणसास म्हणतात.

**जैसी करनी वैसी भरनी**—करावें तसें भरावें.

**जैसा गुरु वैसा चेला**—गुरु तसा शिष्य.

**जैसा देस वैसा भेस**—देश तसा वेश ( परिस्थितिप्रमाणें वर्तन. )

**जैसी तेरी तिळ चावरी, तैसे मेरे गीत**—जशी देणावळ तशी धुणावळ.

**जैसी बहे बयार, पीठ पुनि तैसी दीजै**—वारा वाहील तशी पाठ द्यावी.

**जैसे मियाँ काठके, वैसे सनकी दाढ़ी**—मियाँ लाकडी त्यांना आंबाडीची दाढी. ( दोन्हीं सारखे जुळले म्हणजे म्हणतात. )

**जैसे साँपनाथ वैसे नागनाथ**—एका माळेचे मणी.

**जो कहुँ मघामें बरसे जल, सब नाजोंमें होगा फल**—मघां नक्षत्रांत पाऊस पडला तर सर्व पीक चांगलें येईल.

**जो गरजते हैं वे बरसते नहीं**—जे ( ढग ) गर्जतात ते पडत नाहींत. ( फार बोलका काम करीत नाहीं. )

**जो चढ़ेगा सो गिरेगा**—चढेल तो पडेल. [ शत्रु असतो.

**जो ज़्यादा क़रीब सो ज़्यादा रक़ीब**—अगदीं जवळचा मनुष्यच जास्त

**जो बोले सो कुंडी खोले**—युक्ति सांगेल त्यालाच काम करायला सांगणें.

**जोरू टटोले गठरी, माँ टटोले अँतड़ी**—बायको गाठोडें ( धन) चाचपते आणि आई अंतःकरण चाचपते.

**जो हल जोते खेती वाकी, और नहीं तो जाकी ताकी**—जो नांगर चालवतो त्याची शेती आहे, नाहींतर मग प्रत्येकाची आहे.

**ज्यों केराके पातमें, पातपातमें पात, त्यों ज्ञानीकी बातमें, बात-बातमें बात**—जसें केळीच्या पानांत पान असतें तसेंच ज्ञानी माणसाच्या प्रत्येक शब्दांत ज्ञान असतें.

**ज्यों ज्यों भीजे कामरी त्यों त्यों भारी होय**—घोंगडी जसजशी भिजत जाते तसतशी ती जड होते. ( मनुष्य अनुभवानें मोठा होतो )

**ज्यों नकटेको आरसी होत दिखावे क्रोध**—नकट्याला आरसा दाखविला कीं त्याला चीड येते. ( कोणाला त्याचे दोष सांगू नये. )

**झूठके पाँव नहीं होते**—असत्याला पाय नसतात.

**झूठका मुँह काला, सच्चेका बोलबाला**—सत्याचा जयजयकार होतो व असत्याचें तोंड काळें होतें.

**झोंपड़ीमें रहे महलोंका ख्वाब देखे**—झोंपडींत राहतो आणि महालाचें स्वप्न पाहतो. ( अलभ्य वस्तूंची इच्छा केल्यानें म्ह० ).

**टका हो जिसके हाथमें, वह बड़ा हो जातमें**—ज्याच्या हातीं पैसा असतो तोच जातींत मोठा समजला जातो.

**टकेका सब खेल है**—पैशाचा सर्व खेळ आहे.

**टिड्डीका आना अकालकी निशानी**—टोळांचें येणें दुष्काळाचें चिन्ह.

**टकेकी बुढ़िया नौ टका मुड़ाई**-थोडा लाभ व खर्च जास्त होतो तेव्हां म्ह०

**टकेके वास्ते मसजिद ढाना**—दोन पैशाकरितां देऊळ उध्वस्त करणें. ( स्वल्प फायद्याकरितां फार नुकसान करणें ). [ नेंच कार्य सिद्ध होतें.)

**टेढ़ी अँगुलीसे ही घी निकलता है**-वाकड्या बोटानेंच तूप निघतें. ( युक्ति-

**टेढ़े पेड़की छाया भी टेढ़ी**—वाईट वस्तूचा परिणाम वाईट.

**ठंडा लोहा गरम लोहेको काटता है**—थंड झालेलें लोखंड गरम लोखंडाला कापतें. ( शांत मनुष्य क्रोधी माणसाचा पराभव करतो )

**ठगाये सो ठाकुर कहाये**—खर्च केल्यानें मनुष्य प्रसिद्ध होतो.

**ठाला बनिया क्या करे, इस कोठीका धान उस कोठीमें धरे**—रिकामा वाणी काय करतो, तर या कोठींतील धान्य त्या कोठींत भरतो.

**ठोकर लगी पहाड़की तोड़े घरकी सील**—वड्याचें तेल वांग्यावर. ( सशक्त माणसावरचा राग घरच्या माणसांवर काढतो तेव्हां म्ह० )

**डफली बजी राग पहचाना**—शितावरून भाताची परीक्षा. डफ वाजतांच राग ( गाण्याचा ) ओळखला.

**डायन भी अपने बच्चेको नहीं खाती**—डाकीणसुद्धां आपलें मूल खात नाहीं.

**डायन भी दस घर छोड़कर खाती है**-डाकीणसुद्धां दहा घरें सोडून खाते.

**डूबतेको तिनकेका सहारा**—बुडत्याला काडीचा आधार.

**डूबा वंश कबीरका, उपजे पूत कमाल**—सूर्यापोटीं शनीश्वर.

**ढाकके तीन पात**—पळसाला पानें तीन.

**तड़केका भूला साँझको घर आया तो वह भूला नहीं कहाता**—उशीरां कां होईना चूक कळली म्हणजे झालें.

**तबेलेकी बला बंदरके सिर**—आकाशाची कुऱ्हाड कोल्ह्याच्या दांतांवर. ( पुष्कळांनी केलेले दोष एकाच्याच माथीं मारले जातात तेव्हां म्ह० )

**तलवारका घाव भरता है, बातका घाव नहीं भरता**—तलवारीचा घाव भरून निघतो शब्दानें केलेली जखम भरून येत नाहीं. ( कठोर वचन बोलूं नये. )

**ताकपर बैठा उल्लू, माँगे भर भर चुल्लू**—नीच मनुष्य उच्चपदीं बसला कीं सज्जनांना त्रास देतो.

**तिनकेकी आड़ पहाड़**—गवताच्या काडीच्या आड डोंगर, ( थोड्याशा श्रमानें मोठें काम होतें तेव्हां म्ह०

**तिरिया तेल, हमीर हठ, चढै न दूजी बार**—दृढ प्रतिज्ञ आपली प्रतिज्ञा पूर्ण करतात.

**तीन कनौजिये तेरह चूल्हे**—तीन कनोजी तेरा चुली. ( सोवळ्याची अतिरेकी कल्पना. )

**तीन गुनाह खुदा भी बख्शता है**—देवसुद्धां तीन अपराध माफ करतो.

**तीन बुलाये तेरह आये, दे दालमें पानी**—तीन बोलावले, तेरा आले, वरणांत आणखी पाणी घाला.

**तीनमें न तेरहमें, मृदंग बजाये डेरेमें**—कोणाच्या अध्यांत ना मध्यांत, घरांत बसून मृदंग वाजवितो. ( कोणत्याही कामांत सामिल न होणें. )

**तीन लोकसे मथुरा न्यारी**—सर्व लोकांहून निराळ्या मार्गानें चालणारा.

**तीर नहीं तो तुक्का ही सही**—कार्य सफल न झाले तरी उद्योग तर आहे.

**तुख्मे तासीर सुहबते असर**—खाण तशी माती, संगत तसा प्रभाव.

**तुझे पराई क्या पड़ी अपनी आप निबेड़**—आपलें आपण पाहावें, दुसऱ्याची उठाठेव करूं नये.

**तुम डार डार, हम पात पात**—ठकास महाठक.

**तुरत दान महा पुण्य**—वेळेवर केलेली मदत फार लाभदायक होते.

**तुम्हारे मुँहमें घी शक्कर**—तुमच्या तोंडांत तूप साखर.

**तू भी रानी, मैं भी रानी, कौन भरे कुएँका पानी**—तूं हि राणी, मी हि राणी, कोण भरील विहिरीचें पाणी ?

**ते ते पाँव पसारिये जेती लाँबी सौर**—अंथरुण पाहून पाय पसरावे.

**तेल तिलोंसेही निकलता है**—तिळांतूनच तेल निघतें. ( उदार धनिक मनुष्यच दान देतो. )

**तेलीका तेल जले, मसालचीका दिल जले**—तेल्याचें तेल जळतें पण

मशालचीचें पोट दुखतें. ( एकाचा खर्च पाहून दुसऱ्याला दुःख होतें तेव्हां म्ह० )

**तेलीके बैलको घरही कोस पचास**—तेल्याच्या बैलाला घरच्या घरींच पन्नास कोस चालावें लागतें. घरांतच पुष्कळ काम करणाराला म्ह० )

**तेली खसम किया और फिर भी रूखा खाया**—तेली नवरा केला तरी अन्न कोरडेंच खावें लागतें (श्रीमंतांचा आश्रयांत राहून सुद्धां जेव्हां कोणी

**तैराक ही डूबता है**—पोहणाराच बुडतो. [ दुःखी राहतो तेव्हां म्ह० )

**थका ऊँट सराय ताकता है**—थकलेला उंट धर्मशाळेकडे पाहातो.

**थूकका चाटना अच्छा नहीं**—दिलेला शब्द परत घेणें चांगलें नाहीं.

**थूकसे सत्तू नहीं सनता**—( दांत कोरून पोट भरत नाहीं. ) मोठीं कामें थोडक्यांत होत नाहींत.

**थोड़ा खाना, इज्जतसे रहना**—थोडें खावें, मानानें रहावें.

**थोथा चना बाजे घना**—उथळ पाण्याला खळखळाट फार. [नुकसान येतें.

**थोड़ी पूँजी खसमको खाय**—थोड्या भांडवलानें व्यापार करणाराला

**दबी बिल्ली चूहोंसे कान कतराती है**—बलवान मनुष्य सुद्धां संकटांत दुर्बलांचीं बोलणीं ऐकतो.

**दबतेको सब दबाते है**—जो ऐकून घेतो त्याला सर्व दम देतात.

**दबेपर चींटी भी चोट करती है**—जास्त दुःख दिलें तर मुंगीसारखा क्षुद्र प्राणीसुद्धां आघात करतो.

**दमका क्या भरोसा, आया न आया**—जीवन क्षणभंगुर आहे.

**दमड़ीकी बुढ़िया, टका सिर मुँडाई**—दमडीची म्हातारी तिची दोन पैसे मुंडणावळ. ( थोडा लाभासाठीं जास्त खर्च होतो तेव्हां म्ह० )

**दमड़ीकी हाँडी गई, कुत्तेकी जात पहचानी गई**—दमडीचें मडकें गेलें पण कुत्र्याची जात कळली.

**दर्जीकी सुई कभी ताशमें कभी टाटमें**—शिंप्याची सुई कधीं भरजरी कापडांत तर कधीं गोणपाटांत ( वाटेल तें काम करायचें.)

**दलालका दिवाला क्या, मस्जिदमें ताला क्या**—दलालाचें दिवाळें कसलें वाजणार, मशीदीला कुलुप कसलें लागणार.

**दाईसे पेट नहीं छिपता**—दाईजवळ पोट लपवितां येत नाहीं.

**दाग लगाये लंगोटिया यार**—लहानपणचा मित्रच उणें काढतो.

**दाता दे, भंडारीका पेट फूले**—दाता देतो आणि खजिनदार दुःखी होतो.
**दादा कहनेसे बनिया भी गुड़ देता है**—स्तुति केल्यानें कार्य सिद्ध होतें.
**दादा ले और पोता बरते**—फार टिकाऊ आहे.
**दानकी बछियाके दांत नहीं देखे जाते**—धर्माची गाईचे दांत तपासले
जात नाहींत. ( फुकट मिळेल तें घ्यावें. )
**दाना दुष्मन नादान दोस्तसे बेहतर**—शहाणा शत्रु मूर्ख मित्रांपेक्षां बरा.
**दालभातमें मूसरचंद**—दोन माणसांत उगीच तिसरा येतो तेव्हां म्ह०
**दिन ईद रात शब्बरात**—मनुष्य नेहमीं सुखांत असतो तेव्हां म्ह०
**दिनको सोवे रोज़ी खोवे**—जो दिवसा निजतो त्याचा धंदा बुडतो.
**दिनके फेरसे सुमेरू होत माटीको**—काळ फिरला की सुवर्ण मेरूही
**दियातले अंधेरा** दिव्याखालीं अंधार. [ मातीचा बनतो.
**दिल लगा गधीसे तो परी क्या चीज़ है**—प्रेम आंधळें असतें.
**दीपककी रविके उदय, बात न पूछे कोय**—सूर्योदय झाल्यावर दिव्याला
कोण विचारतो. ( नगाऱ्याची घाई तेथें टिमकी तुझे काई. )
**दीवारके भी कान होते हैं**—भिंतीला सुद्धां कान असतात.
**दीवाल रहेगी तो लेव बहुतेरे चढ़ेंगे**—भिंत उभी असली तर गिलावे
हवे तेवढे चढतील.
**दुधार गायकी लात भली**—दुभत्या गायीची लाथ बरी. [ शकला आहे.
**दुनियाका मुँह किसने बंद किया है**—बोलणाराचें तोंड कोण बंद करूं
**दुनिया ठगिये मक्करसे, रोटी खाइये शक्करसे**—जगाला लबाडीनें फस-
वावें आणि साखरेशीं भाकरी खावी. [ नाहीं आणि बाजंत्र्याला ताट.
**दुलहाको पत्तल नहीं, बजानियेको थाल**—नवरदेवाला पत्रावळसुद्धां
**दूधका जला छाँछ फूँककर पीता है**—दुधानें तोंड भाजलें कीं मनुष्य
**दूरके ढोल सुहावने**—दुरून डोंगर साजरे. [ ताकसुद्धां फुंकून पितो.
**देना थोड़ा दिलासा बहुत**—देणें थोडें आश्वासन फार. [ पाहाणार.
**देखनेमें ना, सो चखनेमें क्या**—दिसायला वाईट त्याला चाखून कोण
**देशी कुतिया विलायती बोली**—स्वदेशी कुत्री आणि विलायती भुंकणें.
**देहधरेको दंड है**—देहधारी प्राण्याला दुःख रोगादि असणारच.
**दो घरका पाहुना भूखा रह जाता है**—दोन घरचा पाहुणा उपाशी राहतो.
**दोनों हाथोंमें लड्डू हैं**—दोन्ही बाजूनें लाभ आहे.

**दोस्तीमें लेन देन बैरका मूल**—पैशाची देव घेव मैत्री तोडतो [वांकवितात.
**दौलतमंदकी पौरीपर सब सिजदा करते हैं**—श्रीमंतापुढें सर्व मान
**धनवतीको काँटा लगा, दौड़े लोक हज़ार। निर्धन गिरी पहाड़से, कोई न आया कार**—श्रीमंतिणीला कांटा बोचला तर हज़ारों लोक धावले, गरीब डोंगरावरून पडली तर कोणी मदत केली नाहीं. [ओळखू येते.
**धानका गाँव पुआलसे जाना जाता है**—भातशेतीचें गांव पेंढीवरून
**धीरज, धर्म, मित्र अरु नारी, आपत्काल परखिये चारी**—धैर्य, धर्म, मित्र आणि स्त्री यांची परीक्षा संकट काळींच होते.
**धूपमें बाल सफेद नहीं किये हैं**—आम्हाला ही कांहीं अनुभव आहे.
**धोबिनपर बस न चले, गधैयाके कान उमेठे**—परटिणी पुढें कांहीं चालत नाहीं, गाढवाचे कान उपटतो.
**धोबीका कुत्ता, घरका न घाटका**—त्रिशंकु सारखी स्थिति.
**धोबीके घर पड़े चोर, वह न लुटा, लुटे और**—धोब्याच्या घरीं चोरी झाली तर त्याचें कांहीं जात नाहीं, दुसऱ्याचेच कपडे जातात.
**धोबी बसिकै क्या करे दिगंबरोंके गाँव**—नागव्यांच्या गांवांत वस्ती करून धोब्याचें चालणार नाहीं. [तें पांढरें होत नाहीं.
**धोये ही सौ बारके काजर होय न सेत**—काजळ किती जरी धुतलें तरी
**नंग बड़ा परमेश्वरसे**—लुच्चा मनुष्य ईश्वरापेक्षा मोठा असतो.
**नंगी क्या नहायगी, क्या निचोड़ेगी**—नागवी काय भिजविणार आणि काय पिळणार ?
**न देनेके नौ बहाने**—द्यावयाचें नसलें म्हणजे सतरा ढोंगं सुचतात.
**न इधरके रहे न उधरके**—इकडचे नाहीं आणि तिकडचे नाहीं.
**नक्कारख़ानेमें तूतीकी आवाज़**—नगाऱ्याची घाई तेथें टिमकी तुझें काई.
**न जीनेकी शादी न मरनेका ग़म**—जगण्याची खुशी नाहीं. मरण्याचें दुःख नाहीं. ( सोयर सुतक कांहींच नाहीं. )
**नटनी जब बाँसपर चढ़ी तो घूँघट क्या**—एकदां काम पत्करल्यावर लाज कशाची ? [कधीं तरी नष्ट होणारच
**नदी किनारे रूखड़ा, जब तब होय बिनास**—नदीच्या कांठचें झाड
**नदीमें रहकर मगरसे बैर**—जळांत राहून मगराशीं वैर.
**न नौ मन तेल होगा; न राधा नाचेगी**—काम करायचें नसेल तेव्हां विल-

क्षण अटी घालतात.

**नया नौ दिन, पुराना सौ दिन**—नव्या नऊ दिवस, जुन्या शंभर दिवस.

**नये नये हकीम और नई नई बातें**—नवे नवे अधिकारी आणि नव्या नव्या गोष्टी. [( भांडणाचें मूळच नष्ट केलें पाहिजे. )

**न रहेगा बाँस न बजेगी बांसुरी**—वेळू नसला तर पावा वाजणार नाहीं.

**नाईकी बरातमें जने जने ठाकुर**—न्हाव्याच्या वरातींत प्रत्येक जण ठाकुर.

**नाई नाई बाल कितने ? जजमान अभी सामने आ जाएँगे**—लवकरच समजणाऱ्या गोष्टीबद्दल विचारतात तेव्हां म्हणतात.

**नाक कटी पर हट न हटी**—नाक कापलें गेलें पण हट्ट गेला नाहीं.

**नाक काटके दुशालेसे पोंछना**—कोणी एकाद्याचें नुकसान करून सहानुभूति दाखवतो तेव्हां म्ह०

**नाक दबानेसे मुँह खुलता है**—नाक दाबलें कीं तोंड उघडतें.

**नाच न जाने आँगन टेढ़ा**—नाचतां येईना आंगण वाकडें.

**नाचनेवालोंके पाँव थिरकते हैं**-उद्योगी मनुष्य कधीं स्वस्थ बसायचा नाहीं.

**नानीके आगे ननिहालकी बातें**—आजीलाच आजोळच्या गोष्टी सांगणें.

**नानीके टुकड़े खावे, दादाका पोता कहलावे**—आजीच्या ( आईची आई ) घरीं तुकडे मोडतो आणि आजोबांचा ( वडीलांचे वडील ) नातू म्हणवतो. [ नातवानें ( मुलीचा मुलगा ) दानधर्म केला.

**नानी खसम करे, दोहता चट्टी भरे**—आजीनें पुनर्विवाह केला आणि

**नाम बड़े अरु दर्शन खोटे**—नांव मोठें दर्शन खोटें.

**नाम बढ़ावे दाम**—नांव मोठें असलें म्हणजे किंमत वाढते.

**नापे सौ गज़ फाड़े न एक गज़**—आश्वासनें देऊन कांहीं करीत नाहीं

**नाम लेवा न पानी देवा**—कोणी जिवंत नाहीं. [ तेव्हां म्ह०

**नामी चोर मारा जाय, नामी शाह कमा खाय**—प्रसिद्ध चोर मारला जातो आणि प्रसिद्ध व्यापारी खूप संपत्ति मिळवितो.

**नार मुई, घर संपति नासी, मूँड मुँडाय भये संन्यासी**—बायको मेली व सर्व वैभव गेलें, म्हणून मुंडण करून संन्यासी झाले.

**नारियलमें पानी, नहीं जानते खट्टा कि मीठा**—नारळांत पाणी, तें आंबट आहे कीं गोड सांगतां येत नाहीं. ( संदेहास्पद गोष्ट असते तेव्हां म्हणतात. )

**निर्बलके बल राम**—गरिबांचा वाली परमेश्वर.

**नीम हकीम, ख़तरे जान**—अर्धवट वैद्य असला म्हणजे जीव धोक्यांत [पडावयाचाच.

**नेकी और पूछ पूछ**—एकाद्याचें कल्याण करावयाचें आहे तर त्यांत काय [विचारावयाचें.

**नौकरी ताड़की छाँह है**—नोकरीला स्थिरता नसते.

**नेकी कर, कुएँमें डाल**—निष्काम कर्म करा.

**नौ जानते हैं छः नहीं**—नऊ माहीत आहेत सहा नाहीं.

**नौ दिन चले अढाई कोस**—नऊ दिवसांत अडीच कोस चालला. (फार कमी काम केलें.)

**नौ नगद न तेरह उधार**—उधारपेक्षां रोख मिळालेलें चांगलें.

**नौ सौ चूहे खायके, बिल्ली चली हजको**—करून करून भागली आणि देव पुजायला लागली. (फार अपराध करून कोणी साधुत्व दाखवतो तेव्हां म्ह०)

**पंच कहे बिल्ली तो बिल्ली ही सही**—सर्व म्हणतात तेंच आपण म्हणावें.

**पंच जहाँ परमेश्वर**—पांचामुखीं परमेश्वर.

**पंचों और मसालची इनकी उलटी रीति, और दिखावे चांदनी आप अँधेरे बीच**—पंच आणि मशालजी या दोघांची रीत उलटीच आहे. हे दुसऱ्याला उजेड देतात व स्वतः अंधारांत रहातात.

**पंचोंका कहना सिरमाथे, मगर परनाला तो यहीं रहेगा**—पंचांची आज्ञा शिरसामान्य पण मोरी तर आहे तेथेंच रहाणार.

**पछवाँ चले, खेती फले**—पश्चिमेकडचा वारा वहातो तेव्हां शेती पिकते.

**पछवा हवा ओसावे जोई, घाघ कहे घुन कबहुँ न होई**—घाघ म्हणतो पश्चिमेकडील वाऱ्यांत जें धान्य वारविलें जातें त्यांत कीड होत नाहीं

**पढ़े तो हैं पर गुने नहीं**—पुस्तकीज्ञान आहे पण व्यवहारज्ञान नाहीं.

**पढ़े फारसी बेचे तेल, यह देखो कुदरतका खेल**—काय दैवाची लीला! पहा, विद्वान झाला पण तेल विकण्याचा धंदा करतो.

**पत्थरोंको जोंक नहीं लगती**—दगडाला जळू लागत नाहीं.

**पर उपदेश कुशल बहु तेरे, आचारहि ते नर न घनेरे**—लोकां सांगे ब्रह्मज्ञान, आपण कोरडा पाषाण.

**पराधीन सपनेहु सुख नाहीं**—परतंत्र माणसाला कधींच सुख मिळत नाहीं.

**पराये मुंड लछमीनरायन**—हलवाच्या घरावर तुळशीपत्र.

**पहले आत्मा फिर परमात्मा**—आधीं पोटोबा मग विठोबा.

**पहले लिख अरु पीछे दे, कमती हो तो मुझसे ले**—आधीं लिही मग दे, कमी असले तर माझ्याजवळून घे. ( व्यवस्थित लिहिल्यानें चूक होत नाहीं.)

**पहले भीतर तब देवता पितर**—आधीं पोटोबा मग विठोबा

**पाँच पंच मिली कीजे काज, हारे जीते नाहीं लाज**—पांच जणांनीं मिळून केलेल्या कामांत यशापयशाची लाज नसते.

**पाँचे आम पचीसे महुआ, तीस बरसमें इमली कहुआ**—पांच वर्षांत आंबा, पंचवीस वर्षांत महुआ आणि तीस वर्षांत चिंच आणि कॉफीचें झाड फळतात.

**पाँचों उँगलियाँ घीमें**—लाभच लाभ होणें.

**पाँचों उँगलियाँ समान नहीं होतीं**—पांची बोटें सारखीं नसतात.

**पानी पीकर जात पूछना**—पाणी प्याल्यावर जात विचारावयाची नाहीं.

**पानी मथनेसे घी नहीं निकलता**—पाणी घुसळून तूप निघत नाहीं.

**पासका कुत्ता दूरका भाई**—दूर देशीं असलेल्या भावापेक्षां जवळचा कुत्रा बरा. कारण तो वेळेवर उपयोगीं पडतो.

**पियै रुधिर पय ना पियै, लगी पयोधर जोंक**—जळू स्तनाला लावली तरी ती रक्तच शोषते, दूध पीत नाहीं. ( नीच माणसें अवगुणच ग्रहण करतात.)

**पीर, बवरची, भिश्ती, खर**—ब्राह्मणाचा उपयोग चार प्रकारांनीं होतो, १ भट, २ आचारी, ३ भिस्ती, आणि ४ ओझें वाहणारें गाढव.

**पूछे न आछे, मैं दुलहिनकी चाची**—कोणी विचारीत नाहीं तरी अहो मी नवरीची चुलती आहें.

**पूछते पूछते दिल्ली चले जाते हैं**—विचारीत विचारीत मनुष्य दिल्लीला सुद्धां जाऊन पोंचतो.

**पूत आपनो सबको प्यारो**—आपला मुलगा सर्वांनाच प्रिय असतो.

**पेट जो चाहे सो करावे**—पोटासाठीं माणूस वाटेल तें करतो.

**पैसा कहीं पेड़पर नहीं फलता**—पैसे कष्ट केल्याशिवाय मिळत नाहीं.

**पेट पालना कुत्ता भी जानता है**—पोट कुत्रासुद्धां भरतो.

**प्यासा कुएँके पास जाता है, कुआँ प्यासेके पास नहीं जाता**—तहानेला मनुष्य विहिरीजवळ जातो, विहिर तहानेलेल्याजवळ जात नाहीं.

**प्रभुता पाइ काहि मद नाहीं**—सत्तेचा मद कोणाला येत नाहीं !

**प्रेममें नेम कहाँ**—प्रेमांत नेम कुठला !

**फटकचंद गिरधारी, जिनके पास न लोटा थारी**—फटकचंद गिरीधारी, जवळ नाहीं लोटा कीं थाळी.

**फटा मन और फटा दूध फिर नहीं मिलते**—अंतरलेलें मन आणि नासलेलें दूध पुन्हां जुळत नाहींत.

**फ़तह और शिकस्त ख़ुदाके हाथ हैं**—हार, जीत परमेश्वराधीन.

**फलकी डाल नीचेको झुकती है**—सज्जन कधीं घमेंड करीत नाहीं.

**फलेगा सो झड़ेगा**—चढेल तो पडेल; पिकेल तें पडेल.

**फालुदा खाते दांत टूटे तो बलासे**—सुटणाऱ्या संकटासाठीं कुरकुर करून काय उपयोग. [ असें सांगणें.

**फिसल पड़ेकी हर गंगा**—एकादें काम बिघडलें कीं तें मुद्दाम तसेंच केलें

**फूल टहनीहीमें अच्छा लगता है**—फूल फांदीवरच शोभतें.

**फूल नहीं पँखड़ी ही सही**—फार नाहीं तर थोडेंसुद्धां चालेल.

**बंदरके हाथ आइना**—माकडाच्या हातीं आरसा.

**बंदर क्या जाने अदरकका स्वाद**—माकडाला आल्याची चव कळत नाहीं.

**बंदा जोड़े पली पली, अरु राम लुढ़ाये कुप्पा**—मनुष्य पळी पळी जमवितो आणि देव बुधला सांडतो. [ खाणार म्हणतो चव नाहीं.

**बकरीकी जान गई, खानेवालेको मज़ा न आया**—शेळीचा जीव गेला

**बकरीनें दूध दिया पर मेंगनी डालकर**—मन दुखवून उपकार करायचे.

**बकरेकी माँ कबतक खैर मनायेगी**—बकऱ्याची आई त्याला कुठवर जपणार.

**बग़लमें छुरी मुँहमें राम**—तोंडानें मित्रत्वाच्या गोष्टी बोलून मनांत वैर धरणें. [ तेंच चांगलें समजावें.

**बजा कहे जिसे आलम, उसे बजा समझो**—जग ज्याला चांगलें म्हणतें

**बड़ी फज़र चूल्हेपर नज़र**—सकाळ झाली आणि खाण्याची चिंता.

**बडे आदमीने दाल खाई तो कहा सादा मिज़ाज है, ग़रीबने खाई तो कहा कंगाल है**—मोठ्या माणसानें वरण खाल्लें तर तो त्याचा साधेपणा आहे, गरीबानें खाल्लें तर तो भिकारडा आहे.

**बड़े चोरका हिस्सा नहीं**—मोठ्या चोराला वाटणी लागत नाहीं. त्याच्याच हातीं सर्व माल असतो. तो वाटेल तितका घेतो.

**बड़ेके कहेका और आवलेके खायेका स्वाद पीछेसे आता है**—वडिलांचें सांगणें आणि आवळ्याचें खाणें यांचा फायदा मागाहून कळतो.

**बड़े बरतनकी खुरचन भी बहुत है**—मोठ्या भांड्याची खरवड पण पुष्कळ निघते. ( श्रीमंत गरीब झाला असतांना म्ह० )

**बड़े बोलका सिर नीचा**—गर्वाचें घर खालीं. [छोट्यांची कामगिरी अधिक.
**बड़े मियाँ तो बड़े मियाँ छोटे मियाँ सुभान अल्लाह**--मोठ्यापेक्षां
**बड़ोंके कान होते हैं आँख नहीं**—मोठ्या माणसांना कान असतात डोळे नसतात. ( ते दुसऱ्याचें म्हणणें ऐकतात ).
**बद अच्छा बदनाम बुरा**—वाईटपणा बरा पण खोटा कलंक वाईट.
**बन गयेके ल लजी, बिगड़ गयेके चूतिया**—काम झालें तर लोक स्तुति करतात, बिघडलें तर शिव्या देतात.
**बनिक पुत्र जाने कहा, गढ़ लेवेकी बात**—ज्याचें काम त्यालाच साधतें.
**बनियेकी सलाम बेगरज़ नहीं होती**—मतलबाशिवाय वाणी कोणत्याही कामांत हात घालीत नाहीं. [ बावन होतात.
**बरसे सावन तो हों पाँचके बावन**—श्रावणांत पाऊस पडला तर पांचाचे
**बरु भल वास नरक कर ताता, दुष्ट संग जनि देहि विधाता**—नर्कवास चालेल पण हे देवा, दुष्टाची संगत देऊं नको.
**बहता पानी निर्मला, बँधासो गंदा होय; साधु तो रमता भला, दाग न लागे कोय**—वाहतें पाणी जसें निर्मळ असतें तसा साधु नेहमीं फिरता असावा म्हणजे त्याला डाग लागत नाहीं.
**बहुते जोगिन मठ उजाड़**—पुष्कळ योगी एका मठांत जमले कीं ते मठ उजाड करून जातात. [ माहीत.
**बाँझ क्या जाने प्रसवकी पीड़ा**—वांझेला बाळंतिणीच्या वेणा काय
**बाँबीमें हाथ तू डाल, मंत्र मैं पढ़ूँ**—सापाच्या बिळांत हात तूं घाल मी मंत्र म्हणतो. ( दुसऱ्याला संकटाचें काम आणि आपल्याला आरामाचे.)
**बाँह गहेकी लाज**—ज्याला आश्रय दिला त्याचें रक्षण शेवटपर्यंत करावें.
**बातोंसे काम नहीं चलता**—गप्पा मारून पोट भरत नाहीं.
**बाप न मारी पीड़री, बेटा तीरंदाज़**—बापानें कधीं चिमणी मारली नाहीं मुलगा म्हणे मी धनुर्धारी आहे.
**बाप भला न भैया, सबसे भला रुपैया**—जगांत बाप, भाऊ कोणी चांगलें नाहीं, सर्वांत उत्तम रुपया आहे. [ येतेच.
**बार बार चोरकी एक बार साहकी**—कधीं ना कधीं चलाखी उघडकीस
**बारह बरस दिल्ली रहे भाड़ही झोंका**—गंगेत राहून कोरडेच.
**बारह गाँवका चौधरी, अस्सी गाँवका राव, अपने काम न आय तो**

**ऐसी तैसीमें जाव**—फार श्रीमंत असून जो आपल्या उपयोगी पडत नाहीं तो काय उपयोगाचा.

**बावन तोले पाव रत्ती**—शंभर टके बरोबर. [ नको.

**बासी बचे न कुत्ता खाय**—शिळें रहायला नको आणि कुत्र्यानें खायला

**बाहर टेढ़ो फिरत है, बाँबी सुधो साँप**—स्वतःच्या घरांत चोरसुद्धां साव असतो.

**बाहे असाढ़ न एक बार, अब क्यों बाहे बारंबार**—आषाढांत एकदांसुद्धां नांगरली नाहीं आतां वारंवार नांगरून काय होणार.

**बिंध गया सो मोती, रह गया सो सीप**—बिंधलें तें मोती, राहिला तो शिंपला. ( कामांत लागलेलें उपयोगी, राहिलेलें निरुपयोगी. )

**बिच्छूका काटा रोवे, साँपका काटा सोवे**—विंचू चावलेला रडतो, साप चावलेला मरतो. ( मोठी मार फार वाईट. ) [ काम करणें.

**बिच्छूका मंतर न जाने साँपके बिलमैं हाथ**—योग्यता नसतांना एकादें

**बिना आई कोई मरता नहीं**—मरणा वांचून कोणी मरत नाहीं.

**बिन माँगे मोती मिले, माँगे मिले न भीख**—न मागतां मोतीं मिळतें, मागून भीकसुद्धां मिळत नाहीं. [ पाजीत नाहीं.

**बिना रोये माँ भी दूध नहीं पिलाती**—रडल्यावांचून आईसुद्धां दूध

**बिल्लीके भागों छींका टूटा**—शिंक्याचें तुटलें बोक्याचें साधलें. ( अनायासं काम होतें तेव्हां म्हणतात. )

**बिल्ली खायगी नहीं तो लुढकायगी**—दुष्ट मनुष्य उगीच त्रास देतो.

**बिस्मिल्ला ही ग़लत**—आरंभींच चुकलें. [ आतां पुढचा विचार करा.

**बीती ताहि बिसार दे, आगेकी सुधि लेय**—झालें गेलें गंगेला मिळालें,

**बीमारकी रात पहाड़ बराबर**—आजाऱ्याला रात्र डोंगरासारखी वाटते.

**बूँदसे गई सो हौजसे नहीं आती**—एका थेंबानें जी प्रतिष्ठा गेली ती हौदानें भरून निघणार नाहीं.

**बेईमानीका मुँह काला**—अप्रामाणिकता वाईट आहे.[ लहान कामसुद्धां बरें.)

**बैठेसे बेगार भली**—बेकारीपेक्षां बिगारी बरी. ( कांहीं काम नसतांना

**बैलका बैल गया, नौ हाथ पगहा भी गया**—हेंही गेलें आणि तेंही गेलें.

**बोये पेड़ बबूलके, आम कहाँसे खाय**—जसें केलें तसें फळ पावलें.

**ब्याह नहीं किया तो क्या, बरात तो गये हैं**—लग्न नाहीं केलें पण

मांडवाखालून गेलों आहोंत.

**ब्राह्मण, ठाकुर, लाला, तीनोंका मुँह काला, तीनोंको देश निकाला**—ब्राह्मण, जमीनदार, आणि व्यापारी यांचें काळें होवो, यांना हद्दपार केलें पाहिजे.

**भई गति साँप छछूंदर केरी**—इकडे आड तिकडे विहीर.

**भरी जवानी माँझा ढीला**—तरुण अवस्थेंतच अशक्त होणें.

**भरी थालीमें लात मारना**—भरलें ताट लाथाडणें. ( चालू कमाईचें काम सोडणें. )

**भरे पेट शक्कर खारी**—भरल्या पोटावर साखर ही खारट लागते.

**भागते भूतकी लंगोटी ही सही**—चोराची लंगोटी मिळाली तर तीहि बरी.

**भानु उदय दीपक कहि कामा**—सूर्य उगवल्यावर दिव्याचा काय उपयोग ?

**भादोंके मेहसे दोनों साखकी जड बँधती है**—भाद्रपदाच्या पावसानें दोन्हीं पिकांचीं मुळें पक्कीं होतात. ( वेळेवर केलेलें काम लाभदायक होतें. )

**भादोंमें जो बरवा होय, काल पछोकर जाकर रोय**—भाद्रपदांत पाऊस पडला कीं, दुष्काळ पसरतो आणि रडतो.

**भा विधिना प्रतिकूल जबै, तब ऊँट चढै पर कूकर काटे**—दैव फिरलें म्हणजे उंटावर बसलेल्यालासुद्धां कुत्रें चावतें. ( नशीब वांकडें झालें म्हणजे हलकटसुद्धां छळतो. )

**भीखके टुकड़े बज़ारमें डकार**—दुसऱ्याच्या जोरावर शेखी मिरविणें.

**भूख लगी तो घरकी सूझी**—भूक लागली कीं घर आठवतें.

**भूखमें गूलर ही पकवान**—भूकेंत बेचव खाणेंसुद्धां मिठाई वाटतें.

**भूखे भजन न होय गुपाला**—उपाशीं पोटीं भजन होत नाहीं.

**भूल गये रागरंग, भूल गये छकड़ी, तीन चीज़ें याद रहीं, नोन, तेल, लकड़ी**—संसारांत पडलें कीं, नाचरंग, सहली सर्व विसरून जातात फक्त मीठ, तेल आणि सर्पणाचीच आठवण रहाते.

**भेड पै ऊन किसने छोड़ी**—मेंढीच्या अंगावरची लोंकर कोण सोडील. ( मूर्ख श्रीमंताला सर्वच लुबाडतात. )

**भैंसके आगे बीन बजे, भैंस बैठी पगुराय**—म्हशीपुढें वीणा वाजविली तरी ती शांतपणें रवंथ करीत असते. ( गाढवापुढें वाचली गीता, कालचा गोंधळ बरा होता ) मूर्खाला उपदेश निरुपयोगी.

**भोरका मुर्गा बोला, पंछीने मुँह खोला**—पहाटेला कोंबडा आरवला कीं, पक्षी बोलूं लागतात.

**भौंकते कुत्तेको रोटीका टुकड़ा**—भुंकणाऱ्या कुत्र्याच्या तोंडावर भाकरीचा तुकडा टाकला कीं तो गप्प बसतो. ( स्वार्थासाठीं विरोध करणाराला कांहीं देऊन आपलें काम साधावें. )

**भौंर न छाँडे केतकी तीखे कंटक जान**—केवड्याचे कांटे तीक्ष्ण असले तरी भुंगा तेथून जात नाहीं (प्रेमी संकट सोसूनसुद्धां प्रियकराला सोडत नाहीं.)

**मँगनीके बैलके दाँत नहीं देखते**—फुकट मिळालेली वस्तु परीक्षा केल्याशिवाय घ्यावी. [ मोठ्यावर लहान आक्रमण करतो तेव्हां म्ह० )

**मच्छड़को हमलो भयो, हाथी ऊपर आज**—हत्तीवर डांसाचा हल्ला

**मछलीके बच्चोंको तैरना कौन सिखावे**— माशाच्या पोरानां पोहायला कोण शिकवितें. [ जातिस्वभाव जात नाहीं. ]

**मजनूको लैलाका कुत्ता भी प्यारा**—मजनूला लैलाचें कुत्रेंसुद्धां आवडतें. ( प्रियकराची प्रत्येक वस्तू आवडते.)

**मनके लड्डुओंसे भूख नहीं मिटती**—मनचे मोदक खाऊन भूक जात नाहीं ( नुसत्या कल्पनेनें कार्यसिद्ध होत नाहीं. )

**मन चंगा तो कठौतीमें गंगा**—ज्याचें हृदय शुद्ध असतें त्याच्या घरींच [ गंगा आहे.

**मनचलेका सौदा है**—लहर लागली कीं विकत घेतले.

**मन भावे मूँड हिलावे**—नको नको नि पायलीचें चाखों.

**मर्ज़ बढ़ता गया, ज्यों ज्यों दवाकी**—औषध घेतलें तों तों रोग वाढतच चालला. ( प्रयत्न करूनहि काम होत नाहीं तेव्हां म्हणतात. )

**मरता क्या न करता**— मरायला तयार झालेला मनुष्य वाटेल तें करायला भीत नाहीं. [ काळ सोकावतो.

**मरनेका नहीं, यमके पहुँचनेका डर है**—म्हातारी मेल्याचें दुःख नाहीं पण

**मरे तो शहीद, मारे तो गाजी**—मेला तर हुतात्मा, जिंकला तर धर्मवीर.

**मलयगिरीकी भीलनी, चंदन देत जराय**—मलय पर्वतावरील भिल्लीण चंदन चुलींत जाळते. ( सहज मिळणाऱ्या वस्तूची किंमत होत नाहीं.

**माँके पेटसे कोई सीखके नहीं निकलता**—आईच्या पोटांतून कोणी शिकून येत नाहीं. ( प्रत्येकाला काम शिकावें लागतें. )

**माँगे हरड़ दे बहेड़ा**—हरडा मागितला तर बेहडा दिला.

**मानका पान अपमानका लड्डू**—मानाचें पान चांगलें, अपमानाचा लाडू सुद्धां नको. [ म्हणून रहाणार.

**मान न मान मैं तेरा मेहमान**—माना अगर मानूं नका, मी तुमचा पाहुणा.
**मानों तो देव नहीं तो पत्थर**—मानला तर देव नाहीं तर धोंडा.
**मायाको माया मिले कर कर लंबे हाथ**—पैशाकडे पैसा जातो.
**माया तेरे तीन नाम, परशा, परसू, परसराम**—जगांत ज्याच्याजवळ पैसा नाहीं त्याला लोक परशा म्हणतील, मध्यम स्थितींतील माणसाला परसू म्हणतील व श्रीमंताला परशराम म्हणतील.
**मारके आगे भूत भागे**—माराला भिऊन भुतें सुद्धां पळतात.
**मारतोंके पीछे और भागतोंके आगे**—मारणाराच्या मागें आणि पळणाराच्या पुढें.
**माले मुफ्त दिले बेरहम**—माल फुकटांत मिळाला म्हणजे वाटेल तसा [ वापरला जातो.
**मियाँकी जूती मियाँके सिर**—ज्याच्या तंगड्या त्याच्याच गळ्यांत.
**मियाँ बीबी राज़ी तो क्या करेगा क़ाज़ी**—वधू वर राजी असल्यावर भटजी काय करणार.
**मिस्सोंसे पेट भरता है क़िस्सोंसे नहीं**—अन्नानें पोट भरतें गोष्टीनें नाहीं.
**मुँहकी मीठी हाथकी झूठी**—खोटी आशा देणारी.
**मीठा मीठा गप्प, कडुवा कडुवा थू**—( खायला मी, लढायला तुम्ही ) फायदेशीर असेल तें आपलें हानिकारक असेल तें दुसऱ्यांचें
**मग़रूरका सिर नीचा**—गर्वाचें घर खालीं.
**मुफ्तकी शराब काज़ीको भी हलाल है**—फुकट मिळालेली त्याज्य वस्तु [ धर्मात्मा सुद्धां स्वीकारतो.
**मुँहमाँगी तो मौत भी नहीं मिलती**—इच्छानुसार मरण सुद्धां मिळत नाहीं.
**मुर्गीको तकलेका घाव भी बहुत है**—गरिबाचें थोडें जरी नुकसान झालें तरी तें त्याला पुष्कळ आहे.
**मुल्लाँकी दौड़ मसजिद तक**—सरड्याची धाव कुंपणापर्यंत. ( सीमित [ योग्यता असते तेव्हां म्ह.
**मृग, बांदरा, तीतर, मोर, थे चारों खेतीके चोर**—हरीण, माकड, तित्तर आणि मोर हे शेतीचा नाश करणारे आहेत.
**मेंढकीको भी जुकाम हुआ**—क्षुद्र मनुष्य मोठेपणाचा आव आणून वागूं [ लागतो तेव्हां म्हण.
**मोम नहीं कि पिघल जाय**—कठोर हृदयी आहे.
**मेरी ही बिल्ली, मुझीसे म्याँव**—माझीच मांजरी आणि मलाच गुरकावते.
**मोमकी नाक है, जिधर चाहे घुमाओ**—मेणाचें नाक आहे वाटेल तिकडे वळवा. ( सरल माणसाकडून वाटेल तें काम करून घेतां येतें. )

